सरकारनें मंजूर केलेलें टेक्स्ट् बुक

# वाङ्मयविकास



दुय्यम शाळांतील इयत्ता ६ वी
व प्रा. ट्रे. संस्थांमधील वर्ष २ रें यांकरितां

संपादक
डॉ. वामन भार्गव पाठक, एम्. ए., पी. एच्. डी.
मराठीचे प्राध्यापक, नौरोसजी वाडिया कॉलेज, पुणें.

---

प्रकाशक
मेसर्स जोशी आणि लोखंडे
पुणें.

---

आवृत्ति पहिली १९३९
पुनर्मुद्रण १९४५

---

# शिक्षकमित्रांजवळ



दुय्यम शाळांतील वरच्या वर्गास मराठी हा विषय शिकवीत असतां, माझ्या नजरेस जी एक ठळक गोष्ट दिसून आली, ती ही कीं, इतर विषयांपेक्षां आपल्या मातृभाषेचें ज्ञान विद्यार्थ्यांना मूलतःच अधिक असतें. आजच्या विद्यार्थीवर्गास शाळेंत, घरीं व इतरत्र मातृभाषेंतूनच बहुतेक व्यवहार करावा लागतो, हें एक त्याचें कारण आहेच; शिवाय शाळेच्या नेहमींच्या अभ्यासक्रमांतून त्यांना ज्या वेळोवेळीं लहानमोठ्या सुट्या मिळतात, त्यांवेळींसुद्धां स्वभाषेंतील ललितवाङ्मयाकडे त्यांचा कल होणें साहजिक आहे. शाळेंतही जीं वाचनालयें असतात त्यांतील मनोरंजक विभागांकडे त्यांचें लक्ष असतेंच. अशा रीतीनें हसत खेळत परंतु नकळत मातृभाषेविषयींचें त्यांचें प्रेम वाढत जातें.

ह्या सर्व गोष्टींचा असा एक अनुकूल परिणाम होतो कीं, क्रमिक पुस्तकांतील धड्यांची निवड जर विशेष प्रकारची असेल, तर त्यासंबंधीं त्यांच्या मनांत गोडी उत्पन्न करणें सोपें जातें. आजचा विद्यार्थी-वर्ग हा वर्गांत बसत असला तरी शाळेबाहेरील वातावरणाचा त्याच्या मनावर केवढा तरी परिणाम झालेला असतो! त्यांच्या कानावर प्रसिद्ध लेखक-कवींची कीर्ति वेळोवेळीं आलेली असते. त्यांच्या हातची एखादी ललितकृति जर त्यांना वर्गांतच वाचावयास मिळाली तर त्यांचा आनंद द्विगुणित होतो. म्हणूनच कीं काय आजच्या लोकप्रिय वाङ्मयसेवकांच्या कलाकृतींचा परिचय त्यांना करून देत असतां, त्यांचें कुतूहल अनावर होतें अशा वेळीं निव्वळ पाठ्यपुस्तकांतील धड्यांवरच दृष्टि ठेवून भागत

नाहीं. पुस्तकांत आलेल्या उताऱ्यांप्रमाणेंच न आलेल्या उताऱ्यांची माहिती, आणि यांच्या जोडीला लेखक-कवींच्या व्यक्तिमत्वाची ओळख आरंभींच त्यांना करून दिल्यास, त्यांची, हातीं असलेल्या विषयासंबंधींची जिज्ञासा अधिकच जागृत होऊन, धड्याला आकर्षकपणा येतो, आणि वर्गांतहि खेळीमेळीचें वातावरण पसरतें. ह्याकरितांच वैयक्तिक दृष्टिकोणांतून प्रत्येक धड्याच्या आरंभीं लेखकाची व विषयाची, सूचकतेनें ओळख करून देऊन, शेवटीं पुरवणी वाचनाकरितां निवडक पुस्तकांचा नामनिर्देश करण्याची पद्धत मीं अंगीकारिली आहे.

बहुधा नेहमींच, परंतु त्यांतल्यात्यांत लहानपणीं व्यक्तीची जिज्ञासा अतिशय तीव्र असते. बालवयांत विद्यार्थ्यांना आपल्या अवलोकनांत येणाऱ्या प्रत्येक गोष्टीविषयीं एकप्रकारचें कुतूहल वाटतें; आणि त्याच वयांत त्यांच्या भावी विकासाचें मुग्धस्वरूप त्यांच्या शारीरिक व मानसिक अवस्थेंत दिसून येतें. त्यांच्या अवांतर वाचनाला ह्यापूर्वीच थोडीफार सुरवात झालेली असते, आणि अद्‌भुत किंवा मनोरंजक विषयांचें त्यांना मोठेंच आकर्षण वाटतें. मनोधर्माच्या ह्या विशिष्ट कलांबरोबरच कोणाचें तरी अनुकरण करण्याची अथवा एखादें नवीन साहस करून दाखविण्याची तीव्र उत्कंठा, त्यांच्या ठिकाणीं जागृत झालेली असते. अशा वेळीं त्यांच्या आवडीनिवडीला पोषक आणि प्रेरक, असें सुंदर वाङ्मयीन वातावरण त्यांच्या जवळ ठेविल्यास, त्यांना केवढा तरी आनंद होतो. ह्या गोष्टी ध्यानांत बाळगूनच वाङ्मय-विकासाच्या रचनेचा प्रयत्न झाला आहे.

'वाङ्मय' म्हटलें म्हणजे मग त्यांत अनेक गुणांबरोबर 'सरसता' ही येतेच. 'काव्य', 'नाट्य', कथा किंवा वाङ्मयाचे दुसरे ललित

प्रकार, ह्यांची विषय सजविण्याची पद्धति रमणीय असल्यामुळें, त्यांचें आकर्षण मनाला सहजच वाटतें. तत्त्वप्रधान वाङ्मयाची अशी स्थिति नसते. गंभीर विषय सरस करण्यास आणि त्यांतील आनंदाचे वांटेकरी होण्यास लेखक व वाचक, यांना विशेषच प्रतिभा लागते. वाङ्मयांतील ह्या दोन्ही प्रकारांची विद्यार्थ्यांच्या दृष्टिकोणांतून, निवड करितांना मला कांहीं धोरणें सांभाळावीं लागलीं. तात्त्विक विषय कादंबरीप्रमाणें सरस करणारे लेखक असतात; किंबहुना व्याकरणासारख्या रुक्ष विषयांतहि काव्य आणि विनोद राहूं शकतो, नाहीं असें नाहीं; पण अशा गोष्टी विरळाच असतात. वाङ्मयविकासांतील धड्यांची निवड करितांना त्यांतील वाङ्मयीन गुणांना जसें प्राधान्य दिलें आहे, तसेंच त्यांतील आशयाच्या सुंदरतेकडेहि लक्ष पुरविलेलें दिसून येईल.

प्राचीन मराठी वाङ्मयांतील एकविधतेचा दोष गेल्या पाऊणशें वर्षांत निर्माण झालेल्या मराठी वाङ्मयास लागू पडत नाहीं. इंग्रजी आणि इतर पाश्चात्य वाङ्मयाचा मराठीवर झालेला तो परिणाम होय. एखाद्या भाषेला दुसऱ्या भाषेच्या अनुकरणामुळें कांहीं विशिष्ट नव्या गोष्टींचा लाभ होतो. त्याबरोबरच ती परावलंबीहि बनण्याचा संभव असतो. मराठींत आज लघुकथा, लघुनिबंध, भावगीत, सुनीत, नाट्यछटा इ. वाङ्मयप्रकार विशेष रूढ झाले आहेत, ही भाषेच्या दृष्टीनें अनुकूल गोष्ट होय. वरील विशेषांचा यथायोग्य अभ्यास करून, त्यांत स्वतःचें तंत्र निर्माण करणारे प्रतिभाशाली लेखकहि आपल्या मराठींत आहेत. त्यांनीं लिहिलेले वरील वाङ्मयप्रकारांचे नमुने प्रत्येक पुस्तकांत घेतले आहेत, आणि त्यांच्या संबंधींचें अधिक कुतूहल जागृत होण्याइतकी त्यांची तोंडओळख त्या त्या धड्याच्या शेवटीं करून दिली आहे.

आपणाकडील प्राचीन वाङ्मयसेवकांचें ध्येय बहुशः मानसिक पावित्र्य मिळविणें आणि आत्मशुद्धि करणें असेंच होतें. कालानुसार व्यक्ति आणि समाज विशिष्ट ध्येयांनीं प्रेरित होतात; मात्र वाङ्मयाची कसोटी ज्या गुणांवर ठरवितात, ते गुण सर्वसाधारणपणें सर्वकालीं सारखेच असूं शकतात. कालावर अर्थातच वाङ्मयाचें सौंदर्य अवलंबून नसतें. आजच्या काळांतील एकादा लेखक केव्हांच प्राचीन झाला असेल, तर उलट प्राचीन काळांतील अनेक कवि आधुनिकांत जमा होतील. ही दृष्टि लक्षांत घेऊनच प्राचीन मराठींतील महानुभावीय कवींपासून तों शाहिरी वाङ्मयापर्यंत त्यांचें प्रतिनिधित्व राखिलें आहे. प्राचीन वाङ्मयांत निव्वळ मनोरंजनास महत्त्व कमीच; बोधाचेंच प्राबल्य अधिक. त्यामुळें 'रसहानि होत नाहीं ना?' हा प्रमुख विचार गंभीर प्रवृत्तीच्या लेखकांच्या उताऱ्यांची निवड करितांना मनांत ठेविलेला होता. प्रायः कोणताच गद्य-पद्य लेख वाङ्मयीन गुणांत हिणकस ठरूं नये हें धोरण वाङ्मयविकासांत दिसून येईल.

नीतिबोध किंवा जीवनाची पूर्वतयारी ह्या शिक्षणाच्या व्याख्या, आज शिक्षण म्हणजे जीवन-विकासच, या व्यापक लक्षणापर्यंत येऊन पोहोंचल्या आहेत. विद्यार्थी हा समाजाचा एक घटक आहे. आसपास होणाऱ्या वावटळींचे परिणाम त्याच्या विचारावरहि होतातच. आपणांसभोंवतीं काय चाललें आहे हें त्याला पाहूं नको म्हटलें तरी तो पाहात असतोच. मग आपण होऊनच समाजांतील आजच्या विचारसरणीचा त्याला यथोचित परिचय करून देणें इष्ट होणार नाहीं काय? एक तर ह्यामुळें त्यांना आपण विश्वासांत घेऊं शकतों, आणि त्यांनाहि त्यामुळें आपणांसंबंधीं जिव्हाळा वाटत राहातो आणि दुसरें त्यांच्या विचारांच्या विका-

सालां आपण मदत करतों. वाङ्मयविकासांतील पृथगात्म आणि विविध विषयांबरोबरच आजकालच्या परिचित विषयांची निवड वरील धोरणाला पोषकच होईल अशी खात्री वाटते.

स्थूलमानानें प्रत्येक पुस्तकांत भावगीत, सुनीत, वर्णनपर कविता, नाट्यगीत, कादंबरींतील उतारे, लघुकथा, लघुनिबंध, वर्णनात्मक आणि टीकात्मक निबंध, नाट्यछटा, विनोदपर लेख, बखरींतील उतारा, नाट्यप्रवेश, स्वभावचित्र, किंवा चरित्रात्मक निबंध इत्यादि वाङ्मयाचे प्रकार समाविष्ट केले आहेत. आवश्यक तेथें त्या त्या वाङ्मयप्रकाराची धड्याच्या शेवटीं थोडक्यांत ओळख करून दिली आहे. सर्वसाधारणपणें दोन अगर फार तर तीन येवढ्या कालविभागांत, धडा वर्गांत वाचून व्हावा अशी योजना आखिली आहे. धड्याचा अगर कवितेचा विस्तार, त्यांत अंतर्भूत झालेल्या विषयाच्या स्वरूपावर कमी अधिक ठेवावा लागला. दुय्यम शाळेंतून वरच्या वर्गांस मराठी या विषयाकरितां स्वतंत्र असे चार, फार तर पांचच, तास वांट्यास येतात. हें प्रमाण ध्यानांत आणून व शिक्षकमित्रांनाही ऐच्छिक निवडीला वाव ठेवून पुस्तकाचें आकारमान साधिलें आहे.

धडयाच्या शेवटीं दिलेल्या प्रश्नांचीं उत्तरें विद्यार्थ्यांकडून तोंडी अगर लेखी अशा दोन्ही प्रकारांनीं सोडवून घेतां येतील. परंतु आवश्यक लेखनांत त्यांचा समावेश करून घेणें न घेणें ही ऐच्छिक गोष्ट राहणार हें उघड होय. धडयांत योजिलेल्या प्रश्नांचें स्वरूप संकलनात्मक पद्धतीचें व विचारप्रवर्तक असावें म्हणून प्रयत्न केला आहे. प्रकृतिभिन्नतेमुळें धड्याकडे पाहण्याचा माझा आणि माझ्या शिक्षकमित्रांचा दृष्टीकोण एकसारखाच असूं शकेल असें नाहीं; त्यामुळें त्यांच्या स्वतंत्रतेस पूर्ण वाव आहेच.

किंबहुना अभ्यासाच्या पाठांत त्यांनीं अधिक भर टाकिल्यास त्यांना त्यांत वैचित्र्य राखितां येईल. धड्यांतील विविधता, भाषा-विकास आणि अनुक्रम ह्यांची योजना करितांना, परिचितांतून अपरिचिताकडे विद्यार्थ्यांस जातां यावें, हेंच ध्येय दृष्टीपुढें ठेविलें होतें. 'अभ्यास' या सदरांतहि 'संवाद', 'निबंधलेखन', 'नाट्यप्रवेश', 'वाक्यविस्तार', 'रसग्रहण' इ० लेखनप्रकार सूचित केले आहेत, ते विद्यार्थ्यांकडून यथोचित लिहून झाल्यास त्यांच्या लेखनपद्धतींत खात्रीनें विकास होईल अशी दृढ समजूत आहे.

वाङ्मय–विकासाच्या प्रत्यक्ष उभारणीसंबंधींचें हें निवेदन संपविण्यापूर्वी एक दोन गोष्टींचा उल्लेख करणें आवश्यक आहे. वाङ्मय–विकासाची कल्पना ज्यांच्या मदतीमुळें आज मूर्त-स्वरूपांत येत आहे, अशा विद्यमान लेखकांना, कवींना आणि ग्रंथ-प्रकाशकांना उद्देशून आरंभींच जें विनंतीपत्र पाठविण्यांत आलें होतें, त्यांत आणखी एक उद्देश सूचित केला होता. "आजच्या मराठीचें सर्वांगीण स्वरूप व तिचा झालेला विकास, हा विद्यार्थ्यांच्या लक्षांत सहजासहजीं यावा, या हेतूनें प्राचीन व अर्वाचीन ग्रंथकार व कवि यांच्या प्रातिनिधिक स्वरूपाच्या लेखांचा व काव्यांचा वरील पुस्तकांतून (वाङ्मय–विकासांतून) समावेश व्हावा अशी आमची फार इच्छा आहे" हाच तो उद्देश होय. हा उद्देश कितपत तडीस गेला आहे, हें आपण ठरवालच; तरी पण आम्हांस लिहिण्यास अतिशय आनंद वाटतो कीं, वरील इच्छेला मोठाच मान देऊन सर्वांनीं आम्हांस उपकृत करून ठेविलें आहे. त्या सर्वांचा वैयक्तिक नामनिर्देश येथेंच केल्यानें त्यांच्या ऋणाची फेड होत नाहीं. वाङ्मयविकासाच्या सौंदर्याचे तेच खरे धनी;

या कामीं कांहीं उणेपणा राहून गेला असल्यास तो दोष आमचा. त्यांचे मनःपूर्वक आभार मानण्याचें पवित्र कर्तव्य करीत असतां आम्हांस अतिशय आनंद होत आहे.

जवळ जवळ गेलीं दोन वर्षें वाङ्मयविकासाच्या कार्यांतील आनंद मिळविण्याची संधि ज्यांच्यामुळें मला मिळाली, त्या प्रकाशकांचे मी मनःपूर्वक आभार मानतों.

प्रेमळ व अनुभविक चित्रकार श्री. पुरंदरे यांनीं तत्परतेनें करून दिलेल्या चित्रकलेस्तव आम्ही त्यांचे अत्यंत ऋणी आहोंत.

आमच्या शाळेंतील शिक्षकमित्र व मुख्याध्यापक आमच्या या प्रयत्नास उत्तेजन देतील व यासंबंधीं कांहीं सूचना असल्यास, त्या पाठवून आम्हांस मदत करतील, अशी आशा व्यक्त करून हें प्रास्ताविक निवेदन संपावितों.

मुंबई,
ता. १।३।३९

वामन भार्गव पाठक.

---

# अनुक्रमणिका



# १. कवितेचें प्रयोजन.

ओळखः—कै. केशवसुत ( इ. स. १८६६–१९०५ ) ह्यांचें सबंध नांव कृष्णाजी केशव दामले. चिपळूणकर व आगरकर यांनीं आपले सडेतोड विचार आणि मोहक भाषाशैली, ह्यांमुळें ज्याप्रमाणें आधुनिक मराठी गद्याला महत्त्व मिळवून दिलें, त्याचप्रमाणें कै. केशवसुत यांनीं आपल्या प्रतिभासामर्थ्यामुळें आणि स्फूर्तिप्रद विचारसरणीमुळें आधुनिक मराठी कवितेंत महत्त्वाची भर टाकिली. त्यांची सर्वच कविता एक प्रकारें 'जीवनावरील टीका' वाटते. इंग्रजी वाङ्मयाच्या–विशेषतः त्यांतील कवींच्या–अध्ययनाचा जरी त्यांच्या काव्यावर परिणाम झालेला दिसून येतो, तरी त्यांचें काव्य, स्वतःच्या अनुभवावर व परिस्थितीवर उभारलेलें असल्यामुळें, तें जिवंत व हृदयस्पर्शी वाटतें. जीविताकडे पाहण्याचा आपला दृष्टिकोण त्यांनीं आपल्या काव्यांत स्पष्ट केला आहे. सामाजिक अन्याय आणि रूढ कल्पना, त्याचप्रमाणें राजकीय गुलामगिरी, यांवर त्यांनीं आपल्या काव्यांत टीका केली आहे. ( उदा० त्यांची तुतारी, स्फूर्ति, नवा शिपाई इ. काव्यें पहा. ) भावना, कल्पना आणि विचार, यांचा संगम त्यांच्या काव्यांत झालेला आढळतो; मात्र त्या मानानें त्यांची भाषा बोजड वाटते. तथापि ती कृत्रिम आहे, असें नव्हे.

त्यांचें शाळेंतील शिक्षण पूना हायस्कूल व न्यू इं. स्कूल ह्यांमध्यें झालें. पुढें ते खानदेशांतील फैजपूर व नंतर भडगांव येथें इंग्रजी शाळेंत शिक्षकाच्या नोकरीवर होते. 'अमुचा प्याला दुःखाचा डोळे मिटुनी घ्यायाचा !' असे खेदोद्गार जरी त्यांनीं आपल्या जीविताच्या अनुभवावरून प्रगट केले होते, तरी "माझ्या दुर्मुखल्या मुखामधुनियां चालावयाचा पुढें–आहे सुंदर तो सदा मधुर वाङ्निष्यन्द चोंहीकडे" हेच त्यांचे

उद्गार अखेरीस खरे ठरले. त्यांचा कवितासंग्रह, त्यांचे पुतणे श्री. प. चिं. दामले यांनीं नुकताच प्रसिद्ध केला आहे, तो वाचा म्हणजे त्यांचें जीवन-रहस्य तुम्हांला समजेल.

विषयः—केशवसुतांच्या वेळीं काव्याला जेवढा मान असावा तेवढा नव्हता. यांत्रिक सुधारणा काव्याला विघातक ठरणार हें मेकॉलेचें मत चिपळूणकर यांनीं सुद्धां मान्य केलें होतें; त्यामुळें 'कवितेचें प्रयोजनच काय !' असा प्रश्न कित्येक रसिकांच्यापुढें उभा राही. वास्तविक काव्य हें बाह्य विषयांवर अवलंबून नसून, तें अंतःकरणामधून प्रकट होतें, एवढी गोष्ट ध्यानांत ठेवल्यास, जगांत काव्यें चिरंतन राहाणार हें लक्षांत येतें. केशवसुतांनीं काव्याचें समर्थन कशा रीतीनें केलें आहे तें पाहा, म्हणजे वैयक्तिक महत्त्व दाखविण्याकरितां नव्हे, तर राष्ट्रांतील कवीचें स्थान कोणतें तेंच उघड करण्याकरितां त्यांनीं खालील सरस श्लोक लिहिले, असें तुम्हांस वाटेल.

"शान्तीचें घर सोडुनी प्रखर त्या हाटीं प्रयत्नाचिया,
प्रीतीचाहि निकुंज सोडुनि रणीं जीवित्व नांवाचिया,
सर्वांहीं सरसावणें झटुनिया हें प्राप्त झालें असें;
या वेळे न कळे कवे ! तुज सुचे गाणें अहा रे कसें !" १

"माता ही सुजला स्वभूमि सुफला, तीच्या परी लेंकरां
खायाला पुरतें पहा नच मिळे कीं हाल आहे पुरा;
झांकायास तनूस वस्त्रहि न तें आतां पुरेंसें मिळे;
या वेळेस कसें कवे ! तुज सुचे गाणें न मातें कळे !" २

हें कोणीं म्हणतां जवें कविमनीं खेदोर्मि हेलावल्या,
नेत्रांतून सवेंचि बाष्पसरिता वाहावया लागल्या;
त्याचा स्त्रैणपणा असा प्रकटला वाटेल कोणा, परी
धीरोदात्त असेचि तो श्रुत असे हें दूरही भूवरी ! ३

सोन्याचे सरले अहा ! दिवस ते; आली निशा ही कशी
सौख्याचा नद तो सुकून पडलों या दुःखपंकीं फशीं !
कालक्रीडित हें बघून रडला, हें व्यस्त कांहीं नसे;
प्रौढत्वीं निज शैशवास जपणें बाणा कवींचा असे. ४

बाष्पान्तीं तरलस्वरें मग कवी निश्वासुनी बोलिला–
जो पूर्वी गुण पुण्यभूमिवरि या अत्यन्त वाखाणिला,
तें हें दिव्य कवित्व दुर्विधिवशें हीनत्व कीं पावलें,
त्याची बूज करावया न अगदीं कोणी कसें राहिलें ! ५

गाणें जें परिसावया कविपुढें राजेशही वांकले,
यन्त्रादेंच लहान थोर सगळे गुंगून वेडावले,
त्याला मान नसे, नसो पण, अतां त्याची अपेक्षा नसे–
हें कोणीं म्हणतां विषाद अहिसा मन्मानसाला डसे ! ६

आलेल्या दुरवस्थितींतुनि तुम्ही उत्तीर्ण व्हाया जरी
उद्योगीं रत व्हावया धरितसां औत्सुक्य चित्तीं, तरी
गाण्यानें कविच्या प्रभाव तुमचा वर्धिष्णुता घेइल.
स्फूर्तीचा तुमच्या पिढ्यांस पुढल्या साक्षी कवी होइल ! ७

हातीं घेउनियां निशाण कवि तो पाचारितो बांन्धवां–
'या हो या झगडावयास सरसे व्हा मेळवा वाहवा !'
प्रेतेंही उठवील जी निजरवें, ती तो तुतारी करी–
आतां नादवती, निरर्थ तर ती त्याची कशी चाकरी ? ८

आशा, प्रेम, तसेंच वीर्य कवनीं तो आपल्या गाइल;
गेलें वैभव गाउनी स्फुरण तो युष्मन्मना देइल,
द्या उत्तेजन हो कवीस, न करा गाणें तयाचें मुकें;
गाण्यानें श्रम वाटतात हलके, हेंही नसे थोडकें; ९

आतां जात असे दुरी शिथिलता अस्मत्समाजांतुनी,
याची खूणच गान जें निघतसे तें साच जाणा मनीं;
तारा ताणिलियावरी पिळुनियां खुंटयांस वाद्याचिया,
त्यांच्यांतून अहा ! ध्वनी उमटती जे गोड ऐकावया !" १०

—केशवसुत.

टीपाः—अहिसा—सापाप्रमाणें. निजरवें—आपल्या शब्दानें. व्यस्त—उलटें, विपरीत.

प्रश्नः—काव्याची उत्पत्ति आणि समाजस्थिति ह्यांमध्यें कोणता संबंध असतो ? कवीचें गाणें ऐकण्यास राजेशाही वांकले ह्या म्हणण्यास आधार कोणता ? इंग्लंडमध्यें कवीला राजाश्रय असतो, अशा कवींचीं नांवें सांगा. तुम्हांस ज्यांच्या कविता आवडतात अशा आजच्या कवींचीं आणि त्यांच्या कांहीं कवितांचीं नांवें लिहा.

अभ्यासः—कवि आणि रसिक यांच्यांतील आपापल्या श्रेष्ठतेसंबंधींचा चाललेला वादविवाद एका संवादांत लिहा. श्लोक ४ व ९ यांतील अलंकारांचीं नांवें, लक्षणेसहित सांगा.

पुरवणीवाचनः—रे. टिळक यांची 'पहा उघडिलें हृदयाला' ही कविता वाचा. त्याचप्रमाणें चंद्रशेखर या कवींनीं साहित्यिकांस जो 'कवि-संदेश पाठविला होता, तो वाचा. 'बी' नांवाच्या आधुनिक कवींनीं रसिकाला उद्देशून खालील ओळी लिहिल्या आहेत.

महाराष्ट्रकवि–परंपरा । खंड न पडला तिला जरा
उणीव रसिकांचीच परी । आज वाटते खरोखरी.

# २ खरा हिंदुस्थान हाच काय ?

**ओळखः**—प्रो. ना. सी. फडके ( जन्म इ. स. १८९४ ). हे आ सामाजिक कादंबरीकार म्हणून चांगले प्रसिद्ध आहेत. विशेषेकरून सुशिक्षित व्यक्तींचीं स्वभाव-चित्रें रंगविण्यांत त्यांचा हातखंडा आहे. दौलत, जादुगार, अटकेपार, आशा, प्रवासी, समरभूमीवर इ. त्यांच्या कादंबऱ्या आणि गुजगोष्टी, प्रतिभा-साधन, वाङ्मयविहार इ० त्यांचीं निबंधात्मक व टीकात्मक पुस्तकें प्रसिद्ध आहेत. लघुकथालेखक, मार्मिक टीकाकार, लघुनिबंधकार आणि प्रभावशाली वक्ते म्हणूनहि ते रसिकप्रिय आहेत. इ. स. १९२१ सालीं महात्मा गांधींनीं जी असह-कारितेची चळवळ सुरू केली, त्या प्रसंगाच्या आधारावर त्यांनीं नुकतीच 'प्रवासी' या नांवाची कादंबरी प्रसिद्ध केली आहे. राजाभाऊ या नांवाच्या एका सुविद्य आणि कलावंत तरुणाच्या आयुष्यांतील स्थित्यंतरें या कादंबरींत लेखकानें तन्मयतेनें रेखाटिलीं आहेत.



**विषय**—आपल्या वडिलांनीं बांधिलेल्या शिवमंदिराच्या भेटीकरितां राजाभाऊ एका खेडेगांवांत येतो. ते दिवस पिकांच्या हंगामाचे असल्या-मुळें नदीकांठावर आणि इतरत्र विशेषच शोभा दिसून येते. वास्तविक राजाभाऊसारख्या काव्यमयवृत्तीच्या तरुणाला, त्या देखाव्यानें अलौकिक आनंद व्हावयास पाहिजे; पण उलट दुःखाचा विसर पडावा म्हणून तो

ज्या ठिकाणीं येतो, तेंच ठिकाण त्याच्या मनांत विचारांची क्रान्ति घडवून आणण्यास कारणीभूत होतें. निसर्गाच्या पार्श्वभूमीवर लेखकानें राजाभाऊच्या मनांतील विचारांचें केलेलें चित्रण आणि सभोंवतालच्या वातावरणाशीं त्याच्या वृत्तीचा दाखविलेला विरोध खालील उताऱ्यावरून तुमच्या लक्षांत येईल.

शिशिरऋतूचे अखेरचे दिवस होते ते. रात्री मोठ्या होत्या, दिवस लहान वाटत. कधींमधीं कडक थंडी पडे. रात्रीं वाहाणारा वारा गारठ्यानें भरलेला असे आणि दुपारच्या वेळीं मध्येंच कुठेंतरी जोराची वावटळ उठे; ती धूळ, पाचोळा, चिंध्या, काय सांपडेल तें गोळा करून चक्राकार फिरून आकाशांत थोडीशी उंच भरारी घेई आणि पुढें जाई. गांवाच्या आसपास कुठें कुठें उभ्या असलेल्या पिकांवरही पिवळा रंगच बहुतांशीं पसरलेला दिसे आणि हरबऱ्यांचीं ठेंगणीं ठेंगणीं झुडुपेंच काय तीं आपला काळसर हिरवट रंग डौलानें दाखवीत. गांवांतल्या आणि आसमंतांतल्या मोठमोठ्या झाडांच्या फांद्या पर्णहीन दिसत; आणि आपल्या देहावरून गळलेलीं जुनीं शुष्क पानें वाऱ्याच्या लोटाबरोबर धुळींत मिसळून इकडे तिकडे उडालेलीं पाहाण्याच्या दुःखानें ते वृक्ष अधिकच उदास झाल्यासारखे वाटत. पण आतां वसंतऋतूलाहि फारसा अवकाश नव्हता; आणि ऋतुराजाच्या आगमनासाठीं अधीर झालेली सृष्टि, त्याच्या स्वागताची जी तयारी करीत होती, तिचीं चिन्हें ठिकठिकाणीं दृष्टीस पडत. पिंपळाच्या झाडावर मध्येंच एकाद्या शाखेला नवपल्लव फुटलेले दिसत आणि सूर्यप्रकाशांत तीं लालसर छोटीं पानें हाललीं कीं, मोठी गंमत वाटे. आम्रवृक्षांना नवतीचा कोंवळा मोहर फुटूं लागला होता आणि त्यांच्या किंचित् आंबट पण मधुर सुगंधाची बातमी, दूर दूर पसरविल्यावांचून वाऱ्याला राहावत

नसे. गांवच्या सीमेवरच्या राईत, मधूनच 'कुहू' करणाऱ्या कोकिलेचें संगीत कधींमधीं कानांवर पडे आणि कोठून तरी येणारीं अन् कुठेंतरी जाणारीं लहानसहान पांखरें आपल्या थव्यांच्या निरनिराळ्या आकृति बनवीत अंतराळांतून जातांना जो चिवचिवाट करीत, तो ऐकला कीं वाटे, यांना वसंताच्या आगमनाची बातमी खचित समजली आहे !

सृष्टीच्या या रमणीय क्रीडा दृष्टीस पडल्या कीं, राजाभाऊला कांहीं एका विलक्षण गूढ समाधानाचा प्रत्यय येई. आपल्या निराशेचा आणि कटु अनुभवाचा दाह शांत व्हावा, या हेतूनें राधाबाईचें स्मृतिस्थान असलेल्या या गांवीं तो येऊं लागला होता; आणि जितका अधिक वारंवार या गांवीं तो आला होता, तितकं अधिकाधिकच त्याला यावेंसें वाटत गेलें होतें.

मात्र त्याच्या अंतःकरणाला दुसरीच एक जखम व्हावयास लागली होती. एका नवीनच दुःखाचा आघात त्याच्या मनावर होऊं लागला होता.

कारण शिशिर आणि वसंत या दोन ऋतूंच्या संधिकालांतलें सृष्टीचें रमणीय स्वरूप पाहून, त्याच्या निराश आणि उदास अंतःकरणाला शांति मिळे खरी, पण त्या खेडेगांवांतल्या मांणसांचा नित्यनैमित्तिक व्यवहार जों जों त्याच्या दृष्टीस अधिकाधिक पडे आणि स्वभावानेंच चिकित्सेखोर असलेलें त्याचें मन त्याविषयीं जों जों अधिकाधिक विचार करी, तों तों त्याच्या मनःशांतीला अधिकाधिक मोठमोठे धक्के बसत.

गांवचे सारे लोक दारिद्र्यांत पिचत पडलेले त्याला स्पष्ट दिसत. त्याच्या वडिलांनीं बांधलेलें शिवमंदिर सुंदर होतें. तिथें दर्शनासाठीं

येणारी प्रत्येक व्यक्ति प्रार्थनेसाठीं हात जोडून डोळे मिटतांना कोठल्या तरी गुप्त तीव्र दुःखाचे उसासे टाकीत आहे, असा त्याला



भास होई. गांवच्या नदीचें पाणी मुबलक नसलें तरी गोड आणि सुंदर होतें, पण त्या पाणवठ्यावर येणारे सारे जीव, इतकेंच नाहीं, तर तीं मुकीं जनावरेंसुद्धां गांजलेलीं दिसत. शेतावर हिरव्या पिवळ्या रंगांची शोभा दिसे; पण तीं शेतें करणारे शेतकरी संध्याकाळीं आसुड खांद्यावर टाकून घरीं परत चालले, कीं त्यांच्या गतींत मंदता दिसे आणि बोलण्यांत आशा आणि उत्साह यांपेक्षां निराशा आणि वैतागच अधिक ऐकूं येई. जिकडे तिकडे दारिद्र्य माजलें होतें. शेतकऱ्याला सावकार पिळीत होता, सावकाराला अधिकारी छळीत होते, कनिष्ठ अधिकाऱ्याला वरिष्ठ अधिकारी छळीत होते ! शेतकरी भीतीनें गांजले होते आणि पाटील-कुळकर्णी तरी भीतीपासून मुक्त कुठें होते ! जो तो खालच्याला खात होता,

आणि वरच्याचें भक्ष्य होऊन बसला होता. प्रत्येकजण कुणाच्या तरी भीतीनें घाबरलेला होता; आणि सर्वांत दुःखदायक गोष्ट ही कीं, या दारिद्र्याचा, गांजणुकीचा आणि भयाचा खरा उगम कुठें आहे, तें कुणालाच कळत नव्हतें......

तें सारें पाहून राजाभाऊच्या मनांत येई, हिंदुस्थानांतल्या लक्षावधि खेड्यांची हीच अवस्था असेल काय ?......



खरा हिंदुस्थान हाच काय ?......

अन् असेल तर याच्यावर उपाय ?......

आपल्या अंतःकरणांतलें दुःख विसरण्यासाठीं त्या खेडेगांवांत आलेला राजाभाऊ एकदम निराळेच विचार करूं लागला.

या त्याच्या क्रांतीचें कदाचित् हेंहि एक कारण असेल, कीं, त्याच सुमारास सबंध देशांत राजकीय जागृतीचे वारे जोरानें वाहूं लागले होते. इतक्या जोरानें, कीं वैयक्तिक प्रेमद्वेषांत आणि आशानिराशेंत गढून न बसतां, आपल्या खंडतुल्य विस्तीर्ण मायदेशाच्या सुखदुःखाशीं समरस होण्याचा हा समय आहे, असें प्रत्येक सुबुद्ध माणसाला वाटावें.

राधाबाईचें स्मृतिमंदिर ज्या गांवांत होतें तिथली परिस्थिति

पाहून राजाभाऊला नेहमीं वाटत होतें, या लोकांना स्वतःची दुर्दशा समजणार केव्हां? पण गांधींच्या सत्याग्रहाची घोषणा त्या गांवापर्यंत पोंचतांच त्यांनाहि आपल्या दुर्दशेची एकदम जाणीव झाली आणि त्या दुर्दशेवर काय इलाज केला पाहिजे, तेंहि एकदम त्यांच्या धानांत आलें.

सत्याग्रह !

आजपर्यंत झोपलेल्या, आळसलेल्या अशा त्या लहानशा गांवांत तो एकच शब्द जिकडे तिकडे ऐकूं येऊं लागला. बाजारांत, देवळांत, पाणवठ्यावर, शेतावर–जिकडे तिकडे !

तें पाहून राजाभाऊला विलक्षण समाधान झालें.

सत्याग्रह सुरू झाल्यावर आपण त्यांत सामील व्हायचें असा राजाभाऊच्या मनाचा निश्चय झाला. त्याच्या वृत्तीचा धर्मच असा होता कीं, कशावरून तरी जीव कुरबान करून टाकावा, कुठें तरी भावनांचें अनन्यत्व जडवावें, विवेकाच्या संथपणापेक्षां अविवेकाची उत्कंठा व त्वरा अनुभवावी !......

प्रश्न—ऋतुराजाच्या आगमनाची तयारी सृष्टि कोणत्या प्रकारानें करीत होती? राजाभाऊनें या स्वागत–समारंभांत कां भाग घेतला नाहीं? संध्याकाळीं घराकडे वळणाऱ्या शेतकऱ्यांच्या मनांत काय काय विचार येत असतील? शेतकऱ्यांच्या दुःखाचा उगम कशांत होता? राजाभाऊला त्याचा उलगडा केव्हां आणि कसा झाला? त्याचें निराकरण त्यानें कोणत्या रीतीनें करण्याचें ठरविलें?

**अभ्यास**—दत्त कवीनें आपल्या कोकिलकूजित या कवितेंत कोकिला वसंतरायाचें स्वागत कसें करितें, हें दाखविलें आहे. ती म्हणते–"वसंतराया येईल आतां तुम्हां भेटाया। राजदर्शना सज्ज रहावें आलें सांगाया। बालतृणाचे रम्य गालिचे वनांत पसरावे। विविध फुलांचे सडे तरूंनीं

मार्गी चालावे." कोकिलेच्या या वृत्तीशीं राजाभाऊ समरस झाला असता का ! केव्हां !

**पुरवणीवाचन**—कै. ह. ना. आपटे, यांच्या 'कर्मयोगी' व मी आणि प्रो. फडके यांच्या 'प्रवासी' व 'समरभूमीवर' या कादंबऱ्या वाचा.

---

# ३. हिरावाडी.

**ओळखः**—कै. चंद्रशेखर शिवराम गोऱ्हे (१८७१-१९३४). हे वाङ्मयाचे एकनिष्ठ उपासक होते. त्यांचें सर्व आयुष्य बडोद्यास कारकुनी पेशाच्या सरकारी नोकरींत गेलें. त्यांचें काव्य लिहिण्याचें व्रत अखंड चालू होतें. 'कावाडकष्ट दिनभर करोनिया रुक्ष अन्न सेवावें । रात्रींहि जागुनी निजकवितांनीं देशबंधु सेवावे ।' या आपल्या स्वतःच्या उद्गारांप्रमाणेंच ते नेहमीं वागत आले. शेवटीं त्यांच्या श्रमाचें चीज झालें. बडोदे सरकारच्या आश्रयाखालील 'राजकवि' असा त्यांचा गौरव झाला आणि त्यांना साहित्यवेतनहि मिळूं लागलें. त्यांची कविता त्यांच्या परिश्रमाची साक्ष देते. 'कवितारति,' 'तारातरंग,' 'हिंदवंदना,' 'काय हो चमत्कार' इ० त्यांचीं काव्यें फार प्रसिद्ध आहेत. 'चंद्रिका' या पुस्तकांतून तीं संग्रहित झालीं आहेत. त्यांची भाषा रेखीव आणि सुबोध असते. स्वभावोक्ति हा तिचा गुण होय.

**विषय**—नासिकजवळील 'हिरावाडी' या ठिकाणीं कवीचें बालपण गेलें. कित्येक वर्षांनंतर आपल्या मायभूमीचें दर्शन घडल्यावर, कवीचें अंतःकरण अनेक प्रकारच्या भावनांनीं ओथंबून गेलें. त्या ठिकाणची निसर्गशोभा, बालमित्रांसह त्या ठिकाणीं केलेले स्वच्छंद विहार, ज्येष्ठबंधु वामनराव यांच्या स्मृतीशीं संबद्ध झालेला तो 'शेवगा' आणि काकूंचीं बोरकुटें, तेथील द्राक्षी, शाली, ऊस फार काय पण त्या ठिकाणचा प्रत्येक

अणुरेणु कवीच्या मनांत भावनांचें गोड काहूर माजविण्यास कारणीभूत झाला ! ही कविता वाचून झाल्यावर कवीप्रमाणेंच तुम्हांस 'मन रमलें, मी जाऊं अथवा येथचि राहूं सांग बरें ?' असें नाहीं का वाटणार !

हे नासिकच्या प्रिय स्थलांनो ! माझ्या आप्त सुहृज्जन हो !
निघवेना मज येथुनि परि हें अधिकाधिक मन खिन्न न हो
म्हणुनि जियेनें धात्रीभावें अन्नप्राशन मज दिधलें,
जातों दर्शन तिचें कराया, प्रेम असूं द्या हो पहिलें.
बहुदिवसांनीं पाहुनि मजला हे निजमाथे डोलविती,
बोलाविति मज कोकिल-शब्दें, आमंत्रण बहुमोल किती !
पसरुनि शाखाभुज मजला हे कवळाया किति उत्सुकले !
आलों आलों आम्रतरूंनो ! पुसतों तुमचीं मी कुशलें.
अरुणित पिवळे मोहर तुमचे गुंगति भुंगे ज्याभंवतीं,
रम्य छटांकित लोल फुलांचे बहर मुदें मज नाचविती;
विगलित 'शाका' मिळतां गमला अमृतफलांचा लाभ मला,
किति उल्हासें उतरुनि आंबे अविट सुरस तो सेवियला.
हे मधुरे, हे सत्त्वमये, तूं असिसि बरी ना रामफळी !
सु-रसालांशीं मिळुनि मिसळुनी राहसि ना तूं त्यांजवळीं ?
क्षेत्रपतीवरि छत्र असे तव, औदुंबर ! तें न हि ढळलें.
अंजीरांचें वैभव तुझिया विपुल फळांतुनि आढळलें.
आचाराचा अनुपम नमुना प्रतिदिवशीं तूं दाखविला,
सुमधुर शरबत-रस निज कविला निदाघकाळीं चाखविला;
हे निंबोणी ! विहिरीमध्यें डोकावुनि गे तूं कसला
सखोल करिसी विचार ? का तुज आंबट आंबा तो हंसला ?
तुजला बघतां मनोव्यथेचीं 'कंटकशल्यें बोथटलीं,'
सन्निध येतां तनुवरि माझ्या 'मखमालीची लव वठली' !

खिन्न न होई, तव गुण वानिति आयुर्वेद-विशारद ते,
एकाचि कंटकदोष तुझ्यांतिल सद्‌गुण करितिल गारद ते.
गे विहिरी ! हे थारोळ्यांनो ! चालति मोटा उभय थडी ?
तीनहि तुकडे भिजती काहो ? पाणी देतो कवण गडी ?
घायाळांच्या घराकडे तों बघतां हें मुख हिरमुसलें,
असति इथें जे अनोळखी ते, म्हणुनि तुम्हांला मीं पुसलें.
पूर्व परिस्थिति, परिचय माझा, आठवुनी का बुचकळलां ?
खिन्न निरुत्तर होउनि बसलां ? आशय तुमचा मज कळला.
चढतींपडतीं सुखदुःखें, हीं आळोपाळीं येति जगीं;
खेद न मानुनि भेटा, बोला, जिवलग माझीं मज अवघीं.
पान न गवसे फुलें-फुलें हीं डवरुनि गेला कंचन हो !
ह्या कुसुमांनीं न कळत सुंदर त्या कमलांचें वंचन हो.



वृष्टि फुलांची भूवरि, ह्यांची सजविति भाजी निज जन कीं,
अतिरेकानें मलयगिरीवर बनतो चंदन इंधन कीं !
हा एकुलता एकाचि हदगा बालवयीं दे थोर फुलें,
वरि उपरतिची पांडुरता, तरि आंत मजेचा रंग खुले;
नागफणींतुनि विष नसतां मृदु गंध, मरंदहि गोड किती !

आन्तर्गुण हे जाणुनि झुलती भृंग तयांतें गौरविती.
न शेवगा हा केवळ देशी, सत्त्वगुणास्तव ‘ हपूसचा ’
म्हणवित होता, परि म्हणणारा वामनराव नसे तुमचा !
शेंगांनो ! गुण असोनि, गुणिजन गुणज्ञ नसतां, जी कुदशा
भोगिति, आली आज तुम्हांला दुर्दैवानें ती विवशा.
गे बदरी ! मीं ह्याच ठिकाणीं मधुर फळें तव वेंचियलीं;
सेववलीं तीं सेवुनि माझ्या खेळगड्यांनाही दिधलीं.
रक्षक काकू उपवासास्तव बनवुनि ठेवी बोरकुटें,
उपास पडती, कूट दिसेना, काकू आहे तीहि कुठें !
पुष्पकरंडक–जीर्णोद्यानचि आज मला हें स्थल गमतें,
एके कालीं चैत्ररथाच्या करी मुलासम संभ्रम तें;
बहुपरिचे गुल्, गुलछब्बू, ते मुद्गर, झेंडू, जातिलता,
शेवंती, त्या द्विविधा तुलसी, सुरम्यतेची संकुलता.
जें लघु नंदन राखुनि ‘ म्हाळू ’ घरीं फुलांची रास करी,
हा हा ! वामन शिवरामांनो ! जमलें जंगल त्याजवरी !
ह्या वायूंतुनि वागति तुमचे प्राण यथोचित आदरुनी
त्यांतें, येतों येथिल ‘ तमसा ’–तीरावरि मन शांतवुनी.
जनतेपासुनि अलिप्त येथें ‘ वाघाडीचा ’ निर्झर हा
भिंगासम कीं सुजनमनासम दिसतो निर्मल केविं पहा.
उदकासरशा करवीरांच्या लवुनि डहाळ्या ज्या तरती
लाल धवल त्या सुमगुच्छांतें संथ जलावरि अंथरती.
बघुनि गमे कीं वनलक्ष्मीनें हें फुल–मंडळ मांडियलें,
निज सख्याची भेट म्हणोनी जलदेवीला तें दिधलें,
निर्झरिणी ! मी बालपणीं तव तीरीं रमलों विसांवलों.
डुंबुनि न्हालों, तव जल प्यालों, त्या लोभानें आकळिलों,

ह्या एकांतीं, शांत जह्यालें मन, तुज वंदुनि मी परतें,
गंगौघावरि लोभ तुझा जो, तोच असूं दे मजवरतें.
वडिलोपार्जित वसुंधरे ! हे जिराइतांनो ! वंदितसे,
तुमच्या अन्नें पोषियला जन तुम्हांस हा अभिनंदितसे;
द्राक्षी, शाली, ऊसहि, भाज्या, खुरासनी, भुयमूग बहू,
द्विदल, बाजरी बोरासम ती, पिकुनि झुले तो काय गहूं
गळति गुऱ्हाळें, गूळ बने जणु केशरमिश्रित ती बरफी
अये रसाले ! किति तुज वानूं ? हृदयाचें माझें मी अर्पी.
ह्या समयीं कवि लेंभे यांचा ‘ शेतकरी ’ मज आठवतो !
तो समदुःखी करुनि मला मम हृदयांतिल रस आटवतो ?
निज विरहाची कारणमाला,–नको उजळणी ती म्हणणें !
विविधें माझ्या भाळीं लिहिलें नव्हतें हें सुख अनुभवणें.
जे करिती वहिवाट, तयां दे हें सुख वैभव, मज नलगे !
हे भृंगाक्षी ! हे मीनाक्षी ! परि ममतेनें यांस बघें.
विमल सुगंधी वायुमिषें दे मातृमुखी ! मज चुंबन दे !
विहंगमांच्या गोड रवांनीं कविसंगें तूं गोड वदें.
विमल अहेतुक अनुरागानें अंतर सारें विरघळलें,
या समयीं तव मोल हिऱ्यांहुनि अमोल जें, मज तें कळलें.
मन रमलें; मी जाऊं अथवा येथचि राहूं ? सांग बरें !
चालुनि पुढतीं, बघतों मागें, नयनांतुनि हे झरति झरे.
प्रेम असूं दे, लोभहि ठेवीं देवी पुनरपि भेट घडो !
यावत् जीवित निज ममतेची घडी कदापि न ही बिघडो.

—चंद्रशेखर.

टीपाः—आचाराचा नमुनाः–१ वागणुकीचा प्रकार. २ अचार = लोणचें ( हिंदी भाषेंतील शब्द ). ३ आंबट आंबा–आंबट्या हा एक

आंब्याचा प्रकार आहे. तो पिकला तरी आंबट राहात असल्यानें, त्याचा उपयोग लोणचें करण्याकडे होतो. ४ कण्टकशल्यें बोंचटलीं, मखमालीची लव वठली । या दोन ओळी केशवसुतांनीं लिहिलेल्या 'झपूर्झा' या कवितेंतील आहेत. येथें कवीनें त्यांचा उपयोग, स्वतंत्र अर्थानें पण किती औचित्याला धरून केला आहे ! ५ एकच कंटकदोष तुझ्यांतिल–ही ओळ वाचतांना ( एको हि दोषो गुणसन्निपाते । निमज्जतीन्दोः किरणेष्विवांकः । ) या कालिदासाच्या वचनाची आठवण येथें तुम्हांस होईल. ६ दगडांनीं बांधिलेल्या ज्या कुंडींत मोटेचें पाणी एकदम पडतें, त्यास थारोळें असें म्हणतात. ७ हें स्थळ–मळ्यांतील फुलबाग. ८ चैत्ररथ–कुबेराच्या बगीचाचें नांव. ९ वाघाडीचा निर्झर–ओढ्याचें नांव. १० करवीर–कण्हेर. ११ सख्याची–मैत्रीची. लेंभे–( विठ्ठल भगवंत लेंभे–१८५०–१९२० ) सुरतरंगिणी, शोकावर्त इ. खंडकाव्यांचे जनक.

प्रश्नः—जन्मभूमीच्या ठिकाणीं आढळून येणाऱ्या कोणकोणत्या वस्तूंनीं कवीच्या मनांत निरनिराळ्या भावना उत्पन्न केल्या ? या काव्यांत कवीनें कित्येक फुलांचा व वृक्षांचा उल्लेख केला आहे, तो कशाकरितां ? कवीला कोणतें सुख आपणांस अनुभवितां आलें नाहीं म्हणून हळहळ वाटत आहे ?

**अभ्यास व पुरवणीवाचन**—केशवसुतांच्या 'एक खेडें' व 'नैर्ऋत्येकडील वारा' या कविता वाचा. २ मागील धड्यांत राजाभाऊ ज्या खेड्यांत जातो त्या खेड्याच्या वर्णनाशीं ह्या खेड्याचें वर्णन जुळतें काय ? फरक कोठें आहे ? तुमच्या स्वताःच्या खेड्याचें सहृदयतेनें वर्णन करा.

---

# ४. बाबू सुभाषचंद्र बोस

**ओळखः**—श्री. दिनकर वासुदेव दिवेकर ( जन्म इ. स. १८९८ ) केसरी व मराठा या संस्थेचे हे आजीव सेवक होत. हे १९२४ मध्यें एम्. ए. झाले. राजकारण हा यांच्या आवडीचा विषय. हे उत्तम वक्तेहि

आहेत. त्यांनीं थोर व्यक्तींचीं स्वभावचित्रें लिहिलीं आहेत. त्यांपैकींच खालील एक होय. बाबू सुभाषचंद्र बोस—१९२८ सालच्या कॉंग्रेसचे अध्यक्ष–ह्यांचें साद्यंत चरित्र त्यांनीं येथें दिलें नाहीं. उलट त्यांच्या लोकोत्तर गुणांचें जें चित्र लेखकाच्या मनावर सारखें तळपत राहिलें, त्याचें प्रकटीकरण त्यांनीं या स्वभावचित्रांत आत्मीयतेनें केलें आहे.

डेक्कन जिमखान्याच्या मैदानावरील प्रसंग. १९२८ सालच्या मे महिन्याचे दिवस होते. रात्रीचा समय. शुभ्र चांदणें पडलें होतें. येथें भरलेली महाराष्ट्र प्रांतिक परिषद् संपून महाराष्ट्रीय प्रतिनिधि-मंडळी श्रमपरिहाराचा फराळ वगैरे आटोपून मौजेनें एकत्र बसली होती. मांडवपरतण्याच्या निमित्तानें म्हणून स्वागताध्यक्ष कै. शिवरामपंत परांजपे बोलावयास उभे राहिले व त्यांनीं पहिलेंच वाक्य उच्चारलें तें हें; ‘ वर एक चंद्र प्रकाशत आहे आणि खालींहि एक चंद्र आज अधिष्ठित आहे ! ’ सहज सुचलेली उपमा परंतु खरोखरच अत्यंत अर्थपूर्ण व समर्पक होय. नांवानें सुभाषचंद्र तसे खाजगी व सार्वजनिक कार्यांत व वर्तनांत देखील. प्रत्यक्ष नामाभिधान व आचारविचार यांचें इतकें सादृश्य फारच क्वचित् दिसून येतें. एरवीं ‘ नांव सोनूबाई आणि हातीं कथलाचा वाळा ’ ही म्हण कशाला रूढ होती व कालिदासानें तरी ‘ परंतपो नाम यथार्थनामा ’ असा रघुवंशांतील स्वयंवर–वर्णनांतील एका राजाचा विशिष्ट



गौरव कशाला केला असता ? शेक्सपियरनें तिरस्कारानें विचारिलें कीं, नांवांतच काय आहे ? गुलाबाला कोणतींहि नांवें ठेविलीं तरी त्याचा सुवास कायमच. तथापि नांव, कर्तृत्व व स्वभाव यांचा उत्तम मेळ जमला तर त्यांत पराकाष्ठेचें स्वारस्य नाहीं, असें कोण बरें म्हणणार ? ‘ अधिकस्याधिकं फलं ’ हा जगाचा न्यायच होय. दुधांत साखर पडली, तर माधुर्य वाढणार व सोन्याला सुगंध प्राप्त झाला तर त्याच्या किंमतींत जास्त भर पडणारच.

सुभाषचंद्रांच्या वाणींत निरतिशय गोडी भरलेली आहे व त्यांची चालचलणूकहि चंद्राप्रमाणें शांत, प्रसादयुक्त व आल्हाद-दायक आहे. त्यांच्या तोंडून एकादा तरी दुसऱ्यास लागणारा शब्द बाहेर पडत असेल कीं नाहीं, याची शंका वाटते. कितीहि कामानें कंटाळले असले, तरी चेहऱ्यावर त्रासिकपणाची छटा नाहीं, अगर कपाळावर आठी चढावयाची नाहीं. सर्व आयुष्यच लोकसेवेला व राष्ट्रस्वातंत्र्याला वाहिलेलें असल्यामुळें लहान थोर अनेक व्यक्तींशीं सदैव बोलण्याचालण्याचा प्रसंग; पण पावसाळा अथवा सूर्यप्रकाशाला राजवाडा व झोपडी हा विधिनिषेध नाहीं, त्याचप्रमाणें यांचा स्वाभाविक गोडवेपणा व वाङ्माधुर्य यांचा प्रवाह अखंड चालूच. कलकत्त्यास त्यांच्या राहत्या बंगल्यांत तागाच्या गिरणींतील कामगार, जमशेटपूर येथील मजूर, विद्यार्थी व इतर तरुण लोक व शिष्ट नागरिक यांची सारखी पैरवी असावयाची; परंतु सुभाषबाबूंच्या जिभेला खळ नाहीं, आपलेपणानें व प्रेमानें बोलण्यांत कमतरता नाहीं, समोर बसलेला माणूस केव्हां निघून जातो आहे असें कधीं वाटलें नाहीं, कीं टेबलावरील किंवा मनगटावरील घड्याळाकडे चोरटी नजर नाहीं. बाहेरगांवीं गेले तरी तसेच. ते स्वतः दुसऱ्या कोणाकडे भेटावयास गेले तरी तीच

रीत. मुंबईस वुईटर रोडवरील बाबासाहेब जयकरांच्या बंगल्यांत दासबाबूंच्या स्नेहास स्मरून उतरले काय, कांतिलाल परेख यांच्या ऑपेराहाऊस शेजारच्या बंगल्यांत स्वतःची त्यांच्याशीं केंब्रिज येथील कॉलेजांतील मैत्री म्हणून उतरले काय, अगर पुण्यास अण्णासाहेब भोपटकरांच्या 'बलवंताश्रमांत' उतरले काय, त्यांच्याकडे येणाऱ्या-जाणाऱ्यांचा सतत ओघ असावयाचा. आश्चर्य असें कीं, एवढ्या जंजाळांत सुद्धां सुभाषबाबू जसा गृहस्थ येईल, तसें त्याच्याशीं संभाषण करीत राहावयाचे. त्यांतच जयकर यावयाचे, त्यांतच मजूर-संघाचे लोक यावयाचे, त्यांतच युवक संघाचे कार्यकर्ते तरुण सल्लामसलतीला यावयाचे, त्यांतच अमेरिकन बातमीदार तासन्तास त्यांच्याशीं उच्च राजकारणाची चर्चा करण्यास यावयाचे, त्यांतच हिंदी वर्तमानपत्रांचे प्रतिनिधि मुलाखत घेण्यास यावयाचे, त्यांतच फोटोग्राफर फोटो काढून घेण्यास यावयाचे; असे एक ना दोन, किती प्रकार वर्णावे ?

सुभाषबाबूजींचा कारभार मात्र अगदीं धिम्मेपणानें व शांत चित्तानें चालावयाचा. बिचाऱ्यांना घाई हा शब्दच ठाऊक नाहीं. दुसऱ्या दिवशींच्या प्रांतिक परिषदेच्या अधिवेशनासाठीं आदल्या रात्रीं १२ चे गाडीनें पुण्यास जावयास निघावयाचें; पण बारा वाजून पांच मिनिटें झालीं तरी हे राजश्री आपले बॅरिस्टर जिना व विठ्ठलभाई यांच्याकडे सावकाश गप्पा मारीत बसलेले. रात्रींच्या लाहोर एक्सप्रेसनें धुळयास जाण्यासाठीं निघावयाचे, पण बोरीबंदरावरून गाडी सुटण्यास अर्धा तास उरला, तरी या स्वारीचें गिरगांवांत जेवणच चाललेलें. शिवाजी-मंदिरांत सहा वाजतां व्याख्यान जाहीर झालेलें, पण टिळक-मंदिरांतून खासगी चर्चा आटोपून भोपटकरांकडे परत येण्यास साडेसहा झाले, तरी चटकन्

व्याख्यानास जाण्याऐवजीं धीरे धीरे त्यांचें मुखमार्जन होत असलेले. रोजचीं पत्रांचीं पुडकीं येऊन पडावयाचीं. त्यांचीं उत्तरें लिहिण्याची देखील फारशी घाई नसावयाची. एक दोन ताराच येऊन धडकल्या तर पाहावयाचें; नाहींतर आलेल्या पत्रांना उत्तराच्या अभावीं किंवा विलंबानें आपोआपच उत्तर मिळालेलें असावयाचें. या बाबतींत त्यांच्या बरोबरीचे पंडित जवाहरलाल एका टोंकाला व हे दुसऱ्या टोंकाला.

यासारखा विरोध दोघांच्या चालण्यांत व वक्तृत्वांतहि दृष्टोत्पत्तीस येतो. आग विझविण्यास जाणाऱ्या बंबाप्रमाणें जवाहलाल हे नेहमीं धावत असतात. त्यांचें भाषण चाचरत चाचरत व वाघ पाठीस लागल्यासारखें किंवा लवंगी फटाक्याची माळ पेटविल्यासारखें असावयाचें. शरीरयष्टि तेजस्वी असली तरी पोरसवदा खरीच. वागणूकसुद्धां थोडी बालिश व लाडिकपणाची म्हटली तरी कांहीं खोटें नव्हे. सुभाषबाबूंचें याच्या अगदीं उलट. देह भव्य; चेहेरा बुद्धासारखा गंभीरसत्त्व; अंगावर मोहक कांति; डोळ्यांत स्वातंत्र्यलालसेच्या पाण्याची चमक; गति आत्मविश्वासाची द्योतक व हत्तीसारखी मंद; प्रशमशुचित्वाशीं संवादी असा पांढरा स्वच्छ खादीचा बंगाली पोषाख. व्याख्यान प्रभुत्वाच्या उत्कर्षानें विनटलेलें; त्यांचे गुरुजी देशबंधु दास यांच्यासारखें पावसाळ्यांत घाटांत कड्यावरून खालीं पाणी कोसळावें तसें नाहीं; पंडित मालवीयांच्यासारखें जान्हवीतोयहि नाहीं; महात्मा गांधींच्यासारखें ‘लघुसंदशपदा सरस्वती’ अशा वर्णनालाहि पात्र होण्यासारखें नाहीं; राजगोपाळाचार्यांच्यासारखें मुद्देसूद व तीक्ष्ण नाहीं; मौलाना शौकतअल्लींच्यासारखें शब्दबंबाळ नाहीं; महंमद अलम किंवा पट्टाभी सीतारामय्या यांच्यासारखें महाबळेश्वराच्या किंवा

अंबोली घाटांतील पावसाप्रमाणेंहि नाहीं; तर वर्षाकाळीं बोरघाटाच्या निसर्गसौंदर्यामधून वाट काढीत काढीत वर येणाऱ्या डेक्कन क्वीनमधील प्रवासासारखें अथवा भुईनळ्यानें लावलेल्या शोभेच्या दारूच्या झाडासारखें.

देशाभिमानानें उद्दीपित झालेली, स्वार्थत्यागानें ललामभूत झालेली, स्वभावानें सर्वप्रिय झालेली, कृतीनें व यशानें महामान्य झालेली व भावी विजयाच्या आकांक्षेनें शुभसूचक भासणारी अशी ही लोकोत्तर मूर्ति दृष्टीस पडली, म्हणजे भवभूतीच्या नाटकांत माल्यवानानें काढलेलें भार्गवाचें चित्र कां बरें आठवणार नाहीं? दृढनिश्चयाचीं दर्शक अशीं जड व ठाम पावलें टाकीत चालतांना त्यांना देखलें म्हणजे 'धीरोद्धता नमयतीव गतिर्धरित्रीम्' ही कुशवर्णनाची ओळ मनांत येणारच. दासबाबू त्यांना वारंवार 'पोक्त तरुण' ( young old man ) असें गमतीनें संबोधीत, याचें स्मरण झालें म्हणजे "कौमारकेऽपि गिरिवद्गुरुतां दधानः" हा पुढला श्लोकचरण ओठावर साहजिकच यावा.

—दि. वा. दिवेकर.

[ स्वभावचित्रः—चरित्रलेखनाप्रमाणें थोर व्यक्तींचीं स्वभावचित्रें लिहिणें हाहि एक वाङ्मयप्रकार आहे. व्यक्तीची जीवितकथा सर्व बाजूंनीं दिग्दर्शित करणें म्हणजे चरित्र लिहिणें होय. स्वभावचित्रांत व्यक्तीच्या विशिष्ट गुणांचाच उल्लेख केलेला आढळतो. म्हणजे चरित्रांत स्वभावचित्र येणें शक्य आहे परंतु स्वभावचित्रांत 'चरित्र' समाविष्ट होईलच, असे नाहीं. लेखक थोर व्यक्तीच्या सान्निध्यांत असेल तर तिच्या आवडीनिवडी किंवा विशिष्ट लकबी, यांचें तो सूक्ष्म निरीक्षण करील आणि एका दृष्टिकोणांतून तो तिचें स्वभावचित्र रेखाटील. थोर व्यक्तीचें स्वभावचित्र

वाचून झाल्यावर, वाचकांस थोडक्यांत त्या व्यक्तीच्या मोठेपणाचें सर्व-साधारण स्वरूप ध्यानांत आलें पाहिजे. ज्याप्रमाणें दुर्बिणींतून लहान वस्तु मोठी दिसते, त्याचप्रमाणें थोर व्यक्तीच्या आंगांतील विशिष्ट अशा प्रकट किंवा सुप्त गुणांवर लेखक आपल्या सूक्ष्म निरीक्षणाच्या साहाय्यानें ठळक प्रकाश पाडतो आणि तिचें व्यक्तिमत्त्व उघड करतो. असें करि-तांना, क्वचित् त्याला अतिशयोक्तीचा, किंवा उपमादिकांचा उपयोग करितांना कल्पनेचा आधार घ्यावा लागतो. मात्र ही अतिशयोक्ति किंवा कल्पना, मूळच्या वर्ण्यविषयाला जितकी सोडून असेल तितकें स्वभावचित्र अधिक भडक म्हणजेच अयथार्थ होईल, आणि जितकी धरून किंवा जवळ असेल तितकें तें हुबेहूब आणि सत्यपूर्ण होईल. कल्पनेचा आधार घेऊनहि थोर व्यक्तीचें रहस्य यथातथ्य पण आकर्षक रीतीनें रंगविणें ही कला स्वभावचित्रांत लेखकास दाखवावी लागते. ]

टीपाः—१ रघुवंशांतील सहाव्या सर्गांत सुनन्दा ही आपल्या सखीच्या इन्दुमतीच्या–स्वयंवराप्रीत्यर्थ आलेल्या विविध राजांची तिला ओळख करून देतांना, मगध देशाचा राजा जो परंतप तो आपल्या नांवाप्रमाणेंच शत्रूला ताप देणारा आहे, असा तिच्याजवळ उल्लेख करिते.

—राजा प्रजारञ्जनलब्धवर्णः परंतपो नाम यथार्थनामा ।

( २ ) पैरवी = जाणेंयेणें, चर्चा.

**भवभूति** —एक प्रसिद्ध संस्कृत नाटककार. बापाचें नांव नीलकंठ, आईचें नांव जातुकर्णी. हा पद्मपूरचा राहाणारा होता. ( वऱ्हाडांत ) उज्जयिनी येथें याचें शिक्षण झालें. ‘ महावीरचरित,’ ‘ मालतीमाधव,’ ‘ उत्तररामचरित ’ हीं त्याचीं प्रसिद्ध नाटकें होत. त्याच्या ग्रंथांत मुख्यतः करुणरसच आढळतो. त्याला आपल्या कृतीचा यथायोग्य अभिमान होता.

**प्रश्न**—बाबू सुभाषचंद्र बोस यांच्या कोणत्या प्रभावी गुणाचा

उल्लेख येथें आला आहे ? त्यांच्या वक्तृत्वाशीं कोणकोणत्या थोर व्यक्तींच्या वक्तृत्वाची तुलना केली आहे ? या ठिकाणीं तुम्हांस अतिशयोक्तीचा भास होतो काय ? त्याचें समर्थन तुम्ही कसें कराल ? आरंभीं आलेल्या कै. परांजपे यांच्या भाषणांतील उल्लेखाचें मर्म काय ? लेखकाची भाषाशैली तुम्हांस कशी वाटते ? लेखकाचें संस्कृतवाङ्मयावरील प्रेम ठिकठिकाणीं उघड होतें... स्थळें दाखवा......

**अभ्यास**—( १ ) देशबंधु दास, जवाहरलाल नेहरू, पंडित मदनमोहन मालवीय, बॅरिस्टर जिना आणि विठ्ठलभाई पटेल ह्यांच्यासंबंधीं थोडक्यांत माहिती लिहा.

**निबंधलेखनः**—तुम्हांस प्रिय असलेल्या एखाद्या व्यक्तीचें स्वभावचित्र लिहा.

---

# ५. सोन्याची घेउनि करिं झारी

**ओळखः**—श्री. भास्कर रामचंद्र तांबे, ( जन्म इ. स. १८७४; मृत्यु १९४१). हे त्यांच्या वेळच्या विद्यमान कवींत मोठ्या मानाचें स्थान सुशोभित करीत होते. ते नुकतेच दिवंगत झाले. त्यांचें बहुतेक आयुष्य ग्वाल्हेर, इंदूर, देवास इ. उत्तर हिंदुस्थानांतील प्रमुख ठिकाणीं गेलें. महाराष्ट्रांतील रसिकांना त्यांची पहिली ओळख आनंद मासिकाच्या द्वारें कै. वा. गो. आपटे यांनीं करून दिली. त्यानंतर इ. स. १९२० सालीं प्रो. मायदेव यांनीं त्यांच्या कविता संकलित करून पुस्तकरूपानें प्रसिद्ध केल्या. तेव्हांपासून

प्रसिद्धिपराङ्मुख अशा ह्या कवींची एकसारखी वाहवा होत गेली. इ. स. १९२७ मध्यें ह्यांच्या कवितांचा दुसरा भाग श्री. दि. गं. केळकर ऊर्फ अज्ञातवासी यांनीं छापून प्रसिद्ध केला व इ. स. १९३५ मध्यें या कवीच्या साठाव्या वाढदिवसाच्या स्मरणार्थ प्रो. मा. त्र्यं. पटवर्धन यांनीं त्यांचा समग्र काव्यसंग्रह संपादून तो रसिकांस सादर केला.

श्री. तांबे यांचें काव्य त्यांच्या जीवनाशीं संबद्ध झालें आहे. "माझ्या कवितेचा हा एक विशेष आहे कीं, तिची वाढ माझ्या जीवनाच्या संगतीनें झाली आहे......माझ्या कवितांचा आधार येथून तेथपावेतों समाजाच्या अन्तर्बाह्य अवलोकनावर आहे" असें स्वतःच्या कवितेसंबंधींचे त्यांचे उद्गार आहेत. 'रुद्रास आवाहन,' 'अशांचे कोण करिल तरि काय,' 'वाटलें नाय हो तुम्ही उतरतां खालीं' इ. राष्ट्रीय स्वरूपाच्या आणि 'रिकामे मधुघट,' 'घर राहिलें दूर' इ. त्यांच्या इतर विषयांवरील अनेक कविता चित्तवेधक आहेत.

विषय—सोबतची कविता त्यांना एका प्रातःकाळीं ( इंदूर, ३ नोव्हेंबर १९२० ) सुवर्णमय उषेच्या दर्शनानें स्फुरली—रमणाच्या मन्दिरांत सोन्याच्या झोपाळयावर 'पहाटे' ला गोड गाणें गाऊन 'निद्रा' देवी झुलवीत आहे आणि मग 'पहाट' जागी होऊन पृथ्वीतलावर, तारकांच्या पुंजांतून आणि अंधारांतून मार्ग काढीत, मानवाला जागें करण्यास येत आहे, अशा या कवितेचा कल्पनारम्य आशय आहे. शब्दांचें माधुर्य, आणि कल्पनांचें सौंदर्य या दोन गोष्टी या कवितेंत तुम्हांस आढळतील. रात्रीचा 'दाट घोर तम' आणि पहाटेची 'सुवर्णकान्ति' यांच्यांत दिसून येणारा विरोध कसा दाखविला आहे, तो पाहा.

सोन्याची घेउनि करिं झारी
ये आज पहाट, उभी दारीं.

करतल पदतल कोमल रक्तिम
गुलाब फुलले जसे मनोरम;
सुवर्णकान्ती फाके अनुपम
ही आज मला हाका मारी.

" रमणाच्या सोन्याच्या मन्दिरिं
सोन्याच्या रे झोपळ्यावरि
निजलें, झुलवी निद्रासुंदरिं
मज गाउनि गाणें जरतारी

रमण म्हणे, जा ऊठ पहाटे
बाळा रुतति विदेशीं कांटे
स्मरतां त्यास कसेसें वाटे
ने अमृत भरें जें भाण्डारीं

घोर तमाच्या दाट घटांतुनि
क्रमित वाट तारक-जालांतुनि
चालत आलें बघ ठेचाळुनि
रे उभी तुझ्या मी शेजारीं.

धुन्दि तुझ्या परि अजुनी नयनीं
जाम्भया कशा देशी पडुनी ?
उघड नयन, जा अमृत घेउनी
कां निजशि मुला तूं अन्धारीं ?"

—भा. रा. ताम्बे.

**प्रश्न:**—कवीनें पहाटेला कोणाची उपमा दिली आहे? 'सोन्याची झारी,' 'सोन्याचें मन्दिर' इ. शब्दप्रयोगांवरून कोणत्या कल्पना उघड होतात? निद्रासुन्दरी पहाटेस काय काम करीत होती?

**अभ्यास:**—( १ ) खालील काव्यचरणांतील कल्पना स्पष्ट करा—

१ रमण म्हणे, जा ऊठ पहाटे......
बाळा रुतति विदेशीं कांटे......

२ घोर तमाच्या दाट घटांतुनि .....
...चालत आलें बघ ठेंचाळुनि.

( २ ) संध्याकाळीं तुम्हीं समुद्रकिनाऱ्यावर मौजेनें वेळ घालविला आणि रात्रीं जलदेवी तुमच्या स्वप्नांत आली आहे, अशी कल्पना करा आणि तिचे उद्गार तुमच्या शब्दांत लिहा.

**पुरवणी वाचन:**—श्री. अनंत काणेकर यांचें 'सावल्यांचें गाणें' आणि श्री. माधव या कवींची 'एका रात्रीची गंमत' या कल्पनारम्य कविता वाचा.

---

# ६. विश्वकुटुंबी संस्था

**परिचय:**—आपल्या कादंबऱ्यांतून सामाजिक, नैतिक अगर तात्त्विक प्रश्नांचा मनोरंजक रीतीनें ऊहापोह करून वाचकांच्या बुद्धीला चालना देणाऱ्या श्रेष्ठ कलावंतांत प्रो. वामन मल्हार जोशी ( जन्म इ. स. १८८२ व मृत्यु इ. स. १९४३ ) यांची गणना होते. त्यांनीं आतांपर्यंत रागिणी, नलिनी, आश्रमहारिणी, सुशीलेचा देव, इंदु काळे आणि सरला भोळे इ०

कादंबऱ्यांच्या द्वारें आपले स्वतंत्र विचारप्रवाह समाजांत खेळत ठेविले आहेत. ह्यांशिवाय, नीतिशास्त्रप्रवेश, नवपुष्पकरंडक, विचारविलास इ० त्यांची पुस्तकें प्रसिद्ध आहेत. आपलें विवेचन तर्कशुद्ध व्हावें, म्हणून ते कसोशीनें प्रयत्न करितात; त्यांतच गर्भित विनोदाची भर पडल्यानें त्यांची वाङ्मयकृति मोठी आकर्षक वाटते.

विषयः—सोबतचा उतारा त्यांच्या ' सुशीलेचा देव ' या कादंबरींतून घेतला आहे. बुद्धीला पटेल तें बोलून दाखविणारी आणि ध्येयालाच देव मानणारी सुशीला, उत्क्रान्तिवादाला उचलून धरणारे बळवंतराव, समाजस्थितीचे अभ्यासक सुनंदराव, आणि मनुष्यस्वभाव म्हटला म्हणजे तो त्रिकालाबाधित एकसारखा असणार असा आग्रह धरणारे सुशीलेचे वडील विनायकराव, ह्यांचा आपापसांतील चाललेला वादविवाद तुम्हांस मनोरंजक आणि उद्बोधक वाटेल. शिवाय आजकाल आपल्या सभोंवतीं आणि आपापसांत कोणते विचार-तरंग वाहात असतात, त्याची तुम्हांला पुन्हा ओळख होईल.

**" तुमची विश्वकुटुंबी संस्था ठीक आहे; पण अजून कांहीं पटत नाहीं. " विनायकराव एकदां वाचकांच्या परिचयाच्या सोनगांवकर मित्रयाला म्हणाले " आपल्या इकडे ' वसुधैवकुटुंबकम् '— सगळ्या जगाला आपलें कुटुंब—मानावें, हें तत्त्व जुनें आहे व तें सर्वमान्य आहे; पण तुमचा अलीकडचा विश्वकुटुंबवाद दिसण्यांत सारखा, पण अगदीं भिन्न आहे. तुम्ही खाजगी मालमत्ता मुळीं मानीतच नाहीं. आमची सर्व समाजरचना खाजगी मालमत्तेवर उभारली आहे. आम्ही एवढेंच म्हणतों कीं, आपल्या मालकीचें जें असेल, त्याचा आपण सद्व्ययच करावा; म्हणजे अडचणींत असलेल्या आपल्या बंधुभगिनींना मदत करण्याचे कामीं त्याचा**

उपयोग करावा. आमच्या समाजाचा पाया कुटुंब. तुम्ही कुटुंब-व्यवस्थेवरच घाला घालतां."

"कबूल" त्यांची मुलगी सुशीला म्हणाली, "तुम्ही म्हणतां तें सगळं कबूल; पथ आमच्या मनांत वाईट काय आहे? तुम्हीं भेद दाखविला तो खरा आहे. पण जुन्या विश्वकुटुंबवादापेक्षां तो अधिक चांगला आहे असें आमचें म्हणणें आहे, यांत चुकीचं काय आहे तें सांगा."

"सांगतों आतां काय काय चुका आहेत त्या." विनायकराव बोलूं लागले, "तुमची इथली संस्था अत्याचारी नसेल, अत्याचाराचा पुरस्कारहि करीत नसेल; पण तुमचे युरोपमधले थोरले भाऊ आणि तिथल्या थोरल्या भगिनी अत्याचारानें देखील समाज-व्यवस्थेंत क्रान्ति घडवून आणावी, असें म्हणतात. ही झाली पहिली चूक. ही क्रान्ति एकदम घडवून आणावी असें ते म्हणतात. ही दुसरी चूक. ही क्रान्ति आपल्या मताप्रमाणें असावी, सर्व लोकांना विचारण्याची जरूर नाहीं असं ते मानतात. ही त्यांची तिसरी चूक; आणि तुमचे सिद्धान्त इतिहासाच्या शिकवणुकीलाच सोडून आहेत असें नाहीं, तर एकंदर मनुष्यस्वभावाला–मानसशास्त्राला–सोडून आहेत, ही सर्वांत मोठी चूक."

"फिर्यादीतर्फेच्या वकिलाप्रमाणें चार मुद्दे काढलेत, त्याला मी आरोपीतर्फेचा वकील म्हणून उत्तर देतों कीं, सोनगांवची आमची संस्था म्हणजे युरोपमधील संस्था नव्हे. अर्थात् युरोपमधल्या एकाद्या संस्थेला लागू असलेले आरोप आम्हांला लागू नाहींत."

"कबूल करतों हें मी." विनायकराव म्हणाले, "पण तिकडच्या संस्थेमध्यें आणि तुमच्या संस्थेमध्यें फरक काय आहे, ते तुम्हीं सांगितला पाहिजे."

" फरक सांगतों. " बळवंतराव म्हणाले, " फरक असा कीं, आमचा अत्याचारावर विश्वास नाहीं. आम्ही गांधींचे भक्त नसलों तरी त्यांचा अनत्याचाराचा पुरस्कार आम्हांला बराच पसंत आहे."

" तात्या, ' बराच ' शब्द ध्यानात धरा बरं का ! " सुशीला म्हणाली, " ' बराच ' शब्दामध्यें बराच अर्थ आहे. "

" आला, ध्यानांत आला अर्थ " तिच्या वडिलांनीं मंदस्मित करून उत्तर दिलें.

" तुम्ही हसा " सुनंदराव म्हणाले, " पण आमचें खरें मत असेंच आहे कीं, होतां होईल तो जबरदस्ती करूंच नये. प्रबल मनुष्य अल्पबलाला एखादी गोष्ट जबरदस्तीनें करायला लावतो; पण तो अल्पबल मनुष्य आपण प्रबल केव्हां होऊं याची वाट पाहात असतो व प्रबळ झाल्याबरोबर पूर्वीच्या जबरदस्तीचा सूड उगवतो ! एका मनुष्याची जी गोष्ट तीच मनुष्यसंघाची किंवा राष्ट्राची, जबरदस्तीनें दुसऱ्याकडून एकादी गोष्ट करून घेतां येतें; परंतु हें यश टिकाऊ नसतें. खरें टिकाऊ यश मनुष्याला एकादी गोष्ट मनापासून तो जेव्हां ती करतो, तेव्हां येतें. "

" आणि म्हणूनच आम्ही सुधारणा घाईनें करूं इच्छीत नाहीं." सुनंदराव मध्येंच म्हणाला, " ' आम्हांला झटपट रंगारी ' सुधारणा नको आहेत आम्ही आपल्या संस्थेच्या द्वारें लोकमत तयार करणार आणि मग शंभर-दोनशें-पांचशें वर्षांनीं जेव्हां सुधारणा व्हावयाच्या असतील, तेव्हां त्या आपोआप घडून येतील. "

" बरं, तिसऱ्या आक्षेपाबद्दल काय ? " विनायकरावांनीं विचारलें.

" तिसऱ्या आक्षेपाचें उत्तर असें, " सुशीलेनें उत्तर दिलें. "-कीं, आमची सोनगांवची विश्वकुटुंबी चळवळ केवळ कामगारां-

चेंच वर्चस्व स्थापण्याकरितां नाहीं, त्याप्रमाणें केवळ शेतकऱ्यांचें, केवळ मध्यमवर्गाचें, केवळ सरदाराचें किंवा सरकारी नोकरांचें वर्चस्व स्थापण्याकरितां नाहीं; आम्हांला सर्व जनता-जनार्दनाचें वर्चस्व पाहिजे आहे. 'पांचांमुखीं परमेश्वर' असें आमचें मत आहे."

"काय बोलतेस तूं हें—" विनायकराव म्हणाले, "परमेश्वराचें नांव तुझ्या तोंडून आतां निघालें हें मोठेंच पाप केलेंस तूं!"

"पाप झालें खरें" सुशीलेनें स्मितपूर्वक गुन्हा कबूल केला. "माझ्या ध्येयात्मक समाजव्यवस्थेंत परमेश्वराला आणि इतर देवांना आणि देवींना पुराणकालीन वस्तुसंग्रहांतील 'मृत देवतां-' च्या कपाटांत स्थान मिळेल, इतरत्र मिळणार नाहीं."

"ध्येयनिष्ठ लोकांच्या हृदयांत देवाला स्थान मिळेल, असें तूं परवां म्हणालीस तें विसरलीस वाटतं?" बळवंतराव म्हणाले.

"विसरल्यें खरी" सुशीलेनें उत्तर दिलें. "पण एका अर्थी विसरल्यें नाहीं, असेंहि म्हणण्यास हरकत नाहीं. कारण सात्त्विक लोकांच्या वगैरे हृदयांत जो देव वास करतो, त्याचं नांव 'ध्येय' असेल;—'देव' हें नांव पुढें सोडून देणार आहे!"

"कां? 'देव' या शब्दाचा विटाळ कां वाटतो?" विनायकरावांनीं विचारिलें. "एकाद्याची खरोखरच जर उच्चतमगुणविशिष्ट विभूतीवर श्रद्धा असली, तर त्यानें ही श्रद्धा त्याज्य कां मानावी?"

"खरोखरीच श्रद्धा असली, तर उच्चतमगुणविशिष्ट विभूतीवर श्रद्धा ठेवण्यास हरकत नाहीं." सुशीलेनें उत्तर दिलें.

"पण आपण मूळ मुद्दा सोडून देत आहोंत. आमची विश्वकुटुंबी संस्था ईश्वरवादी नाहीं आणि निरीश्वरवादी नाहीं, आम्ही सत्यवादी आहोंत. सर्व लोकांना आमच्या राज्यव्यवस्थेंत विचारस्वातंत्र्य व मतस्वातंत्र्य असेल. विशिष्ट वर्गाचा इतर वर्गावर

जुलूम असावा हें मतच मुळीं आमच्या राज्यांतील आम्हांला पसंत नाहीं. म्हणून लोकांनीं ईश्वर मानावाच किंवा मानूं नयेच, असा आम्ही निर्बंध घालूं इच्छीत नाहीं."

"तुम्हांला राज्य जणुं कांहीं मिळालेंच आहे अशी, तुझी भाषा दिसते. तुमच्या राज्यांतील पहिली राणी तूं आहेस असें दिसतें!"

"आमच्या राज्यांत राजा नाहीं, सगळेच आम्ही कामकरी!" सुशीलेनें उत्तर दिलें

"असें कसें होईल?" विनायकराव थट्टेच्या स्वरांत म्हणाले. "मुंग्या सगळ्या कामकरी असतात; पण त्यांच्यामध्यें देखील एक 'राणी मुंगी' असतेच; ती तूं होणार अशीं मला लक्षणें दिसूं लागलीं आहेत! पण ही थट्टा सोडून देऊन माझ्या चवथ्या आक्षेपाकडे वळूं या. तुमच्या समाजव्यवस्थेचा हा सगळा डोलारा मनुष्यस्वभावाच्या आणि समाजप्रवृत्तीच्या विरुद्ध आहे आणि इतिहासाचीहि साक्ष अशीच आहे. यावर तुमचें उत्तर काय आहे? तुमच्या विश्वकुटुंबी संस्थेवर खरा आक्षेप म्हटला म्हणजे हाच आहे. यावर तुमचें काय म्हणणे आहे?"

"यावर आमचें म्हणणें असें आहे-" बळवंतराव म्हणाले, "—कीं, मनुष्यस्वभाव कसा आहे हें निश्चित ठरविण्याला आज पुरेसें साधन नाहीं. आजपर्यंतच्या इतिहासावरून भविष्यकाळा-बद्दलचीं अनुमानें करणें चुकीचे आहे. पूर्वीचा काळ आजच्या काळाहून फार भिन्न होता आणि भविष्यकाळ आजच्याहून फार भिन्न आहे."

"या तुमच्या कल्पनेच्या उड्या आहेत." विनायकराव मध्येंच म्हणाले.

"असतील, कल्पनेच्या उड्या असतील; पण त्याला इतिहा-

साचा आधार तुमच्या सिद्धान्तापेक्षां अधिक आहे. मनुष्यसमाज दहाहजार वर्षांपूर्वी होता तसा चार पांच हजार वर्षांपूर्वी म्हणजे वेदकाळीं नव्हता. वेदकाळीं जसा होता, तसा पुराणकाळीं नव्हता. पुराणकाळीं जसा होता, तसा आज नाहीं. मनुष्याच्या वासना व महत्त्वाकांक्षा पूर्वींसारख्या राहिल्या नाहींत. पूर्वी मनुष्य मनुष्याला खात होता. जें दिसेल तें आपलें म्हणत होता, जी स्त्री दिसेल ती आपली असं मानीत होता व तिला हें भानण्याला लावण्याचा गोडीगुलाबीचा किंवा जबरदस्तीचा प्रयत्न करीत होता. पुढें कुटुंब असलेंच तर अशा रीतीनें खुषीनें-जबरदस्तीनें आलेल्या स्त्री· पुरुषांचें व त्यांच्या अपत्यांचें होतें. राज्य किंवा राष्ट्र असें कांहीं नव्हतेंच; घरेंदारें नव्हतीं, कायदे नव्हते; हक्क नव्हते; अर्थात् कोणाचे कोणते हक्क हें ठरविणारीं कोर्टेंहि नव्हतीं. या स्थितीशीं आजच्या स्थितीची तुलना करा आणि ‘ काल ’ ही अजब चीज किती फरक घडवून आणीत असते. याचें मनाशीं आश्चर्य करीत राहा. ”

“ तूं तर वक्तृत्वच करूं लागलास बाळू ! ” विनायकराव उद्गारले; आणि डोळे मिश्किलपणें मिचकावून म्हणाले, “ असला बाह्य फरक पुष्कळ झाला आहे, हें कबूल. ‘ पुष्कळ ’ म्हणजे फारच पुष्कळ. तुला वाटेल तेवढा ! पण मनुष्याच्या मूलभूत प्रवृत्तींमध्यें फरक झाला आहे का ? मनुष्याची स्वार्थबुद्धि नष्ट झाली आहे का ? कामवासना गेली आहे का ? क्रोध थंडावला आहे ? असूया मरून गेली आहे ? खरी गोष्ट अशी आहे कीं, मनोविकार सगळे तत्त्वतः पूर्वींसारखेच आहेत–ते व्यक्त करण्याची पद्धति मात्र बदलली आहे. मनोविकार तेच, फक्त पोषाख बदलला आहे. पोषाखांतला फरक सोडला, तर पांच हजार वर्षांपूर्वींचा मनुष्य

आणि आजचा मनुष्य यांत काय फरक आहे? अवयव तेच, प्रवृत्ति त्याच. ज्ञान–म्हणजे माहिती–अधिक आहे, पण 'स्वभाव' बदलला आहे, असं म्हणतां येणार नाहीं."

"स्वभाव हा सहजप्रवृत्ति, शिक्षण, संवई, संगत, सभोंवतालची परिस्थिति यांवर अवलंबून असतो असें म्हणतात; आणि हें जर खरें असेल—" बळवंतराव म्हणाले, "तर पांच हजार वर्षांपूर्वींच्या मनुष्याच्या आणि आतांच्या मनुष्याच्या स्वभावांत फार फरक आहे, असेंच अनुमान निघेल. कारण अवयव आणि त्यांच्या सहजप्रवृत्ति यांशिवाय इतर बाबतींत या उभयतामध्यें साम्य कांहींच नाहीं. अवयवांमध्येंहि थोडा फरक झालेला आहे. कारण हजारो वर्षांपूर्वींच्या माणसांचे व हल्लींच्या माणसांचे सांपळे जर तुमच्या दृष्टीनें पाहिले तर उंची, पायांची ठेवण, हातांची लांबी वगैरेमध्यें फरक दिसतो. पूर्वीचे लोक कमी उंच होते. ते पायांनीं चालत; पण किंचित् अरवलासारखी त्यांची चाल होती. हात सापेक्षतः हल्लींपेक्षां लांब होते. ते लोक आजानुबाहु असावेत असें दिसतें. त्यांचें घ्राणेंद्रिय अतिशय तीक्ष्ण होतें असें अनुमान आहे. पण शरिराच्या अवयवांमध्यें किंवा त्यांच्या शक्तीमध्यें कांहीं एक फरक झाला नाहीं असें गृहीत धरलें, तरी शिक्षण, संवई, संगत, सभोंवतालची स्थिति या बाबतींत इतकी भिन्नता आहे कीं, पूर्वींच्या रानटी माणसाचा आणि विसाव्या शतकांतील माणसाचा स्वभाव एक आहे हें म्हणणें अत्यंत अतिशयोक्तीचें आहे आणि ही अतिशयोक्ति घातुक आहे."

"स्वभावांत भेद असेल; पण मूलतः भेद आहे का? असा माझा प्रश्न आहे."

" त्यावर माझें उत्तर असें आहे कीं, " बळवंतराव म्हणाले, " फूल आणि फळ किंवा लहान मुलगी आणि तरुणी या मूलतः जरी एकच असल्या, तरी त्यांमध्यें जसा जमीनअस्मानाचा फरक असतो. तसाच प्रकार इथें आहे. "

" आणि शिवाय " सुनंदराव म्हणाले, " दुसरें असें कीं, मनुष्यस्वभाव पूर्वीसारखा आहे असें गृहीत धरलें, तरी ह्या स्वभाव व्यक्त होण्याच्या बाबतींत तुम्ही फरक मानतांच; तेव्हां जरी पूर्वींसारखेच मनोविकार असले, तरी त्यांची अभिव्यक्ति भिन्न असूं शकेल आणि एवढें कबूल केलेंत म्हणजे आमचें काम झालें. "

" मनुष्यस्वभाव ही एक स्थिर नित्य वस्तु आहे असें मानण्यांत जशी एक चूक होते आहे—" सुशीला म्हणाली, "—तशी दुसरी चूक अशी होते कीं, मनुष्यस्वभाव हा केवळ स्वार्थी, आपमतलबी, कामैकप्रेरित, अधिकारलोलुप असें सामान्यतः मानण्यांत येतें. मोठमोठे लोक देखील पुष्कळदां असेंच म्हणतात. पण मनुष्यांत उच्च प्रवृत्ति आणि मनोवृत्तीहि आहेत. त्याला स्वार्थ प्रिय असेल; पण ' स्व ' मध्यें तो कुटुंबाचा–देशाचा–मनुष्यजातीचाहि समावेश करतांना आढळतो. स्वार्थाबरोबर त्याला परार्थहि प्रिय आहे. स्वार्थ बहुधा प्रबळतर होतो; पण परार्थहि कित्येक वेळां प्रबळतर होऊं शकतो. शिवाय, ज्ञानानें व अनुभवानें खरा स्वार्थ आणि परार्थ यांचा अविरोध जसजसा दिसून येऊं लागतो, तसतसा स्वार्थप्रवृत्ति व परार्थप्रवृत्ति यांमध्यें साहजिकच अविरोध उत्पन्न होऊं लागतो. उदाहरणार्थ, शेजारच्या घरीं प्लेग झाला म्हणजे आपल्या घरींहि प्लेग होण्याचा संभव आहे, ही जाणीव एकदां तीव्रतेनें उत्पन्न झाली, म्हणजे शेजारीं देखील प्लेग होऊं नये अशा-

बद्दल लोक दक्ष होऊं लागतात. असा आजकाल आपण अनुभव पाहतोंच आहोंत. ''

"कबूल आहे, कबूल आहे तुमचें सगळें म्हणणें. '' विनायकराव म्हणाले, "पण अद्यापि तें चांगलेंसें गळीं उतरत नाहीं, कारण सांगतां येत नाहीं; पण पटत नाहीं एवढी गोष्ट खरी. माझा बोलण्याचा हा प्रकार बायकी आहे, हें मला कबूल आहे; पण वस्तुस्थिति ही अशी आहे. ''

'बोलण्याचा बायकी प्रकार म्हणतां, पण या भाषेवर सुशीला आक्षेप घेईल हो. '' सुनंदराव म्हणाले.

"आक्षेप घेणारच '' सुशीला म्हणाली, "पण सध्या घेत नाहीं. आमच्या तात्यांचें चुकतें आहे कोठें, तर जगांत विचारांमध्यें आणि आचारांमध्यें केवढ्या मोठ्यामोठ्या आणि किती झपाट्यानें क्रान्त्या होत आहेत, यांकडे ते लक्ष देत नाहींत ! खाजगी मालमत्तेच्या पद्धतीपासून लोकांचें किती नुकसान होत आहे हें लोकांच्या एकदां नजरेस आलें, म्हणजे हळुहळू कालांतरानें हल्लींच्या समाजव्यवस्थेंत फरक होत जाऊन विश्वकुटुंबी व्यवस्थेकडे समाजाच्या प्रवृत्तीची दिशा झुकणार यांत शंका नाहीं. आतांच पाहाना; गाड्यांचे रस्ते, रेल्वे, पोस्ट ऑफिसें, पोलीस, सैन्य हीं सर्व खासगी मालकीचीं राहिलीं नाहींत, तर तीं बहुतेक सार्वजनिक स्वरूपाचीं झालीं आहेत आणि त्यांची व्यवस्था बरीच चांगली आहे. विशेषेंकरून पोस्टाची व्यवस्था सार्वजनिक स्वरूपाची आहे. तरी ती किती उत्तम चालली आहे ! जी. आय्. पी. सारख्या कांहीं रेल्वे आतां जशा राष्ट्राच्या झाल्या आहेत, तशाच सगळ्या झाल्या तर काय चालणार नाहीं असें वाटतें ? आणि पोस्टाप्रमाणें आणि रेल्वेप्रमाणें खाणी आणि जमिनी सार्वजनिक मालकीच्या

झाल्या तर अव्यवस्था माजेलच असे निश्चयान म्हणण्याला पुरावा काय? आज, उद्यां किंवा एक दोन पिढ्यांत ही क्रान्ति होणार नाहीं व होणेंहि इष्ट नाहीं, पण पुढें मागें केव्हांहि होणार नाहीं आणि झाली तर वाईट परिणाम घडून येतील, असें खात्रीनें म्हणण्यास पुरावा काय आहे? असले प्रयत्न पूर्वी फसले हा इतिहासाचा पुरावा एवढेंच सिद्ध करतो कीं, या बाबतींत यश येण्याला अडचणी पुष्कळ होत्या. पण कालमानाप्रमाणें हरतऱ्हेच्या यांत्रिक व इतर सुधारणा होत आहेत; लोकांमध्यें ज्ञानवृद्धि होत आहे, लोक इतके दिवस निजले होते ते आतां जागे झाले आहेत व्यक्तिव्यक्तींचे व राष्ट्रा-राष्ट्रांचे हितसंबंध एकमेकांत निगडित झाले आहेत याची जाणीव उत्पन्न होऊन दुसऱ्याचें हित किंवा अनहित तें वस्तुतः आपलेही हित किंवा अनहित हें अनुभवान्तीं व्यक्तींना व राष्ट्रांनाहि चांगलें कळूं लागलें आहे; संशयी, स्वार्थी, कलहात्मक वृत्ति शेवटीं आपल्याला घातुक होते हें तत्त्व पटूं लागलें आहे. विश्वासानें विश्वास वाढतो व मनुष्य विश्वासार्ह होतो. तसेंच प्रेमानें प्रेम वाढतें आणि मनुष्य प्रेमार्ह होतो, या तत्त्वाचाहि अनुभव अनेकांना अनेक क्षेत्रांत येत आहे. अशा स्थितींत भविष्यकाळीं विश्वकुटुंबवाद लोकांना पटेल व तो त्यांना चांगलें यशहि देईल, असें कां मानूं नये?"

"कां मानूं नये याचें उत्तर असें कीं, यश खास येईलच अशी खात्री करून देणारा निश्चयात्मक प्रबळ पुरावा नाहीं." विनायकरावांनीं उत्तर दिलें.

"नसेल, पुरावा नसेल." सुनंदराव म्हणाले, "पण पूर्वींच्या 'समाज–' व्यवस्थेनें आतांपर्यंत अव्यवस्थाच माजविली ही गोष्ट खोटी नाहीं! आतांच्या समाजव्यवस्थेला काय मोठेसें सुयश

मिळालें आहे तर आम्हीं अपयशाला भ्यावें ! आतांपर्यंत इतिहास म्हणजे कलह, मारामाऱ्या, खून यांचाच बराचसा इतिहास. लढायांत आणि युद्धांत शत्रूंचा जीव घेणें म्हणजे खून करणें होय; पण ते खून प्रतिष्ठितपणाचे, कायदेशीर आणि मोठ्या प्रमाणावर आणि पुष्कळवेळां अप्रत्यक्ष असतात, म्हणून खून म्हणायचें नाहीं इतकेंच. दुसरें असें कीं, हल्लींच्या समाजव्यवस्थेंत कोण सुखी आहे तर आमच्या विश्वकुटुंबी समाजामुळें दुःख ओढवेल म्हणून आम्हीं चिन्तातुर व्हावें आणि सदाशा आणि सदुद्योग सोडून देऊन, आहे त्या स्थितींत समाधान मानावें ? हल्लींच्या समाजांत–हिंदुस्थानांतल्याच नव्हे तर कोठल्याही समाजांत–मजूर संतुष्ट नाहींत, मालक नाहींत, कारकून नाहीं, शिक्षकवर्ग नाहीं, मध्यमवर्ग नाहीं, सरदार नाहींत, व्यापारी नाहींत, कारखानदार नाहींत–कोणीच नाहीं. हल्लींच्या समाजव्यवस्थेला तरुण मुलगे असंतुष्ट, मुली असंतुष्ट, स्त्रिया असंतुष्ट, पुरुष असंतुष्ट. जो तो मनांत झुरतो आहे, समाधान कोणालाच नाहीं. प्रत्येकजण इतरांना दोष देत आहे आणि आपल्या अपयशाचें किंवा दुःखाचें खापर फोडण्याला शेजाऱ्यापाजाऱ्यांची किंवा आप्तसंबंधीं लोकांचीं डोकीं मिळाली नाहींत, तर समाजाच्या डोक्यावर हें खापर तो फोडतोच; नाहींतर निदान ' दैव ' किंवा ' देव ' यांचीं डोकीं केव्हांहि आणि कोणालाहि आणि कोठेंहि खापर फोडण्याच्या या कामाला उपलब्ध आहेतच ! "

" पण सुशीलेच्या विश्वकुटुंबी समाजव्यवस्थेंत देवांची हकालपट्टी झाल्यामुळें खापर फोडण्याचें तें एक स्थान कमी होईल ! ही एक मोठी आपत्तीच ओढवणार आहे म्हणायची ! " विनायकराव थट्टेच्या स्वरानें म्हणाले !

" आमच्या राज्यांत देवाला स्थान नाहीं खरें– " सुशीला

थट्टेला थट्टेनेंच उत्तर देण्याच्या स्वरांत म्हणाली. "पण कांहीं लोक हृदयांत त्याला स्थान देणारे असतीलच ! त्यांना तो अगदीं जवळ सांपडेल, आणि इतरांनीं या हृदयस्थ आणि अंतर्यामीं वास करणाऱ्या देवाच्या नांवाचा उच्चार करून खापर फोडावें ! उंच आकाशांत किंवा कैलासावर किंवा स्वर्गांत किंवा लांबच्या क्षीर-सागरांत असलेल्या देवाला जर इथली हांक ऐकू जाते आणि इथल्या दगडी मूर्तीच्या माथ्यावर वाहिलेलीं फुलें जर त्याला पोंचतात, तर इथून दिलेले शिव्याशापहि त्याला खात्रीनें पोंचतील."

प्रश्नः—विनायकरावांनीं विश्वकुटुंबी संस्थेवर कोणकोणत्या शंका घेतल्या ? त्यांचें निरसन कोणी कसें केलें ? सुशीलेनें तात्यांना 'बराच' शब्द बराच ध्यानांत धरण्यास कां सांगितलें ? काल ही एक अजब चीज आहे ही गोष्ट बळवंतरावांनीं कोणत्या आधारावर सिद्ध केली आहे ? स्वार्थप्रवृत्ति आणि परार्थप्रवृत्ति म्हणजे काय ? त्यांचा समेट केव्हां होतो ? आजच्या समाजव्यवस्थेचे कोणकोणते दुर्गुण सुनंदरावानें दाखविले आहेत ? वरील वादविवादांत तुम्हांस कोणाची बाजू घ्यावीसें वाटतें ? कारण काय ?

खालील वाक्यांचें स्पष्टीकरण करा.

( १ ) माझ्या ध्येयात्मक...कपाटांत स्थान मिळेल. ( २ ) ज्ञानानें व अनुभवानें...अविरोध उत्पन्न होऊं लागतो. ( ३ ) उंच आकाशांत किंवा कैलासावर...शिव्याशापहि त्याला खात्रीनें पोंचतील.

अभ्यास—या धड्यांत आलेल्या संभाषणांच्या आधारें एक नाट्य-प्रवेश तयार करा. सुशीलेचा देव ही कादंबरी वाचा.

निबंधलेखनः—आपण पूर्वींपेक्षां अधिक सुखी आहोंत काय किंवा यांत्रिक सुधारणेचे फायदेतोटे यावर एक निबंध लिहा.

---

# ७ अवेळीं ओरडणाऱ्या कोकिळेस.

**ओळख:**—राम गणेश गडकरी ऊर्फ गोविंदाग्रज (१८८५–१९१९)



हे कवि, नाटककार आणि विनोदी लेखक म्हणून प्रसिद्ध आहेत. शब्द-चमत्कृति आणि कल्पनेची भरारी त्यांच्या लिखाणांत विशेष आढळते. कै. श्री. कृ. कोल्हटकर ह्यांना नाट्याच्या बाबतींत आणि केशवसुत यांना काव्याच्या बाबतींत ते आपले गुरु मानीत. 'एकच प्याला' आणि 'भावबंधन' हीं त्यांचीं नाटकें फार प्रसिद्ध आहेत. त्याचप्रमाणें 'वाग्वैजयंती' हा त्यांचा काव्यसंग्रह विशेष लोकप्रिय आहे. त्यांचे विनोदी लेख, तुम्हांस त्यांच्या 'रिकामपणाच्या कामगिरींत' वाचावयास मिळतील.

**विषय:**—गोविंदाग्रजांचें अंतःकरण अत्यंत संवेदनाक्षम होतें. आपल्या आयुष्यांत त्यांनीं जीं सुखदुःखें अनुभविलीं त्यांचे पडसाद कळत नकळत त्यांच्या काव्यांतही दिसून येतात. खालील कवितेंत त्यांच्या मनाची एक विशिष्ट अवस्था प्रकट झाली आहे. चोहोंकडे रात्रीचा काळोख पसरला आहे. दुःखित मनाला धीराचा शब्द द्यावयासही जवळपास कोणी नाहीं. चालू कालांत स्वारस्य वाटत नाहीं. भूतकाळ भेडसावीत आहे. मागें वळून पाहण्याची सोयच नाहीं. भविष्यकाळावर दृष्टि टाकावी तर तेथेंही शून्यता दिसून येते. अशा रीतीनें बाहेर निसर्गांत आणि आंतील हृदयांत अंधकार माजला असतांहि कोकिळेचा गोड आवाज मनाला किती सांत्वनपर वाटतो, याचा कवीला आलेला अनुभव खालील काव्याशीं समरस होऊन तुम्ही पण मिळवा.

[ मध्यरात्रींच्या सुमाराम कोकिळेचा शब्द, विषण्ण व निराश हृदयाला किती सांत्वनपर वाटतो, याची सुखनिद्रित मनाला साक्ष पटणार नाहीं. ]

अवेळ तरिही बोल–कोकिळे–अवेळ तरिही बोल !
रात्र पसरली जगतावरती,
भुरके काळे मेघहि फिरती,
वारा वाहे भरभर भंवतीं,
बाल–चंद्र–चंद्रिका घाबरी गोरीमोरी होत;

उदासीनता छाया पसरी,
सृष्टि दिसे जरि वरुनी हंमरी–
खिन्नताच तरि अंतरिं सारी,
व्यर्थ बोलतो, व्यर्थ डोलतो संसाराचा गोल !

आनंदाच्या प्रातःकाळीं,
दिवसाच्या गजबजल्या वेळीं,
किंवा संध्या जेव्हां नटली,
आनंदाचीं गाणीं गाया गवई लाखकरोड !

असतां आनंदाची माया,
वृद्धि क्षणभर तिची कराया
लागे त्याचा तोच गावया,
आनंदाला द्विगुणित करितीं आनंदाचे बोल !

परंतु जेथें उदासीनता
व्याकुळ करिते विषण्णचित्ता,
तेथें त्याला द्याया समता–
गाणें गावें, हेंच अलौकिक ईश्वरतेचें काम;

बाह्य सृष्टि जरि निद्रा भोगी,
अंतःसृष्टि तरी हतभागी
रडते तशीच राहुनि जागी,
निजवाया तिजलागीं असलें गाणें गाई गोड !

अवेळ येथें कसली बाई ?
दुःखसांत्वना गा केव्हांही !
अनुकंपेला नियम न कांहीं !
रित्या मनीं या ओत सूर; त्यां जाऊं दे अति खोल.

वळवाचा हा वारा गार.
झोंबुनि पीडा देई फार,
येत गवाक्षांतुनि अनिवार;
येतां जातां सूर काढितो भलभलते भेसूर !

खिन्न चांदणें ढगांआडचें
भग्न मनोरथ झाले ज्याचे—
हंसें जणूं तें अशा मनाचें;
पुष्पवर्ताच्या तोंडावरची छाया काय उदास !

या अवकाळीं—या एकांतीं
निद्रेची मिळवाया शांती
थकुनी भागुनि पडलों अंतीं,
निद्रा कुठली परि त्या हृदया, भविष्य नाहीं ज्यास.

हातीं संसाराची माती,
मनिंच्या आशा मनाच खाती
भूतकाळचीं भूतें रडतीं !
मिटल्या जाग्या डोळ्यांपुढतीं शून्याचें मैदान !

निष्प्रेमाची शेज सोबती,
भयाण दुनिया सारी भंवतीं,
विषण्ण येती विचार चित्तीं,
बाह्यांतर विश्वांत खेळते उदासीनता एक !

गा तर चित्ता मम रमवाया;
हीच खरी जादूची माया;
आनंदा खेळविणें वायां;
मशाल दिवसां लावुनि होतो लाभ कुणाला काय ?

दूर कराया उदासीनता
गाच गडे ! अंगाईगीता
झोंप येउं दे माझ्या चित्ता,
लक्ष लागतें सुरांकडे तव; वाटति ते बिनमोल !

पाहुनि ही तव दयाशीलता
द्रवेल कोणी भगिनी माता,
शांत कराया हताश चित्ता—
रूक्ष जगावर स्त्रीहृदयांतिल टाकिल अश्रू एक !

त्या अश्रूच्या शीतलतेनें
भोंवतालची आग जाळणें,
निद्रा घेतां शांत मनानें
'गोविंदाग्रज' ऐकत राहिल गुंगींतहि हे बोल !

कोकिळे ! अवेळ तरिही बोल !

**प्रश्न:**—१. तुम्ही स्वतःच आपल्या मनाशीं केव्हां गुणगुणतां ? २. गोविंदाग्रज यांची झोपमोड होण्याचें कारण काय ? ते कोणास अंगाई गीत गाण्याबद्दल विनंति करीत आहेत ? ३. स्त्रीहृदयांतील अश्रूंची कोणती थोरवी कवीनें सांगितली आहे ?

**अभ्यास:**—

**खालील चरणांतील कल्पना उघड करा:**—

दुःखसांत्वना गा केव्हांही । अनुकंपेला नियम न कांहीं.
मिटल्या जाग्या डोळयापुढतीं शून्याचें मैदान.
मशाल दिवसा लावुन होतो लाभ कुणाला काय ?

**भावगीत:**—कवीच्या अंतःकरणांतील भावनेच्या उद्रेकास जेव्हां सरस-रमणीय असें शब्दस्वरूप मिळतें, तेव्हां भावगीत निर्माण होतें. या कवितेंत भावगीताचे असे कोणते गुण प्रकट झाले आहेत, तें सोदाहरण लिहा:—

**पुरवणी वाचन:**—यशवंत आणि गिरीश यांनीं सारंगीवाल्यास उद्देशून लिहिलेल्या कविता वाचा. त्याचप्रमाणें केशवसुतांची 'सतारीचे बोल' या कवितेची वरील कवितेशीं तुलना करा.

---

# ८. संकेत

**ओळख:**—श्री. वि. स. खांडेकर, (जन्म इ. स. १८९८) यांनीं आजच्या मराठी वाङ्मयांत आपल्या कल्पनाचातुर्यानें, विनोदप्रचुर कोटिक्रमामुळें आणि भावगर्भित लेखनशैलीमुळें विशिष्ट स्थान मिळविलें आहे. कादंबरी, लघुकथा, टीकालेख, लघुनिबंध, काव्य इ. वाङ्मयाच्या बहुविध शाखांत त्यांनीं आपलें वाङ्मय निर्माण केलें आहे. 'दंव-बिंदू,' 'ऊनपाऊस,' 'जीवनकला' इ० त्यांचे लघुकथासंग्रह, 'कांचनमृग'



'दोन ध्रुव,' 'हिरवा चाफा' इ० त्यांच्या कादंबऱ्या आणि 'वायुलहरी,' 'चांदण्यांत' हे लघुनिबंध-संग्रह फार प्रसिद्ध आहेत.

सोबतच्या लघुनिबंधांत पूर्वापार चालत आलेल्या काव्यसंकेतावर लेखकानें टीका केली आहे. निबंधाचा आरंभ आणि शेवट किती आकर्षक आहे पाहा— आजवर कवींनीं भुंग्यावर जीं गाणीं रचिलीं व इतर 'कोळी,' 'मुरवंट,' 'वाळवी' इत्यादि प्राण्यांविषयीं जो पक्षपात केला त्याबद्दलची सौम्य तक्रार लेखकानें एथें किती स्वाभाविक रीतीनें केली आहे ! लेखकाची खेळकरवृत्ति किती मजेदार आहे !

अगदीं चवताळूनच उठलों मी अंथरुणावरून ! डोळ्याला डोळा लागला नाहीं तों कुठल्याशा भुंग्यानें माझ्या खोलींत प्रवेश करून आपली घरघर सुरू केली होती ! भुंग्याच्या आवाजाला 'गुंजारव' म्हणून पहिल्यादां संबोधणारा कवि बराचसा बहिरा असला पाहिजे. माझ्या मच्छरदाणीवर येऊन जेव्हां त्यानें आपलें गायन सुरू केलें, तेव्हां मला तर विमानच खालीं उतरूं लागल्याचा भास झाला.

माझे डोळे अगदीं पेंगळून गेले होते आणि हा गांवठी ग्रामोफोन बंद होण्याचें तर कांहींच लक्षण दिसेना ! ताडकन् उठलों,

केरसुणी पैदा केली आणि भृंगराजाचा पाठलाग करून त्याला यमसदनाला पाठवून दिलें ! आतां शांत झोप येईल या आशेनें अंथरुणावर मीं अंग टाकिलें पण निद्रा ही प्रीति आणि कीर्ति यांची सख्खी बहीण आहे अगदीं मुलखाची लहरी ! मी तिच्याशीं पाठशिवणीचा खेळ खेळूं लागतांच तिनें लपंडावाचा आश्रय केला.

या कुशीवरून त्या कुशीवर होतांना एकदम त्या मघाच्या भुंग्याची मला आठवण झाली. वाटलें, त्या बिचाऱ्याला उगीच मारिलें मीं ! त्यापेक्षां मीच कानांत कापसाचे बोळे घालून निजलों असतों तर निदान अहिंसाव्रताचें पालन केल्याचे श्रेय तरी मिळालें असतें. मीं भुंग्याला मारलें ही एकच गोष्ट काव्याला ओहटी लागली आहे हें सिद्ध करावयाला उद्यां पुरी होईल. एवढा शूर दुष्यंत राजा ! पण शकुंतलेला त्रास देणाऱ्या भुंग्याला मारावयाला कांहीं त्याचा हात धजला नाहीं ! उलट दुष्यंताचे शिफारसपत्र घेऊन तो भुंगा कोठेहि गेला असता, तरी त्याला सहज नोकरी मिळाली असती. कारण, प्रसंगीं इंद्राच्याहि साहाय्याला जाणारा पराक्रमी दुष्यंत त्याला शरणचिठ्ठी लिहून देता—

‘ वीरा भ्रमरा, जन्मुनि सार्थक केलें तूं या जगीं ।
बसलों विचारांत आम्हि उगी ।।

कदाचित् माझ्या खोलींत आलेला भुंगा दुष्यंताच्या कृपेनें कण्वाच्या आश्रमांत जिवंत राहिलेल्या भुंग्याचाच दत्तक वंशज नसेल कशावरून ? दुष्यंताचीच गोष्ट कशाला हवी ? सारें संस्कृत काव्य-वाङ्मय पाहावें, भुंग्यांच्या विपुल उल्लेखावरूनच त्याला उद्यानाची उपमा देण्याचा मोह कुणालाहि होईल. बरें शपथेला एका श्लोकांत तरी भुंगा त्रासदायक असतो असें एखाद्या कवीनें म्हणावयाचें होतें !

छेः ! संस्कृत कवींचें या भुंग्यावर अगदीं अंधप्रेमच असावें !

रात्रिर्गमिष्यति भविष्यति सुप्रभातम्
भास्वान् उद्देष्यति हसिष्यति चक्रवाकम् ।
कोशंगते मनसि चिन्तयति द्विरेफे
हा हन्त हन्त नलिनीं गजउज्जहार ॥

हा श्लोकच पहाना ! कमळ संध्याकाळीं मिटतें हें काय कमलिनींत अडकलेल्या या श्लोकांतल्या भुंग्याला ठाऊक नव्हतें ? दिवस मावळला तरी हा मूर्ख राहिला कशाला तिथें ? 'मोहाचा परिणाम असाच सर्वनाशांत व्हायचा,' असें सनातन तात्पर्य या भुंग्याच्या उदाहरणावरून निघत असतांना, या श्लोककारानें त्याला अगदीं हुतात्मा करून टाकलें आहे ! तुरुंगांतून बाहेर सुटणाऱ्या चोराचें देशभक्त म्हणून स्वागत व्हावें त्यांतलाच हा प्रकार नाहीं का ?

विक्रमोर्वशीयांत उर्वशीच्या विरहानें वेडा झालेला राजा भुंग्याला तिची माहिती विचारतो ती सुद्धां किती अदबीनें ! हंसाला तो म्हणतो, 'हंस, प्रयच्छ मे कान्तां–' पण भुंगा दिसतांच स्वारी नरमते. 'मधुकर मदिराक्ष्याः शंस तस्याः प्रवृत्तिम्.' 'तूं तिला पाहिली असतीस तर या कमळावर तूं आसक्तच झाला नसतास.' तिसरा एक कवि भुंग्याला म्हणतो—

अपसर मधुकर दूरं परिमलबहलेऽपि केतकीगन्धे ।
इह नहि मधुलवलाभोऽस्ति ।

पाहा, आधीं सुगंधी केवड्याची निंदा आणि ती एका काळ्या, कर्णकटू आवाज करणाऱ्या विचित्र प्राण्याकरितां ! फौजदारी वकीलसुद्धां अशी गोष्ट करायला तयार व्हायचा नाहीं ! आणि या कवींनीं भुंग्यावर पदोपदीं स्तुतिसुमनें वाहावींत ! बिचाऱ्यांच्या

ध्यानींमनींही आलें नसेल कीं, या सुमनांतला मधु संपतांच हे भुंगे पुन्हा त्यांच्याकडे ढुंकूनही पाहाणार नाहींत !

संस्कृत कवींच्या मा भृंगभक्तीचें मला तरी एकच कारण दिसतें. संकेतप्रियता, अगदीं अंध अनुकरण ! कुणा तरी एका कवीला कुठल्या तरी एका वेळेला भुंग्याचा गुंजारव आवडला आणि त्याच्या कमळावरील आसक्तीचें कौतुक वाटलें ! झालें, भुंगा काळा असतो, कीं गोरा असतो, त्याचें गायन ठुमरीसारखें लागतें, कीं तराण्यासारखें भासतें, सुंदर चतुर प्राणी म्हणून प्राणिसृष्टींत तरी त्याला कांहीं विशेष किंमत आहे कीं काय, याची चौकशी कोण करतो ? साऱ्या कवींनीं भुंग्याचीं स्तुतिस्तोत्रें गायला सुरवात केली. जों जों भुंग्याचा काव्यांत अधिक उल्लेख होऊं लागला, तों तों वृत्त कल्पना, भावना याप्रमाणें तोहि काव्याचा एक आवश्यक घटक होऊन बसला. कवींचें बहुमत भृंगपक्षाकडे गेलें. मग बहुमत हा अनेकदां मूर्खांचा बाजारहि असतो याची दखल कोण घेणार ?

भुंग्याविषयींच्या पक्षपातामुळें कवींनीं ज्या अनेक प्राण्यांचा अन्याय केला आहे, त्यांतील पांचच, माझे साक्षीदार म्हणून मी पुढें करतों. दिव्याभोंवतीं रात्रीं प्रदक्षिणा घालणारीं चिमणीं फुलपांखरें कुणीं पाहिलीं नाहींत ? दिवसा बिचारीं पोटाच्या पाठीमागें लागून गवताच्या फुलांच्या भोंवतीं सुद्धां पिंगा घालीत असतील ! पण दीपज्योतीबरोबर त्यांची आत्मज्योतीहि प्रज्वलित होते. रजनी ही ध्येयाची माता आहे हें त्यांना पाहिलें कीं, तात्काळ पटूं लागतें. त्यांच्या त्या दिव्याभोंवतालच्या प्रदक्षिणा–शिळेवर उभी राहिलेली सतीच काय ती त्यांच्याशीं त्यागाच्या बाबतींत स्पर्धा करूं शकेल. आणि त्यांच्या त्या चिमण्या पंखांचे चित्रविचित्र मोहक रंग–बखोद्याला आम्ही जवाहिरखाना पाहाण्याकरितां

गेलों होतों आणि मुंबईच्या एका दुकानदारानें तर विविध रंगाच्या



आणि किनारींच्या जरीच्या पातळांच्या चक्रव्यूहांतच मला एकदां कोंडलें होतें. पण या दोन्ही वेळीं माझ्या नेत्रांनीं अनुभवलेलें रंगसौंदर्य माझ्या दिव्याभोंवतीं बागडणाऱ्या फुलपाखराकडे पाहिलें कीं, अगदीं फिक्के वाटूं लागतें.

मीं मुद्दामच सुंदर प्राण्याचें उदाहरण घेतलें असें तुम्हांला वाटत असेल. मासा कांहीं पतंगाइतका मोहक असत नाहीं, पण विरहाचें वर्णन करतांना ‘ जळाविण जैसी मासोळी ’ असें म्हटलें कीं कवींचा माशांशीं संबंध संपला ! तरुणांच्या मनांतील प्रेम-भावनांच्या नाजुक हालचालीप्रमाणें पाण्यांत चाललेली त्यांची खळबळ सोडून द्या ! पण जाळ्यांतून बाहेर काढल्यावरही तड-फडतांना, अगदीं प्राण सोडतांनाहि, त्यांच्यांतले खापीसारखे मासे विद्युद्दीपाप्रमाणें–अगदीं हिऱ्यासारखे चमकतात, हें कितीशा कवींना ठाऊक असेल ? त्यांची ती चमक देशाकरितां फासावर चढ-णाऱ्या वीरांच्या नेत्रांतील उज्वल दीप्तीइतकीच आकर्षक असते.

सौंदर्याचा वरदहस्त तर राहूं द्याच, पण साधा स्पर्शहि ज्यांना झालेला नाहीं अशा प्राण्यांचा परामर्शसुद्धां कांहीं कमी काव्यमय होणार नाहीं ! हा पहा कोळी ! ‘ मॉडर्नरिव्ह्यू ’ मधील बंगाली चित्रावरून त्यानें आपलें शरीर बनाविलें आहे, असा एखाद्याला भास व्हावयाचा. तें कांहीं का असेना ! त्याचा स्पर्श मला नको

असला तरी माझ्या खोलीच्या कोपऱ्यांत त्यानें आपला जो नवा बंगला बांधला आहे तो जमीनदोस्त करण्याला मी कांहीं मोलकरणीला परवानगी देत नाहीं ! माझ्या मच्छरदाणीला मानवी भावना असत्या, तर या कोपऱ्यांतील कलाकौशल्याला लाजून ती केव्हांच उशींत तोंड खुपसून बसली असती ! त्या दिवशीं टेकडीवरच्या रस्त्यावर कोळ्याचें केवढें घर पाहिलें मीं ! घर कसलें राजवाडाच होता तो. सूर्यकिरणांनीं चमचमणारे त्या राजवाड्याचे चिमणे स्तंभ किती आकर्षक दिसत होते. सूत काढण्याच्या शर्यतींत जर कोळ्याला भाग घेतां आला असता, तर जास्तींत जास्ती नंबराचें सूत काढून त्यानें पहिला नंबर खास पटकावला असता ! पण या कोळ्याचें कवितेंत कुठें स्थान आहे, तर 'एका कोळियानें एकदां आपुलें' या मराठी दुसऱ्या इयत्तेच्या एका पुस्तकांतील कवितेंत !

सुरवंट आणि वाळवी ही मंडळी उपद्रवी असतात, पण दुष्ट मनुष्यांत गुण नसतात असें थोडेंच आहे ! दारू पिऊन बायकोला बडविणारा मनुष्य काय सुरस कादंबरी लिहूं शकत नाहीं ? सुरवंट अंगावर पडला म्हणजे कुत्सित टीकाकारापेक्षांहि अधिक त्रास देतो खरा ! पण हें चिमुकलें अस्वल वेलीच्या अग्राला लोंबकळून झोके घेतें, तेव्हां त्याच्याकडे पाहाण्याचा मोह कुणाला होणार नाहीं ! गवताच्या चिमण्या पातीच्या टोंकाला जाऊन जणूं कांहीं तिचाच एक भाग म्हणून



ही स्वारी स्वस्थ बसली म्हणजे तर समाधिस्थ योग्याचीच आठवण होते ! वाळवीचेंही तसेंच आहे. थोडे दिवस खुंटीवर ठेवलेल्या धोतराची मच्छरदाणी आणि मच्छरदाणीच्या चिंध्या करण्यांत ती चतुर असते खरी, पण त्याबरोबरच तिचा गनिमी कावा कौतुकास्पद वाटत नाहीं का ? एके दिवशीं रात्रीं स्वच्छ केर काढून, शेंदरी घालून त्यावर मीं आपली गादी पसरली. दुसरे दिवशीं सकाळीं उठून अंथरूण गुंडाळतों तों शेंदरीला चांगलें छिद्र पडलेलें ! 'छिद्रेष्वनर्था बहुलीभवन्ति !' भराभर त्या छिद्रांतून वाळवीची सेना वर येत होती. शाहिस्तेखानावर छापा घालून शिवाजीनें त्याचीं बोटें कशीं कापलीं असतील याची मला त्यावेळीं पूर्ण कल्पना आली !

केवळ संकेताला बळी पडल्यामुळें अशा प्राण्यांच्या सौंदर्याचा अगर चातुर्याचा आपल्या काव्याला उपयोग करण्याऐवजीं भारतीय युद्धापासून दांडी सत्याग्रहापर्यंतचे सारे कवि भुंग्याभोंवतीं पिंगा घालीत बसले आहेत. स्वर्ग-पाताळांतही संचार करण्याचा जिचा अधिकार ती कल्पकताच जिथें अशा बंधनांत पडते, तिथें पांगळ्या व्यवहाराच्या कपाळीं अंधारकोठडीच यायची ! स्वतःच्या मुलांचीं नांवें ठेवायचीं असोत, अगर लोकांना नांवे ठेवायचीं असोत, पूर्वसंकेतापलीकडे पाऊल टाकायला कुणीच तयार होत नाहीं. पक्वान्न करावयाचें असो, अथवा प्रेम करावयाचें असो तें पूर्वापार पद्धतीनें करावयाचें, हा तर आमचा सामाजिक बाणा ! 'साध्याही विषयांत आशय कधीं मोठा किती आढळे' या केशवसुतांच्या ओळींत जीवन उन्नतर करण्याचा महामंत्रच सांगितला आहे खरा ! पण साधे विषय असले तरी आंधळ्यांनीं ते पाहायचे कसे ? पूर्वज, पुराणें, परिस्थिति हीं सारीं जणूं कांहीं जीवनाला कोंडून

ठेवण्याकरितां एक अभेद्य तट रचीत असतात आणि मग त्या तुरुंगांत वावरणाऱ्या जीवनाला वाटतें—हा तुरुंग म्हणजेच सारें जग !

संकेत हे राजमार्गाप्रमाणें प्रशस्त असतात. त्यामुळें धोपटमार्गानें जाणारांना आणि सोबतीची अपेक्षा करणारांना ते आवडावेत हें स्वाभाविकच आहे. राजमार्गाच्या बाजूला असलेलीं तींच तींच घरें आणि तींच तींच दुकानें पाहून कंटाळा आला, तरी नव्या पाऊल-वाटेनें जाण्याचा धीरच होत नाहीं बहुतेक माणसांना ! त्यांना वाटतें आपण कुठेंतरी चुकूं ! बिचाऱ्यांना कळत नाहीं कीं, जो चुकतो तोच शिकतो ! पृथ्वीप्रदक्षिणेंत कितीही पुण्य आहे अशी खात्री असली तरी राजमार्ग तयार झाल्यावांचून हे लोक त्या बाबतींत एक पाऊलसुद्धां पुढें टाकणार नाहींत !

खरें जीवन पिंजऱ्यांत नसतें. पिंजऱ्याबाहेरच तें नाचत असतें, हें पांखराप्रमाणें माणसालाहि कळायला हवें, वळायला हवें आणि म्हणूनच त्या भुंग्याला झोडपल्याबद्दल आतां मला इतकें वाईट वाटत नाहीं. संकेतनिष्ठता झुगारून देण्याचा माझ्या मनानें जो हल्लीं निश्चय केला आहे, त्याचें तें व्यक्तस्वरूप नसेल कशावरून ? कोयता हातोडा हीं जर शेतकरी—कामकऱ्यांचीं स्फूर्तिदायक प्रतीकें, तर आजपर्यंत कवींनीं अवास्तव स्तोम माजविलेल्या भुंग्याला झोडपणें हेंहि माझ्या मनांतील काव्य-कल्पनांच्या क्रांतीचें प्रतीक कां होणार नाहीं ? बाकी प्लँचेटवरून बोलतां आल्यास तो दिवंगत भुंगा म्हणेल, " संकेत केले आणि ते अंधपणानें पाळले कवींनीं, पण मेलों मात्र मी ! एकाचा खेळ होतो आणि दुसऱ्यास जीव जातो ! "

लवकरच स्मारक करण्याचें आश्वासन देऊन या भुंग्याची कशीबशी समजूत घालीन म्हणा मी !

पाहिलेंत, हें असें होतें ! नाहीं नाहीं म्हटलें तरी संकेताचा केवढा पगडा मनुष्याच्या मनावर असतो. भुंग्याचें स्मारक करण्याचें कबूल केलें खरें ! पण कवीप्रमाणें स्मारकेंही करून होत नाहींत, हें काय मला कळत नाहीं ?

लघुनिबंधः—नेहमींच्या परिचयाचे विषय आणि त्यांच्या सभोंवतीं स्वतंत्र विचारांची केलेली मनोरंजक गुंफण, यामुळेंच लघुनिबंधाला चटकदारपणा येतो. दुसरें हें कीं, त्यांत आटोपशीरपणा व प्रच्छन्न विनोद हाहि यावा लागतो. शिवाय लेखकाचा जगाकडे पाहण्याचा दृष्टिकोण त्यांत प्रतिबिंबित होतो. केवळ विषयाच्या आंतील तत्त्वज्ञानामुळें नव्हे तर त्याच्या प्रतिपादनाच्या मोहक शैलीमुळें असे निबंध आकर्षक होतात. लेखकाचें व्यक्तिमत्व, त्याच्या आवडीनिवडी—यांचीहि अनायासें त्यांतून ओळख पटते. काव्य, नाट्य, याप्रमाणेंच लघुनिबंध हे सुद्धां वाङ्मयाच्या ललितशाखेंतच मोडतात.

टीपाः—१ प्रीति आणि कीर्ति ह्यांच्यामागें लागून त्या मिळत नाहींत, निद्रेचेंही तसेंच आहे. २ भुंग्याला मारणें म्हणजे अरसिकत्व प्रकट करणें होय. काव्याला उतरती कळा लागल्यामुळें लोक अरसिक होऊं लागले आहेत, अशी लेखकानें येथें कोटी केली आहे. ३ 'शकुन्तला' बागेंत बसली असतां तिला भ्रमराचा त्रास होऊं लागला, त्या संधीचा फायदा घेऊन दुष्यन्त पुढें आला आणि त्यानें वरील संकटांतून तिची सुटका केली, हा प्रसंग शकुन्तला नाटकांत आला आहे. ४ विक्रमोर्वशीय नाटकाच्या चौथ्या अंकांत पुरूरवा राजा आपल्या पत्नीच्या शोधार्थ रानावनांत फिरतो आणि तेथें आढळणाऱ्या पशुपक्ष्यांना तो तिची माहिती विचारतो, असा कथाभाग आलेला आहे.

प्रश्नः—निद्रा, प्रीति आणि कीर्ति ह्यांचा परस्पर संबंध काय ? अलीकडचा काल काव्याला अनुकूल नाहीं असा प्रश्न मेकॉलेनें काढिला होता. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं तसेंच मत प्रकट केलें. तुमचें काय

मत आहे ? रजनीला ध्येयाची माता कां म्हटलें आहे ? मॉडर्न रिव्ह्यूमधील चित्र ( बंगालमधील कलकत्ता येथें प्रसिद्ध होणारें पहिल्या-प्रतीचें इंग्रजी मासिक ) आणि ' कोळी, ' यांच्यामध्यें कोणता सारखेपणा आहे ? ( बंगाली चित्रकलेंतील रेषालेखन फार सूक्ष्म असतें. ) संकेताला बळी पडलेल्या कोणत्या सुंदर प्राण्यांबद्दल लेखकास विशेष हळहळ वाटत आहे ? ती यथार्थ आहे काय ? खालील वाक्यांचें स्पष्टीकरण करा.

१ संकेत राजमार्गाप्रमाणें······असतात. २ खरें जीवन पिंजऱ्यांत नसतें. ३ पण कवीप्रमाणें······होत नाहींत.

**पुरवणीवाचनः**—प्रो. वि. पां. दांडेकर यांचा ' फेरफटका, ' प्रो. फडके यांच्या ' गुजगोष्टी, ' अनंत काणेकर यांचीं ' पिकलीं पानें, ' बा. भा. पाठक यांच्या ' नकोत त्या गोष्टी ' आणि गं. भा. निरंतर यांची ' साखरझोंप ' हीं पुस्तकें वाचा.

---

# ९. रात्र आणि दिवस

**ओळखः**—मुक्तेश्वर यांची मराठी भाषेंतील श्रेष्ठ प्रकारच्या ललित कवींत गणना होते. हे सतराव्या शतकाच्या पूर्वार्धांत होऊन गेले यांच्या आईचें नांव गंगाबाई व वडिलांचें नांव चिंतामणी असें होतें; परंतु त्यांनाच लीला–विश्वंभर असें म्हणत. दत्त हें कवीचें उपास्य दैवत. त्यामुळें लीलाविश्वंभरास वंदन करण्याची कवीची रीत असे. तत्कालीन कवीप्रमाणें मुक्तेश्वरांनीं महाभारताच्या कांहीं पर्वांचीं मराठींत रूपांतरें केलीं. त्यांपैकीं पांच पर्वें आज मूळच्या स्वरूपांत प्रसिद्ध आहेत भाषेंतील प्रसाद आणि ओघ, त्याचप्रमाणें समर्पक दृष्टांत आणि उपमा, ह्यांमुळें त्यांचें काव्य सरस आणि चटकदार झालें आहे. शृंगार

वीर, करुण, अद्भुत इ० रस काव्यांत निर्माण करण्यांत त्यांचा हातखंडा होता. ते एकप्रकारें लौकिक कवि होते; म्हणजे संसारांतील व्यक्तीला अनुभवास येणाऱ्या प्रेम, शोक, हर्ष इत्यादि भावना त्यांनीं आपल्या काव्यांतील पात्रांच्या द्वारें, जणुं कांहीं व्यक्त केल्या आहेत. त्यांनीं लिहिलेल्या जरासंधवधाचें वर्णन, आणि सोबतचा उतारा यावरून त्यांची कोणत्याही प्रसंगाची व निसर्गांतील देखाव्याची, यथातथ्य शब्द-चित्र रंगविण्याची कला तुमच्या प्रत्ययास येईल.

विषयः—कौरवांच्या कपटनीतीमुळें पांडवांवर जीं अनेक संकटें ओढवलीं त्यांतच, दुर्योधन, दुःशासनांनीं त्यांना लाक्षागृहांत, जिवंत जाळण्याची कल्पना लढविली हें एक होय. त्याहि बिकट परिस्थितींतून भीमसेनाच्या पराक्रमामुळें आणि चातुर्यामुळें पांडवांची सुटका झाली. दोन्ही बाहूंवर धर्मार्जुन, कडेवर नकुलसहदेव, आणि खांद्यांवर आपली आई कुंती, यांना घेऊन भीम, जों लाक्षागृहांतील विवरांतून वर आला तोंच त्याला, मध्यरात्रीचें अक्राळविक्राळ स्वरूप दृष्टीस पडलें. ती मध्यरात्र नव्हे तर काळपुरुषाची जणुं कांहीं ती कांबळीच होती, असें कवीनें त्यावेळेचें वर्णन केलें आहे. किती सुंदर, भव्य, आणि यथार्थ उपमा ! पुढील ओळी वाचतांना, अशाच रोमांचकारी कल्पना तुम्हांस आढळतील आणि रात्रीच्या अखेरीस तांबडें फुटण्याच्या वेळच्या वर्णनानें तर तुम्हांला आनंद होईलच. पण रात्र आणि दिवस यांतील चांगलाच फरक दिसेल. वर्णनांत थोडीशी अतिशयोक्ति असेल, पण त्यामुळें रसहानि होते काय !

भीमसेन पाहे दृष्टी । तंव अंधकारें कोंदली सृष्टी ॥
गुल्मलता वृक्षदाटीं । तृणें मार्ग लक्षेना ॥ १ ॥
निशाचरी श्वापद पक्षी । थोर गर्जना करिती कक्षीं ॥
ओळकंबलीं महावृक्षीं । आरवलें आणि वाघुळें ॥ २ ॥

वनदेवता यक्षिणी पाळें । घुमस घालिती गदारोळें ॥
दीपिका लावूनि भंबाळें । गुप्त होती एकसरा ॥ ३ ॥
प्रेतगण स्मशानवासी । रूपें धरूनि भ्यासुर वेषीं ॥
छळिती अशुचि मानवांसी । झोंबती मांस भक्षावया ॥ ४ ॥
दिवाभीतांचे घुंघाट । पिंगाळियांचे किलकिलाट ॥
भालू भुंकती सैराट । टिटिवे थोर टिवटिवती. ॥ ५ ॥
चक्रवाकांचे आर्तस्वरीं । कुमुदीं भ्रमरांचे झुंकारीं ॥
मस्तकमणी तेज विखरीं । जीव आहारा शोधिती ॥ ६ ॥
असो. हे निशा दाटली काळी । जेवीं काळपुरुषाची कांबळी ॥
ब्रह्मांडदेवतेवरी सगळीं । पांघुरविलीं आप्तवें ॥ ७ ॥
ऐसें देखोनि तयेकाळीं । भीमसेन बळियाबळी ॥
धैर्यकांस घालूनि कवळी । पांचांतेंही एकला ॥ ८ ॥
खांदीं वाहूनियां जननी । कडिये माद्रीकुमर दोनी, ॥
धर्मार्जुना बाहुस्थानीं । पाणितळें कवाळिलें ॥ ९ ॥
पाठीं देऊनि ध्रुवमंडळा । अगस्तिचक्रा लक्षूनि डोळां ॥
वामीं कृत्तिकांचा मेळा । याम्यदिशे चालिला ॥ १० ॥
पवनवेगें पवनात्मजू । दक्षिणदिशे निघाला उजू ॥
जैसा मातला महागजू । कर्दळी-वना विभांडी ॥ ११ ॥
झडपाआड मोडीत झाडें । तळवा चूर्ण करीत धोंडे ॥
श्वापद सर्पांचीं जुंबाडें । पायांतळीं रगडीत ॥ १२ ॥
भीमसेनाचा अंगवायो । सुटतां सिंह शार्दुला प्रळयो, ॥
म्हणती 'वना करावया क्षयो । काय अद्भुत पातलें' ॥ १३ ॥
शेष वेंचतां अठरा घटका, । पूर्व दिशेनें क्षाळिले मुखा ॥
कुंकुम रेखिलें त्या तिलका । अरुणोदय बोलिजे ॥ १४ ॥

भार्गवाचार्य उदया येत । तंव अपार क्रमूनिया पंथ ॥
पुढें जान्हवीजळाचा वात । शीतळ, मंद, पातला ॥ १५ ॥
हस्त आवरितां कुमुदीं । अवमान मानिला षट्पदीं ॥
त्यांतें आदरें कोकनदीं । पाचारिलें जवळिकें ॥ १६ ॥
गगनसमुद्रीं मुक्ताफळें । अरुण चंचुनें कनकमराळें ॥
वेचूनि घेतां कलाकुशळें । नाहींच केलीं नक्षत्रें ॥ १७ ॥
कीं व्योमनर्मदेमाजी थोर । कार्तवीर्य सहस्रकर ॥
ताराबाणलिंगाचा भार । निवटोनि करी परौता. ॥ १८ ॥
कापडी चालिले तीर्थपंथें । ' सोऽहमस्मि ' चिंतिती ज्ञाते ॥
भक्त स्मरती हरिहरांतें । प्रेमभावें आवडीं. ॥ १९ ॥
शाक्त चिंतिती शक्तिप्रतिमा । सौर म्हणति सूर्यचि आत्मा॥
गाणपत्य गणेश महिमा । वाखाणिती ब्रह्मत्त्वें. ॥ २० ॥
प्रातर्होम द्यावया जाणा । अग्निहोत्री उठले स्नाना ॥
एक सिद्ध झाले अनुष्ठाना । जपी तपी सुनेमें. ॥ २१ ॥
असो. मार्गें वारणावर्तीं । उदया येतां पद्मिनीपती, ॥
दग्धगृहा वेष्टिती पंक्ती । पौर यांच्या दाटल्या. ॥ २२ ॥

—मुक्तेश्वरकृत महाभारत.

टीपा:—ओळकंवलीं–लोंबलीं. गदारोळ–गर्जना, कल्लोळ. कोकनदीं–लाल कमलांनीं; कापडी–खांद्यावर कावड घेऊन तीर्थयात्रा करीत फिरणारा मनुष्य. ' सोऽहमस्मि ' तो मीच आहें. परमात्मा ( तो ) व जीवात्मा ( मी ) हे एकच आहेत असें, अद्वैत तत्त्व.

प्रश्न:—दिवाभीत, भालू आणि पिंगळ यांचे उल्लेख या कवितेंत कशाकरितां आले आहेत ? भीमसेनाच्या पराक्रमाशीं कोणाची तुलना केली आहे ?/त्यानें कोणता पराक्रम केला ? अरुणाला कोणाची उपमा दिली आहे ? अरुणोदय होतांच आकाशांत कोणती शोभा दिसते ? कवीनें

अरुणोदयाचें महत्त्व कसें वर्णिलें आहे ? कवीच्या मतें आकाशांतील नक्षत्रें कशामुळें नाहींशीं झालीं ?

**अभ्यासः**—( १ ) खालील शब्दांची व्युत्पत्ति व अर्थ लिहा.

गदारोळ, गुल्मलता, जुंबाड, गाणपत्य, सौर, विभांडी.

( २ ) या कवितेंत जे अलंकार आले आहेत, त्यांचीं नांवें व लक्षणें लिहा.

( ३ ) केशवसुतांनीं 'रात्र आणि दिवस' या नांवाची कविता लिहिली आहे; त्यांनीं रात्रीकडे कोणत्या दृष्टीनें पाहिलें आहे, तें वाचा आणि सोबतची कविता वरील कवितेहून कशी निराळी आहे, तें दाखवा.

**पुरवणीवाचनः**—रात्र आणि दिवस ( केशवसुत ); घुबडाचें गाणें ( गोविंदाग्रज ) या कविता वाचा.

---

# १०. नवी सृष्टि.

**ओळखः**—कै. प्रो. शिवराम महादेव परांजपे यांचें मूळगांव महाड. यांचा जन्म इ. स. १८६४ मध्यें झाला. न्यू. इं. स्कूल पुणें या शाळेंतून ते इ. स. १८८४ मध्यें प्रवेशपरीक्षा उत्तीर्ण झाले, आणि त्यांना संस्कृत विषयांतील प्रावीण्याबद्दल जगन्नाथ शंकरशेट यांनीं ठेविलेलें गुणवेतन मिळूं लागलें. डेक्कन कॉलेजांतून ते इ. स. १८९२ सालीं एम्. ए. ची परीक्षा 'भगवानदास प्राईझ' व 'झालावेदान्तप्राईझ' मिळवून पास झाले. त्यानंतर भावे स्कूलच्या मंडळींनीं काढलेल्या महाराष्ट्र-कॉलेजांत ते दोन वर्षें प्रोफेसर होते. इ. स. १८९८ मध्यें त्यांनीं आपलें प्रख्यात 'काळ'

पत्र सुरू केलें. इ. स. १९०८ ते १९१० या अवधींत आक्षेपार्ह लेखांबद्दल त्यांना तुरुंगवास घडला. वाङ्मयाच्या व वक्तृत्वाच्या द्वारें आपल्या देशाची सेवा करण्यांत त्यांचें बहुतेक आयुष्य खर्ची पडलें. अखेरीस त्यांनीं 'स्वराज्य' नांवाचें वर्तमानपत्रहि चालविलें होतें. मराठी भाषेतील साहित्याचार्यांत त्यांची गणना होते. 'स्वदेशप्रेम' हें त्यांच्या वाङ्मयाचें कारण आणि 'उपहास आणि वक्रोक्ति' हीं त्यांचीं साधनें होत. त्यांचें बहुतेक वाङ्मय सरकारी दरबारात आक्षिप्त म्हणून अजून पडून राहिलें आहे. इ. स. १९२९ मध्यें ते महाराष्ट्र साहित्य-संमेलनाचे अध्यक्ष झाले आणि त्याच वर्षी निर्घृण काळाचा त्यांच्यावर पाश पडला.



विषय:—पौराणिक गोष्टींच्या आधारानें सद्यःस्थितीवर ज्यांत लेखकानें उपहासात्मक टीका केली आहे असा हा एक धडा आहे. सर्व मानवजातींत संपूर्ण सुखानें नांदूं शकेल अशी काल्पनिक सृष्टि निर्माण करण्याकरितां आजकाल सुधारलेलीं राष्ट्रें मनोराज्यें बांधीत आहेत. परंतु काल्पनिक सृष्टीची ( Utopion ) कल्पना कितीहि मोहक असली तरी जोंपर्यंत 'बळी तो कान पिळी' हा न्याय प्रत्येक राष्ट्राच्या हाडींमासीं खिळून राहिला आहे तोंपर्यंत वरील कल्पना सत्यसृष्टींत उतरणें अशक्यच. समजा, विश्वामित्रासारख्या श्रेष्ठ तपस्व्याच्या हातून ती गोष्ट साध्य झाली आणि

त्या नव्या सृष्टीची उभारणी, प्रत्येक प्राण्याच्या मनाप्रमाणें करण्याचें ठरलें तर काय मौज उडेल, हें तुम्हांला खालील उताऱ्यावरून समजेल.

इकडे विश्वामित्राचा उपक्रम पाहून स्वर्गलोकामध्यें इंद्रादि देवतांना मोठी काळजी पडली. विश्वामित्रानें दुसरी सृष्टि निर्माण करण्याला सुरवात केली, कांहीं नक्षत्रेंहि उत्पन्न केलीं, आणि नवीन सृष्टींत दुसरा इंद्र निर्माण करावयाचा किंवा इंद्राची जागा मुळींच कमी करून टाकावयाची, या विचारामध्यें विश्वामित्र आहे, ही बातमी जेव्हां इंद्राला कळली, तेव्हां तर इंद्र फारच घाबरून गेला व आतां पुढें काय करावें, या आपत्तीवर उपाय काय योजावा, विश्वामित्राच्या सामर्थ्याला प्रतिबंध करण्याचें सामर्थ्य आपल्या कोणामध्यें आहे, किंवा त्याच्याशीं कांहीं तडजोडीचा तह करणें श्रेयस्कर आहे, असे अनेक प्रश्न देवांच्या समोर येऊन उभे राहिले.

स्वर्गलोकांतील देव इतक्या तऱ्हेनें गडबडले आहेत आणि घाबरून गेले आहेत, याबद्दलची कुणकुण पृथ्वीवरील लोकांना ताबडतोब समजल्यामुळें, त्या लोकांना तर फारच चेव आला. आजपर्यंतच्या देवांनीं आपल्याला वाटेल तसें वागविलें, आपल्या पूजा करून घेतल्या आणि आम्हांला राबविलें, आपण नैवेद्य खाल्ले आणि आम्हांला उपाशीं मारलें, अशा प्रकारच्या आजपर्यंतच्या त्यांच्या वागणुकीबद्दल त्यांच्यावर सूड उगविण्याची विश्वामित्रानें आतां ही मोठी उत्कृष्ट संधि आणून दिलेली आहे; तेव्हां ह्या जुन्या जगाचा नाश करून नवीन जग चांगल्या पायावर आणि संतोषकारक तत्त्वांवर कसें रचावें, याच्याबद्दल विश्वामित्राला वेळींच आपण योग्य सूचना करणें हें आपलें अत्यंत

आवश्यकतेचें कर्तव्यकर्म आहे, अशा विचारांनीं प्रेरित होऊन सर्व लोक विश्वामित्राच्या आश्रमाकडे निघाले.

विश्वामित्राच्या तपोवनाभोंवतीं या लोकांची हळू हळू इतकी गर्दी होत चालली कीं, विश्वामित्राचे चौसष्ट हजार शिष्य त्यांचें म्हणणें लिहून घेण्याकरितां बसले असतांहि त्यांच्या नवीन जगांतील सुधारणांसंबंधींच्या सूचना कांहीं केल्या संपेनात. कित्येकांच्या सूचना लिहून घेण्याच्या राहून गेल्या, कित्येकांच्या अर्धवटच लिहून घेतल्या गेल्या आणि कित्येक सूचना लिहून घेण्यांत तर अशी गडबड होऊन गेली कीं, कांहीं लोकांनीं जी मागणी केली होती ती दुसऱ्यांच्या नांवावर पडली, आणि दुसऱ्यांनीं केलेली मागणी जी त्यांना नको होती ती दुर्दैवानें त्यांच्या नांवावर पडली, आणि त्यामुळें फारच अनर्थ ओढवण्याचा प्रसंग प्राप्त झाला होता. कोणीं कोणी काय काय मागितलें होतें, हें त्या वेळीं जर पूर्णपणें लिहून सुद्धां घेतां येणें शक्य नव्हतें, तर आतां तें पूर्णपणें सांगणें अधिकच अशक्य आहे, हें उघड आहे. तरी पण त्या वेळच्या सूचनांपैकीं आणि मागण्यांपैकीं कांहींकांहींचा अवशिष्ट उल्लेख कोठें कोठें सांपडतो—

झाडें म्हणालीं, आम्ही जुन्या जगांत उभीं राहून राहून कंटाळलों आहों, तेव्हां आम्हांला वाटेल तेव्हां खालीं बसतां यावें व वाटेल तेव्हां उभें राहातां यावें, अशी कांहीं तरी सोय झाली पाहिजे!

वेली म्हणाल्या, आम्हीं झाडांच्या आश्रयानें आतांपर्यंत दिवस काढले, परंतु यापुढें आम्हांला आमच्या स्वतःच्या पायावर उभें राहातां येण्याची स्वतंत्रता असावी.

पर्वतांनीं आपलें म्हणणें असें लिहून दिलें की, पूर्वीं आम्हांला पंख होते; परंतु त्या इंद्रानें ते आमचे पंख कातरून टाकले आहेत;

ते या नवीन सृष्टीमध्यें आमचे आम्हांला परत मिळावेत. तसेंच अगस्त्य ऋषीनें आम्हांला फसवून आमची वाढ खुंटविली आहे. " मी दक्षिणेकडे जाऊन येत आहे, तोंपर्यंत तुम्ही वाढूं नका," असें सांगून अगस्त्य ऋषि जो दक्षिणेकडे जाऊन बसला आहे तो तेथून मुळींच हालत नाहीं ! हा आज परत येईल, उद्यां परत येईल, अशा आशेवर आम्ही आपली वाढ थांबवून त्याची मार्गप्रतीक्षा करीत बसलों आहों. तर त्याला तरी बोलवावें, किंवा आम्हांला तरी वाढण्याची परवानगी द्यावी !"

मासे म्हणाले, " आम्ही युगेंच्या युगें पाण्यांत राहून अगदीं थंडावलों आहों, तेव्हां आम्हांला या नवीन सृष्टींत जमिनीवर फिरण्याची परवानगी असावी !" ही सूचना ते करीत असतांना जे पुष्कळ मत्स्याहारी लोक त्यांच्याजवळ होते, त्यांनींहि या सूचनेंतील शहाणपणाबद्दल माना डोलावल्या व ही सूचना नवीन जगामध्यें अवश्य अमलांत आली पाहिजे, असा त्यांनीं आपला नेटाचा दुजोरा त्या सूचनेला दिला !

सापानें विनंती केली कीं, माझ्या या विषारीपणाचा मला अलीकडे अगदीं तिटकारा येऊं लागला आहे. या दुर्गुणाबद्दल ज्यानें त्यानें मला डवचावें आणि मारावें, ही स्थिति कांहीं चांगलीं नाहीं. तेव्हां याबद्दल कांहींतरी तजवीज झाली, तर बरें होईल. यावर विश्वामित्राच्या शिष्यांनीं त्याला असें सांगितलें कीं, हें तुमचें सापांचें विष, तुमच्या जिव्हेंतून काढून घेतलें, तर तें ठेवावयाचें कोठें ? तें कोणी घेण्यास तयार होत असतील, तर मग तें तुमच्यापासून काढून घेण्याची तजवीज करण्यांत येईल. हें त्यांचें बोलणें चाललें असतां तेथें कांहीं दुर्जन आणि निंदक चहाडखोर होते, त्यांनीं तें ऐकलें. तेव्हां आपल्या धंद्याला लागणारा हा महत्त्वाचा

माल अशा बिनमोलानें चालला आहे असें पाहून, त्यांना वाईट वाटलें व सापाचें जितकें विष असेल तितकें सगळें आपल्या जिव्हाग्रीं धारण करून सापांचें ओझें हलकें करण्याचें त्यांनीं आश्वासन दिलें !

हत्तींनीं पुढें येऊन अशी तक्रार सांगितली कीं, सगळया प्राण्यांचे दांत त्यांच्या तोंडांत असतात, परंतु आमचे दांत मात्र एकाद्या दंताड्या माणसाच्या दांतांप्रमाणें बाहेर आलेले असतात; तेव्हां ते आंत गेले तर बरें. यावर असा आक्षेप काढण्यांत आला कीं, ज्याचे दांत त्याचेच घशांत घालणें हें चांगलें नाहीं. त्यामुळें ती सूचना विचारांत आली नाहीं.

बगळ्यांनीं अशी एक जुनी हकीकत सांगितली कीं, आम्ही आणि ढोंगी साधु यांच्या दरम्यान पहिल्या सृष्टीच्या आरंभीं असें ठरलें होतें कीं, फक्त कांहीं दिवसपर्यंतच आम्ही डोळे मिटून पाण्यांत बसून आपलें भक्ष्य गांठावें आणि ढोंगी बुवांनीं जमिनीवर डोळे मिटून बसून लोकांना फसवावें. त्याप्रमाणें आम्ही आजवर पाण्यांत बसून बसून गारठून गेलों आहों. तेव्हां या नवीन सृष्टीमध्यें आतां आम्हांला साधु करावें आणि ज्यांनीं आतांपर्यंत लोकांना भोंदण्याचें काम केलेलें आहे, त्यांना आमच्याप्रमाणें गळयाइतक्या पाण्यांत उभें करावें !

कित्येक पशूंनीं आपल्या वतीनें अशी कैफियत दाखल केली कीं, बुद्धीच्या तुलनेच्या दृष्टीनें पाहिलें असतां, मनुष्यांपैकीं कित्येक लोक अगदीं आमच्यासारखे असतात, किंबहुना आमच्याहून देखील क्वचित् स्थळीं त्यांची अक्कल कमी असते. असें असून निर्बुद्धपणाचीं द्योतक अशीं जीं शिंगें तीं फक्त आमच्याच कपाळीं. तेव्हां या नव्या सृष्टीमध्यें तरी हा पक्षपात अवश्य दूर झालाच

पाहिजे. मूर्ख लोकांच्या डोक्यांवर तरी मूर्खपणाची खूण म्हणून आमच्यासारखीं शिंगें लावा, नाहींतर त्यांच्याप्रमाणें आमच्या तरी डोक्यावरचीं शिंगें काढून टाका !

अशा प्रत्येकाच्या निरनिराळ्या मागण्या किती सांगाव्या ! थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे प्रत्येकजण आपापल्या पहिल्या असलेल्या स्थितीला कंटाळलेला होता आणि अननुभूत अशा कोणत्या तरी नवीन स्थितीचा अभिलाष त्याच्या मनांत उचंबळत होता. कित्येकांनीं तर विश्वामित्राच्या नवीन सृष्टीच्या अंमलबजवणीची वाट न पाहतां आपणच होऊन आपलें स्थित्यंतर करून घेण्याला सुरवात केली ! गरिबांनीं श्रीमंत होण्याकरितां आपल्या फाटक्या चिंध्या फाडून टाकल्या ! चतुष्पादांनीं माणसांत मिसळून जाण्याकरितां आपले दोन पाय तोडून घेतले ! गाढवांनीं शहाण्यांत मोडण्याकरितां आपले कान कातरून घेण्याची कल्पना अमलांत आणिली ! असे अनेक विलक्षण प्रकार होऊं लागले. त्यांतच विश्वामित्राच्या शिष्यवर्गांतील लेखकांच्या हातून गर्दीमुळें व गडबडीमुळें होणाऱ्या चुकांच्या कारणानें भलत्यांच्या मागण्या भलत्यांच्याच नांवांवर नोंदल्या जात होत्या. कित्येक मागण्यांतील अभिप्राय लेखकांना बरोबर न समजल्यामुळेंही सदर रजिस्टरामध्यें कांहीं चुका झाल्या होत्या. लांबलांबच्याही प्रसिद्ध आणि गुप्त बातम्या आपल्याला सहज समजाव्या म्हणून कित्येकांनीं आपल्याला दूरश्रवणाची देणगी मागितली होती, त्यांच्या नांवापुढें लेखकानें शेरा लिहून ठेवला होता कीं, यांना लांब कान पाहिजे आहेत !

—शि. म. परांजपे.

प्रश्न:—विश्वामित्रानें आपल्या स्वतःची सृष्टि केव्हां व कोणाकरितां निर्माण केली होती ? अशा वेळीं पृथ्वीवर काय चमत्कार घडून आला ? वेली, झाडें,

पर्वत, साप यांना बोलके करण्यांत लेखकाचा काय उद्देश असावा? पशूंनीं माणसांत आणि आपणांत साम्य असावें म्हणून कोणती सूचना केली? ती यथार्थ होती काय? 'बगळा' आणि 'हत्ती' यांच्या उदाहरणांच्या द्वारें कोणावर टीका आली आहे? विश्वामित्रांच्या शिष्यांच्या धांदलीमुळें कोणत्या चुका घडून आल्या?

अभ्यासः—(१) बालसृष्टीचे प्रतिनिधी या नात्यानें तुमच्या कांहीं मागण्या असल्यास त्यांची यादी करा.

(२) या धड्यांत आलेल्या प्राण्यांच्या संभाषणांच्या आधारें एक नाट्यप्रवेश तयार करा.

(३) नमुनेदार शहराची तुमची कल्पना यावर एक निबंध लिहा.

खालील वाक्यांतील उपरोध स्पष्ट करा.

(१) सापाचें जितकें विष असेल तितकें सगळें आपल्या जिव्हाग्रीं धारण करून सापाचें ओझें हलकें करण्याचें त्यांनीं आश्वासन दिलें.

(२) ज्यांनीं आतांपर्यंत लोकांना भोंदण्याचें काम केलेलें आहे, त्यांना आमच्याप्रमाणें गळ्याइतक्या पाण्यांत उभें करावें.

(३) चतुष्पादांनीं माणसांत मिसळून जाण्याकरितां आपले दोन पाय तोडून घेतले.

(४) लांबलांबच्याही प्रसिद्ध आणि गुप्त बातम्या आपल्याला सहज ········यांना लांब कान पाहिजे आहेत.

पुरवणीवाचनः—प्रो. शि. म. परांजपे यांचे 'काळांतील निवडक लेख' हें नुकतेंच निर्बंधमुक्त झालेलें पुस्तक वाचा.

---

# ११ आशादेवी.

ओळख:—Bee ( जन्म इ. स. १८७२ ) यांचें संपूर्ण नांव नारायण



मुरलीधर गुप्ते हें असून त्यांचें शिक्षण वऱ्हाडांत झालें. अकोल्यास हल्लीं ते सेवानिवृत्त होऊन राहिले आहेत. त्यांची पहिली कविता इ. स. १८९१ सालीं प्रसिद्ध झाली. त्यांचें काव्यलेखन तेव्हांपासून सुरू झालें, तरी संख्येच्या मानानें त्यांच्या कविता थोड्या आहेत. इ. स. १९१४ मध्यें 'फुलांची ओंजळ' हें त्यांच्या कवितांचें पुस्तक प्रसिद्ध झालें. उदात्त आणि भव्य कल्पना व अस्खलित भावनेचा ओघ यांच्यामुळें त्यांच्या काव्यास गंभीर रमणीयता प्राप्त झाली आहे. त्यांच्या काव्यांत सूचकता प्रकर्षानें आढळते. आपल्या राष्ट्राच्या सद्यःस्थितीविषयींचे विचार त्यांच्या काव्यात ठिकठिकाणीं आले आहेत. मात्र त्यांच्या कोणत्याही कवितेंत, भावनेचा जिवंतपणा उमटल्या-खेरीज राहात नाहीं; म्हणूनच "जीवन जीवन जीवन गे—वर खालीं जीवन अवघें" हे रे. टिळकांचे उद्गार त्यांच्या काव्याला यथार्ततेनें लागू पडततात. मराठी कवितेची परंपरा खंडित झाली नाहीं याचें, त्यांचें काव्य हें एक उदाहरण आहे.

विषय:—आजच्या कालांत, सुधारलेलीं राष्ट्रें एकमेकांकडे स्पर्धेनें पाहात आहेत. त्यांच्या स्पर्धेतून केव्हां महायुद्ध निर्माण होईल याचा नियम नाहीं. इ. स. १९१४ सालीं जें जगांत महायुद्ध झालें त्याची आठवण अजून ताजीच आहे. असें असूनहि 'आशादेवी' शांतीचे सूर

आपल्या वीणेवर गात आहेच. हिंदवासियांनीं या कठीण प्रसंगीं चालू काळाला शोभेल असा प्रयत्नवाद स्वीकारला, तरच ‘ प्रभु ’ त्यांचा पाठिराखा होईल, हा संदेश कवींनीं या कवितेंत दिला आहे.

[ सुधारलेल्या जगांतील चालू ( १९१४ चें महायुद्ध ) भयंकर रणकंदनामुळें मानवी सुधारणेसंबंधीं नाना शंका उद्भवतात. काळाच्या अनंत प्रदेशांत हल्लीं मानवता अशा एका ठिकाणीं प्राप्त झाली आहे कीं, तेथें सर्वत्र ‘ धुंधुकार ’ पसरला आहे ! तरीदेखील आशादेवी भूगोलावर बसून आपल्या भग्न वीणेंतून मधुर स्वरालाप काढीत काढीत भावी कालाची उज्वल स्वप्नें पाहात बसली आहे. या भावी घटनेंत आपण कोणता भाग घेणार ? ]

झाली पश्चिम लाल लाल सगळी रक्तामधें माखुन,
गेली माजुन मानदर्पमदिरा बेहद्द ती प्राशुन;
प्रेतांनीं भरले नभांतिल दरेखोरे तयांच्यांवर
मांसाच्या चिखलांत मुक्त फिरते ही भैरवी भेसुर.

माझी पूर्व !–उषासखी, गुणवती, सत्त्वाढ्य तेजोवती,–
जीचें नित्य मृदुत्व लज्जित करी जाई–जुई–शेवती;
ती ह्या प्राणविनाश घोर बघुनी उद्विग्न झाली पुरी
शिंतोडे पडले अशुद्ध उडुनी तन्मंगलश्रीवरी.

रक्तें रंजित भोग काय करणें प्रीत्यर्थ त्यांच्या रणें ?
येथें सात्त्विक संपदा न मिळती का रक्तपाताविणें ?
आहे मानवजाति आक्रमित का उत्क्रांतिपंथाप्रती ?
शंका त्रासवितां अशा, दिसुनि ये तों एक चित्राकृति.

“ होतें सर्व सभोंवतीं पसरलें संदिग्ध श्यामांबर,
काळ्याशार ढगांत थेट शिरतां भूगोल हो गोचर;
तारा लोपुनि सर्व एक सरसा अंधार हो वाढता
तेथें पश्चिम पूर्व कोण कुठल्या ! साऱ्या दिशा आटतां.

विश्वांतील समस्त वस्तुंमधलें सौंदर्य जें जें असे,
नेत्रींच्या पुतळीकडून जपुनी वेंचूनि घ्या तें कसें !
चित्ताची बनवून मूस, तुमच्या सत्कल्पनेच्या करें
ओता मूर्ति तुम्हींच, कारण गिरा लाजोनि येथें सरे !

भूगोलावर त्या अधिष्ठित अशी कोणी कुमारी असे,
रूपा आंत नव्या छटा उफळतां ‘ न्यारी ’ खुमारी दिसे !
अंगांगें गळलीं, तशीच मळली खेदें मुखश्री, किती
स्कंधींचा सरला जरी पदर तो नाहीं तिला शुद्ध ती.

आकांक्षा, असहायता, अबलता, चर्येवरी रेखले
होते भाव, तयांस पाहुनि झणीं पाणी मुखींचें पळे;
स्नेहस्निग्ध नसे तिची नजर, ती शून्याकडे लागली.
वाटे स्वप्नदर्शंत चूर सगळी वृत्ती तिची जाहली !

वीणा एक जवाहिरें जडविली होती, जियेच्या वरी
तारा सर्व तुटोनि एक उरली बाकी, तियेला जरी
होती छेडित ती तशीच बसली काढीत तारेंतुनी
नाना सुस्वरमालिका, मृत मना चैतन्य दे तो ध्वनी ! ”

हें चेतोहर चारुचित्र विरलें त्या चारुगात्रीसह,
झाला जीव विषादजन्य हृदयग्लानींमुळें दुस्सह;
आहे सर्वविनाश ‘ आ ’ करुनिया आतां समीपस्थित,
यत्नाच्या परमावधीविण टळेना, तो असे निश्चित.

ह्यातें कार्य न हो तरीहि पडल्या काव्यांत या कष्टद
गाणें पूर्वपरंपरादि महती हें शुद्ध हास्यास्पद;
तेणें काय फसेल धूर्त जग हें वाटे असे आपणां ?
हें तों केवळ आत्मवंचन ! पुरे आतां जुन्या वल्गना !

विज्ञानें निगमागमांत असतीं किंवा पुराणांतलीं,
तीं तेथेंचि असोनि द्या ! गरज ना त्यांची कुणा राहिली !
शान्तिप्रेम समत्व पाठ नसते गाउंचि द्या आजला,
जे का मोहनमंत्रबद्ध असती माझे कवी त्यांजला.

आहे हा व्यवहाररूप अखिलव्यापार जो जो दिसे,
हें आहे जर मान्य, कायम ठसे त्याचे घडावे कसे ?
निर्मावें जग अन्यथा, त्यजुनियां वस्तुस्थितीला सदा
राष्ट्रात्मा अति पंगु पोकळ बने तेणें; नसे फायदा.

आहे बाल्यदशा दिसंदिस जरी वाढीस हा लागला
चालू मानववंश, हें न समजा कीं पूर्णता पावला;
हा तों नित्य चुके, प्रसंग पडती बांके, सदा काळजी !
खात्रीचा न उपाय एक म्हणुनी योजूं नये काय जी ?

आर्यांचेंच नसांनसांत उसळे तें रक्त जें दुर्धर,
ना बाहेर न आंत खास जगतीं आम्हांस जें दुष्कर;
देऊं तोंत नवीन काळ जर हा होऊन आम्ही नवे,
येतें पालटतां अम्हांसहि पुढें आल्या स्थितीच्या सवें.

आहे जोंवरि एक तंतु उरला वीणेवरी शाबुत,
आशा अद्भुत रम्य बोल असले राहील तों काढित;
ती होऊनि निराश, उज्वल तिचीं स्वप्नें लया पावतीं
रक्षी एक तदा दया भगवती अम्हां प्रभूचीच ती!

—Bee

प्रश्नः—भारतभूला कवीनें कोणाची उपमा दिली आहे? आशादेवीचें मुख कां उतरलें होतें? ती कोणत्या कार्यांत मग्न होती? आशादेवीचें चित्र कवीच्या डोळ्यांपुढून केव्हां विरलें? कवीच्या मतें राष्ट्रात्मा केव्हां पंगु होतो? आशेला अद्‌भुत कां म्हटलें आहे?

अभ्यासः—खालील काव्यचरणांचा अर्थ स्पष्ट करा:—

(१) रक्तें रंजित भोग काय करणें प्रीत्यर्थ त्याच्या रणें?

(२) हें चेतोहर चारुचित्र विरलें त्या चारुगात्रीसह.

(३) विज्ञानें निगमागमांत असती किंवा पुराणांतलीं
तीं तेथेंचि असोनि द्या..................

(४) या कवितेंत कोणावर रूपकें बसविलीं आहेत, तें स्पष्ट करा.

"युद्धें टाळतां येणें शक्य आहे कीं नाहीं?" यावर एक निबंध लिहा.

पुरवणी वाचनः—याच कवींची 'तीव्र जाणीव' आणि 'माधव-ज्यूलियन यांची 'पश्चिमेकडील मारुताचे उच्छ्वास' या कविता वाचा; आणि त्यांवरून 'राष्ट्रीय कविता' या विषयावर एक टिपण तयार करा.

# १२. पारिजातकाचीं फुलें.

ओळखः—श्री. यशवंत गोपाळ जोशी यांची आजच्या प्रसिद्ध लघुकथालेखकांत गणना होते. त्यांनीं आतापर्यंत आपल्या गोष्टींचीं, 'पुनर्भेट' या नांवाखालीं चार पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत. त्यांच्या गोष्टींचे विषय दररोजच्या आयुष्यांत दिसून येणाऱ्या प्रसंगांवर उभारलेले असतात. त्या प्रसंगांचें चित्रीकरण ते आत्मीयतेनें करितात. त्यांचें बहुतेक लिखाण वास्तविक स्वरूपाचें असतें. आपल्या सूक्ष्म निरीक्षणाच्या साहाय्यानें मानवी स्वभावांतील वैचित्र्याचें आविष्करण करण्याची त्यांची रीत त्यांच्या अनेक गोष्टींतून आढळते. हृदयाचा हलुवारपणा व जिव्हाळा, यांच्या जोडीला भाषेचा साधेपणा मिळाल्यानें त्यांच्या गोष्टी चटकदार झाल्या आहेत.



विषयः— वयाचीं चाळीस वर्षें लोटलीं तरीसुद्धा जीवनांतील खरा आनंद ज्याला उपभोगितां आला नाहीं, अशा व्यक्तीच्या आयुष्यक्रमांत पारिजातकाच्या फुलांसारख्या एका कुटुंबांतील व्यक्तींच्या संसर्गानें कसा फरक पडत जातो, याचा उलगडा या गोष्टींत होतो. एकाच

मध्यवर्ती कल्पनेचा विकास लेखकानें निरनिराळ्या प्रसंगांच्या वर्णनानें कसा केला आहे तो पाहा; आणि गोष्टीचा शेवट वाचल्यावर गोष्टीच्या आरंभीं लेखकानें म्हटल्याप्रमाणें तुम्हांला एकप्रकारची गोड हुरहूर लागते कीं काय तिचा अनुभव घ्या.

प्रत्येकालाच अनुभव असेल असें जरी म्हणतां येत नाहीं तरी माझा मात्र अनुभव असा आहे कीं, मनाला एखाद्या वेळीं कमालीचा आनंद झाला कीं, त्याच वेळेस माझ्या मनाला कसली तरी हुरहूर लागते ! आणि अशी हुरहूर लागली म्हणजेच माझ्या मानसिक आनंदाचा जास्त विकास होतो !

कितीहि सुंदर घर बांधलें तरी त्याला जशी बाहेरची हवा आंत येण्याकरितां खिडक्या या हव्यातच, त्याप्रमाणें आनंदाच्या हवेल्यांना हुरहूर वाटायला लावणाऱ्या खिडक्या असल्या तरच त्या आनंदाला गंमत येते !

भुकेच्या पहिल्या तोंडीं जी अन्नाला गोडी असते, ती अर्धे जेवण झाल्यावर राहात नाहीं; त्याप्रमाणेंच माझें झालें होतें. माझें वय आज सुमारें चाळीस वर्षांचें होतें. सर्व तऱ्हेच्या सांसारिक सुखाशीं माझा परिचय झाला होता. जरी त्या सर्व सुखांचा सहवास मला अद्याप हवासा वाटत होता, तरी त्यांतील नावीन्य नाहींसे झालेलें होतें ! क्वचित् एखाद्या वेळीं आपलें आयुष्य आतां उतरणीला लागलें आहे, अशीहि मनांत कल्पना येऊन जाई आणि मनाला हुरहूर लागे !

नुकतेंच मीं आपल्या थोरल्या मुलीचें लग्न केलें होतें. त्यावेळेलाहि मनाला आनंद वाटला; पण सहज मनांत अशी कल्पना आली—

एखादा दोरा रिळाला गुंडाळावा आणि दोरा पूर्ण गुंडाळल्यानंतर तो पुन्हा उलगडीत बसावें त्याप्रमाणें जीं जीं सुखदुःखें मीं भोगिलीं त्यांचें आतां परावर्तन होत आहे !

माझ्या घरांतील लग्नसमारंभ पार पडला होता, पाहुणे मंडळी निघून गेली होती. पुन्हा सर्व स्थिरस्थावर झालें होतें.

वेळ संध्याकाळची होती.

नेहमींच्या सरावाप्रमाणें मला एक कसलीशी जिन्नस पाहिजे होती. ती माझ्या मुलीला हांक मारून मागितली. पण लगेच लक्षांत आलें कीं, ती आतां घरीं नाहीं. आजपर्यंत माझ्या घरांत वाहाणारा तो जीवनौघ दुसऱ्या वाटेला लागला आहे !

माझ्या बायकोनें विचारलें, " काय पाहिजे ? "

आतां मला कांहींच नको होतें. आम्ही एकमेकांकडे पाहून विरागीपणानें हसलों. कांहीं वेळानें निःशब्दपणानें वावरत आम्हीं आपलें जेवण उरकलें. मनाच्या त्या गोड उदासीनतेंतच मीं अंगांत कपडे चढविले, हातांत काठी घेतली आणि बाहेर पडलों.

रात्रीचा नवाचा सुमार होता. तेव्हांपासून रात्रीं दोन अडीच वाजेपर्यंत मी भटकत होतों. तीनचे सुमारास मी परत घराकडे वळलों. घराजवळ आलों तेव्हां हातांतील काठीनें सडकेशीं खेळत, कधीं काठी फिरवीत असा मी चालायला लागलों. चांदण्याच्या जोडीला थोडी थंडीहि पडली होतीच.

माझें घर थोडेसें आडबाजूला पण बोळांतच होतें. मी बोळाच्या कोपऱ्याशीं आलों.

मधुर सुवासानें आजूबाजू दरवळून गेलेली मला आढळली ! जमिनीवर पडलेला सूर्यप्रकाश अगर चंद्रप्रकाश पाहून जसें आपण सहज त्याचें उगमस्थान म्हणून सूर्याकडे अगर चंद्राकडे पाहातों,

त्याप्रमाणें त्या अदृश्य, मधुर सुवासाचा जनक चंद्र-सूर्य कोठें आहे तें मी पाहूं लागलों. शेजारींच कोपऱ्यावर केराची पेटी होती आणि त्या पेटींत व तिच्या सभोंवतालीं पारिजातकांच्या फुलांचा तुरळक सडा पडला होता. सहज वर नजर गेली. फुलांचा शेला पांघरून पारिजातकाचें झाड डौलानें उभें होतें! आणि जेव्हां डौलानें तें पारिजातकाचें झाड डुले, त्यावेळीं त्याच्या त्या शेल्यांतील कित्येक फुलें खालीं पडत. पुन्हा तो त्वेषानेंच एकदां फांदी हलवी! तरीहि तोच प्रकार!

मला त्या विरोधी दृश्याची गोड गंमत वाटली. खालीं कचऱ्याची पेटी, वर पारिजातकाचें झाड! मी त्या दृश्यानें भारून गेलों होतों! त्यावेळीं माझ्या डोक्यांत कसलीच कल्पना येऊं शकत नव्हती! उडणारी कापसाची म्हातारी धरण्याचा हव्यास धरला तर लहान मुलांना जशी फक्त मेहनत होते, पण ती म्हातारी कांहीं त्यांच्या हातीं लागत नाहीं! म्हणून मी मनांत विचार केला कीं, नुसती ही आनंदाची झुळुक अनुभवायची! त्याबद्दलची मला कांहींहि कल्पना आली नाहीं तरी चालेल.

पण रस्त्यांतच मला असें किती वेळ उभें राहातां येणार? हातांतली काठी खांद्याच्या खुंटीवर अडकवून व खालीं वांकत कविवर्य तांब्यांचें—

कुस्करूं नका हीं सुमनें!
अंजुली भरुनि अर्पिलीं। भक्तिनें दिलीं म्हणुनि तरि घेणें—
मालती बकुल जुइ जाति। हीं जरी हातीं। हींहि असुं देणें—
कुस्करूं नका हीं सुमनें!

हे काव्यचरण मी गुणगुणत तीं कचऱ्याच्या पेटीजवळचीं पारिजातकाचीं फुलें गोळा करूं लागलों!

अशीं जवळजवळ ओंजळभर फुलें मीं गोळा केलीं आणि पुढें बाहेर कुठेंच न जातां घरीं परतलों. तीं फुलें टेबलावर ठेविलीं आणि त्यांकडे पाहून खुर्चीवर बसलों आणि तसाच गुंगलों !

दुसऱ्या दिवशीं मी सकाळीं जागा झालों तों वाड्यांत दोन बिऱ्हाडकरूंमध्यें चाललेल्या भांडाभांडीमुळें ! माझ्या वाड्यांत असलेलीं बिऱ्हाडें जरा तऱ्हेवाईकच होतीं. कोणाच्या कशाबद्दल तरी, कांहीं कारणांमुळें नेहमीं तक्रारी चाललेल्या असायच्याच !

आणि तसें पाहिलें तर माझी पैशाच्या दृष्टीनें स्थिति जरी चांगलीच समाधानकारक होती, तरी माझ्या घरांत शांतता यथातथाच असे ! कांहीं तरी कुरकूर, धुसफूस ही असायचीच !

तेंच शेजारीं–पाजारीं; म्हणून मीहि आहे त्या स्थितींत आनंद मानून होतों.

माझा स्वभाव अत्यंत शांत होता ! चूक कोणाचीहि असो, माझी आपली पडतें घ्यायची तयारी असायची ! पण या माझ्या वागणुकीचा अर्थ भलताच होई ! कुणी मला अजागळ समजे ! कुणी भेकड समजे ! माझ्या हृदयांत जळजळीतपणा प्रत्यक्ष माझ्या बायकोलासुद्धां फारसा समजलेला नव्हता; मग इतरांची कथा काय ?

मी मात्र माझ्याभोंवतीं असलेल्या प्रत्येक व्यक्तीला पूर्णपणें ओळखून होतों आणि होई काय–मी त्या व्यक्तीला त्याच्या खऱ्या स्वरूपांत ओळखतों आहें हें प्रसंगविशेषीं जर त्याला कळलें तर त्याची त्रेधा उडे, त्याला संताप येई आणि मी जरी तो प्रसंग विसरून गेलों तरी तो मात्र त्या प्रसंगाची तेढ मनांत ठेवी–आणि बहुतेक त्याचें माझें नंतर वितुष्ट येई ! जे फाजील संभावित असत ते जर त्यांचें माझ्याकडे काम असलें तर पुन्हा हस्तिदंती नमस्कार करायला लागत ! माझी अशा प्रसंगाला सदाच तयारी !

मनुष्यस्वभावाच्या असंख्य तऱ्हा असणार, तिथें सांगून, वर्णन करून किती दाखवितां येणार ?

माझ्या वाड्यांतील एक बिऱ्हाडकरू नुकतेंच बिऱ्हाड मोडून गेले होते. ती जागा अद्याप रिकामीच होती. मुलीच्या लग्नामुळें माझ्या मनाला–घराला–पत्नीला व इतर चिल्यापिल्यांना लागलेली गोड हुरहूर अद्याप कमी झालेली नव्हती ! त्यांतच त्या पारिजातकाच्या झाडानें मला वेड लावलें होतें. मी रात्रीं–बेरात्रींच उठून कोपऱ्यापर्यंत जाई आणि त्या पारिजातकाकडे पाहात उभा राही. त्याच्या सुगंधानें मला वेड लावलें होतें; पण हळूहळू पारिजातकाचा ' बहर ' संपत आला. झाडावर फुलें कमी येऊं लागलीं. बिचारा पारिजातकहि मला उदासीन भासूं लागला !

एक दिवस सुमारें तीस वर्षांचा इसम जागा पाहाण्याकरितां आला. त्याला जागा पसंत पडली. 'घरीं दाखवितों आणि मग सांगतों आपल्याला काय तें ' असें सांगून तो घराबाहेर पडला. दुपारीं बायकोला आणून त्यानें जागा दाखविली. जागा दोघांनाहि पसंत पडली !

त्या दांपत्यानें माझ्या मनावर पहिल्या भेटींतच विलक्षण मोहिनी घातली.

" काय भाडं आहे या जागेचं ? " त्यानें प्रश्न केला. माझ्यामनांत त्या दांपत्याविषयीं लोभ उत्पन्न झाला होता. मला वाटलें, मीं सांगितलेलें भाडें यांना पटलें नाहीं तर तें बिऱ्हाड कांहीं आपल्या घरीं येणार नाहीं आणि मला तर तें बिऱ्हाड माझ्या वाड्यांत यायलाच पाहिजे होतें. मी भाड्याची एवढी फिकीर कधींच करीत नव्हतों.

बिऱ्हाड हातचें जाऊं नये म्हणून मींच त्यांना विचारिलें, " हल्लीं राहातां तिथें आपल्याला काय भाडें आहे ? "

" सहा रुपये ! " त्यानें उत्तर दिलें.

" जागा पसंत आहे ना तुम्हांला ? या जागेचेंहि भाडें सहा रुपयेच आहे. " मीं म्हटलें.

त्या गृहस्थानें ताबडतोब सहा रुपये माझ्या हातावर ठेवीत म्हटलें, " पहिला महिना आहे म्हणून आगाऊ भाडें देत आहे. दर महिन्याला आगाऊ भाडें देतां येणार नाहीं. महिना भरतांच दहा तारखेच्या आंत आपलें भाडें आपल्याकडे पोहोंचतें होईल, मागण्याची जरूर कधींच पडणार नाहीं." मीं तें कबूल केलें, भाडें घेतलें; त्या गृहस्थाला पावती दिली.

ती तारीख अठ्ठावीस होती.

आणि ते पहिल्या तारखेपासून आमच्या वाड्यांत राहावयाला येणार होते.

पहिल्या तारखेस ती मंडळी वाड्यांत राहाण्याकरितां आली. त्या कुटुंबांत एकंदर माणसें पांच. नवरा-बायको, एक मुलगी आणि दोन मुलगे. थोरली मुलगी तिचें वय अकरा वर्षांचें होतें आणि अगदीं लहान मुलगा होता त्याचें फक्त सहा महिन्यांचें होतें. त्यांचें सामानसुमान बेताबाताचेंच पण आटोपशीर व व्यवस्थित होतें. सकाळपासून त्यांचें सामानसुमान पहिल्या बिऱ्हाडाहून आमच्या वाड्यांत येत होतें. तेवढीच काय ती ये-जा. सर्व सामान आल्यानंतर त्यांच्या बिऱ्हाडाचें दार लागलें गेलें. आंत माणसें आहेत ही चाहूल-सुद्धां बाहेर लागेना ! मला नवलच वाटलें. अहो, तीन मुलें म्हणजे माझ्या मुलांवरून पाहतां तीन गजराचीं घड्याळेंच ! गप्प कशीं बसलीं ! वाटलें, नव्या बिऱ्हाडामुळें असेल ही फसवी शांतता !

असे चार सहा दिवस गेले; पण या चार-सहा दिवसांतहि

नव्या बिऱ्हाडांतील माणसें पाहाण्याकरितां इतर बिऱ्हाडकरूंना व माझ्या घरच्याहि माणसांना टपून बसावें लागे !

बायकाबायकांत पहिली ओळख व्हायची म्हणजे नळावर अगर पाणी भरण्याच्या ठिकाणीं; पण या नव्या बिऱ्हाडांतील माणसांच्या आंघोळी व पाणी भरणें सकाळीं सहा-साडेसहाच्या आंतच व्हायचें, कीं ज्या वेळेला इतर बिऱ्हाडांतील बायकामाणसें जांभया देत उठून बाहेर यायचीं !

" माणसें मोठीं कुऱ्याचीं आहेत हो ! " असें नवीन बिऱ्हाड-करूविषयीं सर्वत्रांचें मत झालें !

पुढें आठदहा दिवसांनीं कुणालासा अलौकिक शोध लागला, " अहो, फुकटचाच कुरा आहे हो ! हाताला पाटलीसुद्धां नाहीं आहे त्या बाईच्या ! "

पुरुषापुरुषांमध्यें असें ठरलें कीं, त्या नवीन बिऱ्हाडांतला पुरुष ' माणूसघाणा ' आहे ! माणसांत मिसळायला नको. मग अशी भरलेल्या वाड्यांत कशाला जागा घेतली ? गांवाबाहेर एखादा स्वतंत्र बंगला तरी घ्यायचा होता किंवा स्मशानाच्या बाजूला राहायला जायला पाहिजे होतें. अशा तऱ्हेनें जो तो नवीन बिऱ्हाड-करूबद्दल आपापलें मत बनवीत होता.

पण माझ्या मनांत मात्र त्या माणसांविषयीं एक अभिनव कुतूहल निर्माण झालें होतें ! हीं माणसें आहेत तरी काय जातीचीं ?

हीं माणसें इतकीं बिनबोलकीं कशीं ?

बरं, मोठ्या माणसांचें राहो, लहान मुलें सुद्धां !

मोठ्या माणसांचाच संसार असला तर अभिमान चालवतां येतो; पण संसारांत लहान मुलें आलीं कीं, केव्हां तरी अभिमान सोडायची वेळ येते ! अहो, बोलूनचालून बालसृष्टि ! आप-

परभाव अजिबात नाहीं आणि बालहट्टापुढें कुणालाहि नमावेंच लागतें, आणि त्यामुळें एखादे वेळीं अभिमानहि सोडावा लागतो!

पण त्या बिऱ्हाडांतल्या मुलांची स्थिति तशी नव्हती. तीं लहान मुलेंहि आईबापांच्या नजरेच्या धाकांत होतीं! नाहींतर पुष्कळ ठिकाणीं आपण पाहातोंच! आपलें लहान मूल अगोदर दुसऱ्याच्या घरीं जाऊं द्यायचें. तिथें कोणी खात असेल तर सहजच मुलाच्याहि हातांत खाऊ ठेवतातच. एवढें झाल्यानंतर मग त्या मुलाच्या आईनें अगर मोठ्या बहिणीनें धांवत धांवत यायचें व मुलाला रागवायचें. त्याला मारीत घरीं न्यायचें किंवा " हं, त्याच्या हातावर कांही खायला देऊं नका हं " म्हणून गस्त घालीत सुटायचें, अशी रीत असते! पण त्या बिऱ्हाडांतील मुलें अगोदर कुणाच्या घरीं जायचींच नाहींत. मुद्दाम बोलावून नेलीं तर खाण्याचे पदार्थ घ्यायचीं नाहींत! अशीं मुलें लाभणें हें एक मोठें नशीबच आहे!

त्या बिऱ्हाडांतल्या माणसांच्या चेहऱ्यावरहि एक आश्चर्यकारक गंमत होती. सर्वांच्या तोंडांवर कायम छापाचें 'स्मितहास्य' नेहमींच असे!

कुठला आनंद पैदा केला त्यांनीं येवढा?
सदा हसण्याचें कुणीं शिकविलें त्यांना?

आणि त्या लहान सहा महिन्यांच्या मुलालासुद्धां! बेटा गुलाम रडतांना कधीं ऐकायलाच यायचा नाहीं!

त्यांच्याकडे फारसें कुणी येतजातहि नव्हतें. क्वचित् आठ पंधरा दिवसांनीं कुणीं तरी यायचें!

त्या बिऱ्हाडांतल्या माउलीचें नांव होतें यशोदाबाई!

आपली घरांतल्या घरांत सदा असायची! कथाकीर्तन नाहीं; पुराण नाहीं, कधीं नाटक–सिनेमा नाहीं!

आणि तिचीं मुलें ! अहाहा ! जशीं टवटवीत फुलें ! नाजुकपणाच्या अर्थानें नव्हे बरें का ? सतेजपणाच्या दृष्टीनें, आणखी तब्बेतीनें टणटणीत ! एरवीं असा हसरा चेहरा आणतात कुठून ? असा सर्वत्र आनंदीआनंदी होता !

त्या बिऱ्हाडांतल्या पुरुषाचें नांव कृष्णराव ! आनंदाची प्रतिमा, समाधानाची मूस ! आरोग्याचें व नियमितपणाचें मूर्तिमंत दर्शन ! तो कधीं वादविवाद करीत नसे ! तो चळवळींत कोणत्याच नव्हता ! पण कपडे खादीचेच होते, घरांतील सर्व सामान देशीच निवडलें जाई ! पण एक दिवस मीं त्यांना विचारिलें, "काहो कृष्णराव, तुम्ही स्वदेशीचे अगदीं कट्टे पुरस्कर्ते दिसतां !"

उत्तर देण्याच्या ऐवजीं तो फक्त हसलाच ! आणि फक्त एकच बोलला, "हातानें होईल तेवढें करावें !" नंतर मीं त्यांची चौकशी केली. मला वाटत होतें हा कुठें तरी शाळामास्तर असेल म्हणून; पण चौकशीअंती कळलें कीं, तो म्युनिसिपालिटीचा वसुलीकारकून होता ! त्याला पगार फक्त तीस रुपये होता.

देशांत केवढ्या घडामोडी चालल्या होत्या, पण त्या त्याच्या तोंडून कधींच ऐकायला मिळाल्या नाहींत ! मला वाटलें, काय विचित्र माणसें ! सुखदुःखाच्या सीमेवरचे रखवालदार का आहेत हे ! कसें यांना जमतें हे सगळें ! किती जन्मांची तपश्चर्या ही ! इतका सात्त्विक आनंद, इतकी समाधान-वृत्ति कुठून मिळविली त्यांनीं आणि एवढ्या गरिबीच्या आयुष्यक्रमांत त्यांना ती टिकवितां तरी कशी आली ?

अशांत सुमारें आठ–दहा महिने गेले. सृष्टीमध्येंहि हवामानाचा बदल होऊन पावसाळा, हिवाळा येऊन गेला; पण त्या घरांत

एकसारखा वसंतकालच दिसत होता. मीं म्हटलें, " किती आदर्श जीवन आहे हें ! " पण मला तें कसें मिळवितां येणार ?

त्यांच्याशीं कधींहि बोलण्याचा प्रयत्न करा. " हं ! ", " बरं, " " तसंच " वगैरे शब्दच बाहेर पडत. कधीं गृहस्थ अघळपघळ बोलला आहे, शक्य नाहीं ! मोजक्या प्रश्नांवर मोजकीं उत्तरें ! मी आश्चर्यानें थक्कच होई !

काय अलौकिक आत्मसंयमन हें !

पैशाच्या बाबतींत माझें जीवन सुखी होतें. पण खरें सुख मला त्यांत कधींच लाभलें नाहीं ! अगोदर कोणत्याहि गोष्टींत माझ्या घरांत एकमत व्हायलाच कठीण पडे—कधीं त्याच्यांतच व्यक्ति-स्वातंत्र्याचा प्रश्न उद्भवे. नाना तऱ्हा ! आमचें जीवन बौद्धिक, वादविवादात्मक होतें; त्यामुळें आमच्या सुखाची गाय आमच्या अंतःकरणाच्या गोठ्यांत सुखानें सावलीला बसलेली क्वचितच आढळे ! नेहमीं हिसकाफिसक चाललेली आणि दावें तोडण्याच्या तयारींत असलेली ! नेहमींच धांवपळ व उसासे ! या माझ्या जीवनांत वैचित्र्य आहे, सुखाभास आहे, पण खरें सुख नाहीं ! नैसर्गिक पचन होणें निराळें आणि सोडावॉटरचें पाणी पिऊन होणें निराळें ! त्याप्रमाणें आमचें सुख परावलंबी होतें ! आम्ही सुखी आहोंत म्हणून आम्हांला ओरडून सांगावें लागत होतें !

माझ्या घरांत सुखाचे विलासाचे देखावे होते, 'वेल्कम्—सुस्वागतमूच्या' पाट्या होत्या ! " शांतता असे ज्या घरीं, तेथें लक्ष्मी वास करी ! " ही पाटी तर आमच्या वादविवादाच्या खोलींतच लावलेली होती; पण—पण तो सर्व देखावा. कागदाचीं फुलें !

त्यामुळें मला त्या बिऱ्हाडकरूचा सात्त्विक हेवा वाटूं लागला !

अशांत दोन—तीन महिने गेले. एक दिवस कृष्णराव—तो सुखी

माणूस–दुपारीं घरींच दिसला म्हणून मीं सहजच विचारलें, " कायहो, कृष्णराव आज घरींचसे ? " त्यांनीं हमत हसत उत्तर दिलें, " नोकरी सुटली आजपासून ! "

तें एकून मला खरें वाईट वाटलें ! पण किंचितसा आनंदहि झाला ! आतां त्याच्या जीवनांत मला कांहीं तरी चलबिचल पाहायला मांपडेल !

मी त्या पारिजातकाच्या झाडाला अलीकडे विसरलोच होतों !

पण त्याच्या आयुष्यांत चलबिचल पाहाण्याचा योग मला आला नाहीं ! सहा महिने गेले असेच ! पण त्याचें जीवन पूर्वींसारखेंच चाललें होतें ! फरक एवढाच पडला होता कीं, ऑफिसच्या वेळेला कृष्णराव जे घरीं नसावयाचे ते आतां घरींच सांपडत होते !

सहा महिने नोकरीशिवाय रिकामे गेले तरी घरांत कांहीं भांडणें, त्राग किंवा एखाद्या पदार्थाची वाण दिसली नाहीं ! यायचें तें सामान वेळेवर येत होतें !

सहा महिन्यांत एकहि गृहस्थ त्यांच्याकडे पैसे मागायला अगर उधारी वसुलीला आला नाहीं ! मी मनांत म्हणे. "काय अद्भुत जादू आहे या गृहस्थाजवळ ? कोणता कल्पवृक्ष सांपडला आहे यांना !"

त्यांना कोणता कल्पवृक्ष सांपडला आहे याचा शोध मला लागला नाहीं; पण माझ्या घरांतला कल्पवृक्ष लवकरच माझ्या हातून जाणार होता !

एक दिवस कृष्णराव माझ्याकडे आले. मला वाटलें या गृहस्थाला कांहीं कर्जाऊ रक्कम पाहिजे असेल ! कारण त्यांची नोकरी सुटल्यावर पैशाची मदत लागल्यास मी देईन, असें मीं त्यांना आपण होऊनच सांगितलें होतें ! म्हणून मला वाटलें ते पैसे माग-

ण्याकरितांच आले असतील; पण त्यांनीं माझ्याजवळ पैसे मागण्या-ऐवजीं मला देण्याकरितांच पैसे आणले होते ! एक महिन्याचें भाडें माझ्यापुढें ठेवीत कृष्णराव म्हणाले, "मला परगांवीं नोकरी लागली आहे. मी येत्या पहिल्या तारखेला जागा खालीं करणार आहें !"

मी आश्चर्यानें थक्क होऊन त्यांच्या चेहऱ्याकडे पाहात राहिलों ! पण त्या सद्गृहस्थाच्या चेहऱ्यावर कांहींच चलबिचल नव्हती !

ठरल्याप्रमाणें त्या महिन्याअखेर तो गृहस्थ जागा सोडून गेला ! जातांना कृष्णरावांची बायको-यशोदाबाई, माझ्या घरून हळदीकुंकू घेऊन बाहेर पडली ! मी तिच्याकडे, कृष्णरावाकडे व त्यांच्या मुलांकडे पाहातच राहिलों ! जें हसें तोंडावर घेऊन ती मंडळी आमच्या वाड्यांत राहायला आली होती तेंच हसें बरोबर घेऊन तीं सर्व माणसें निघून गेलीं !

मी मात्र त्यामुळें फार उदासीन झालों !

तीं माणसें गेल्यानंतर मी आपल्या दिवाणखान्यांत ईझीचेअरवर विचार करीत बसलों होतों ! काय जातीचीं माणसें आहेत हीं ! माणसें कसलीं हीं फुलें आहेत ! पारिजातकाचीं फुलें आहेत ! पारिजातकाच्या सुकुमार पण नाजूक फुलांप्रमाणें यांचें आयुष्य नाजूक आहे ! त्यांचें सौंदर्य सात्त्विक आहे ! या जगाच्या अवाढव्य घडामोडींत यांचें कार्य काय ? आजूबाजूला समाधानाची फुंकर मारायची ! किती साधें पण किती निष्पाप जीवन हें ! असें जीवन मला कधीं मिळेल का ? त्यांच्यासारखें मला कधीं हसतां येईल का ? मीं मनांत म्हटलें, "देवा ! असें कोणत्याहि परिस्थितींत कायमचें हसायला तूं जर मला शिकवशील तर—तर त्याचा मोबदला माझें घर, संपत्ति, बायकापोरें सर्व घेऊन जा, पण मला असें हसायला शिकीव ! त्या हसण्यांत श्रीमंती आहे, सुधारणा

आहे, सर्व कांहीं आहे ! देवा, या पारिजातकाच्या फुलांचा सहवास तूं मला आणखी कां घडूं दिला नाहींस ?" मी उदासीनतेंतच बाहेर पडलों. पूर्वीचें पारिजातकाचें झाड माझ्या दृष्टीस पडलें.

त्या पारिजातकाच्या झाडाला आतां बहर आलेला होता ! मीं म्हटलें, "माझ्या घरांतला पारिजातक गेला आणि आतां हा फुलला."

अजूनहि वेड्यासारखा त्या पारिजातकाचीं रस्त्यांत पडणारीं फुलें मी रोज नेमानें वेंचून आणीत असतों !

—य. गो. जोशी.

प्रश्नः—पारिजातकाचीं फुलें हें गोष्टीला दिलेलें नांव कसें समर्पक आहे ? नव्या बिऱ्हाडांतील माणसांनीं कसला आनंद पैदा केला होता ? गोष्टींतील मालकाला कोणत्या विरोधी दृश्यामुळें मोठी गंमत वाटली ? त्या दृश्याचा त्याच्या मनावर काय परिणाम झाला ? या गोष्टींतील मुख्य नायक कोण ?

अभ्यासः—खालील वाक्यांतील विरोध स्पष्ट कराः—

(१) माझी मुलगी सासरीं गेली होती ! पारिजातकाचीं फुलें नाहींशीं झालीं होतीं !

(२) माझ्या घरांतला पारिजातक गेला आणि आतां हा फुलला !

गोष्टींतील घरमालक आणि नव्या बिऱ्हाडांतील गृहस्थ याच्या स्वभावांची तुलना करा.

पुरवणीवाचनः—(१) धनुर्धारी यांची 'वाईकर भटजी' ही कादंबरी वाचा आणि तींतील संसाराच्या चित्राशीं वरील गोष्टींत आलेलें संसार-चित्र तोलून पाहा. (२) य. गो. जोशी, वि. स. खांडेकर, ना. सि. फडके यांच्या गोष्टींचीं पुस्तकें वाचा.

# १३. 'तुकाराम—आत्मनिवेदन'

**ओळख:**—तुकाराम ( शके १५३०–१५७२ ). भावपूर्ण प्रासादिक अभंगरचना करणारे प्राचीन संतकवि, म्हणून तुकारामाचें नांव मराठी वाङ्मयांत अमर झालें आहे.



त्यांचा जन्म देहूस झाला आणि भगवद्भक्तीचें बाळकडू त्यांना लहानपणींच मिळालें. त्यांनीं सुमारें साडेचार हजार अभंग रचले. त्या सर्व अभंगांतून तुकारामांच्या मानसिक अवस्थेचीं आंदोलनें दिसून येतात. आपल्या अभंगांच्या द्वारें समाजशिक्षणाचेंही कार्य त्यांनी घडवून आणिलें. संसारांतील अनेक अडचणी त्यांनीं आपल्या अंगांतील साधुत्वाच्या गुणांमुळें निभावून नेल्या. चित्तांतील अखंड शांति आणि आनंद यांचा लाभ त्यांना शेवटीं मिळाला. तुकारामांचे अभंगच नव्हेत, तर मराठी वाङ्मयहि त्यामुळें चिरस्थायी झाल्यासारखें वाटतें.

**विषय:**—खरें सुख आणि आनंद निव्वळ बाह्य परिस्थितींत नसतो. त्यांचा उगम शुद्ध अंतःकरणांतून होतो. जसें ज्याचें ध्येय तशीच त्याची आवड दिसून येते. एखाद्यास बळेंच भक्त बनवूं म्हटलें तर साधत नाहीं. विश्वावर प्रेम केल्यास विश्वहि आपणावर प्रेम करतें; आणि असें प्रेम दिल्यानें किंवा घेतल्यानें वाढतच जातें. अशा प्रेमाच्या शीतल चांदण्यांत,

संसार हा अतिशय सुखावह होतो, इ. गोड विचार, बोलण्याप्रमाणेंच ज्याचें चालणें होतें, अशा कविवर्यांनीं येथें प्रकट केले आहेत.

१

विरोधाचें मज न साहे वचन । बहु होतें मन कासावीस ॥ १ ॥
म्हणऊनि जीवा न साहे संगति । बैसतां एकांतीं गोड वाटे ॥ २ ॥
देहाची भावना वासनेचा संग । नावडे उबग आला यांचा ॥ ३ ॥
तुका म्हणे देव अंतरे यामुळें । आशामोहजाळें दुःख वाढे ॥ ४ ॥

२

तांबियाचें नाणें न चले खऱ्या मोलें । जरी हिंडाविलें देशोदेशीं ॥ १ ॥
करणीचें कांहीं न मने सज्जना । यावें लागे मना वृद्धांचिया ॥ २ ॥
हिरियासारिखा दिसे शिरगोळा । पारखी ते डोळां न पाहाती ॥ ३ ॥
देऊनियां भिंग कमाविलें मोतीं । पारखिया हातीं घेतां नये ॥ ४ ॥
तुका म्हणे काय नटोनियां व्यर्थ । आपुलें हें चित्त आपणा ग्वाही ॥५॥

३

पर्जन्यें पडावें आपुल्या स्वभावें । आपुलाल्या दैवें पिके भूमि ॥१॥
बीज तेंचि फळ येईल शेवटीं । लाभहानि तुटी ज्याची तया ॥ २ ॥
दीपाचिये आंगीं नाहीं दुजा भाव । धनी चोर साव सारखेचि ॥३॥
काउळ डोंपरा कंकर तित्तिरा । राजहंसा चारा मुक्ताफळें ॥ ४ ॥
तुका म्हणे एथें आवडी कारण । पिकला नारायण जयां तैसा ॥५॥

४

पिंड पोसावें हें अधमाचें ज्ञान । विलास मिष्टान्न करूनिया ॥ १ ॥
शरीर रक्षावें हा धर्म बोलतां । काय असे हातीं तयांचिया ॥ २ ॥

क्षणभंगुर हें जाय न कळतां । ग्रास गिळी सत्ता नाहीं हातीं ॥ ३ ॥
कर्वतिला देह, कापियेलें मांसा । गेले वनवासा शुकादिक ॥ ४ ॥
तुका म्हणे राज्य करितां जनक । अग्नीमाजी एक पाय जळे ॥ ५ ॥

५

नका दंतकथा येथें सांगो कोणी । कोरडे ते मानी बोल कोण ? ॥ १ ॥
अनुभव येथें पाहिजे साचार । न चलती चार आम्हांपुढें ॥ २ ॥
वरी कोण मानी रसाळ बोलणें । नाहीं झाली मनें ओळखी तों ॥ ३ ॥
निवडी वेगळें क्षीर आणि पाणी । राजहंस दोन्ही वेगळालीं ॥ ४ ॥
तुका म्हणे येथें पाहिजे जातीचें । येर गबाळाचें काय काम ? ॥ ५ ॥

६

जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती । चालविसी हातीं धरूनिया ॥ १ ॥
चालों वाटे आम्ही तुझाचि आधार । चालविसी भार सवें माझा ॥ २ ॥
बोलों जातां बरळ करिसी ते नीट । नेली लाज धीट केलों देवा ॥ ३ ॥
अवघे जन मज झाले लोकपाळ । सोईरे सकळ प्राणसखे ॥ ४ ॥
तुका म्हणे आतां खेळतों कौतुकें । झालें तुझें सुख अंतर्बाह्यीं ॥ ५ ॥

७

आमुचें जीवन हें कथा-अमृत । आणिकही संतसमागम ॥ १ ॥
सारूं एके ठायीं भोजन परवडी । स्वादरसें गोडी पदोपदीं ॥ २ ॥
घालिया ढेंकर येति आनंदाचे । वोसंडलें वाचे प्रेमसुख ॥ ३ ॥
पिकलें स्वरूप आलिया घुमरी । राशी ते अंबरीं न समाये ॥ ४ ॥
मोजितां तयाचा अंत नाहीं पार । खुंटला व्यापार तुका म्हणे ॥ ५ ॥

८

मोक्षाचें आम्हांसी नाहीं अवघड । तो असे उघड गांठोळीस ॥ १ ॥
भक्तीचे सोहळे होतील जिवासी । नवल तेविशीं पुरवितां ॥ २ ॥

ज्याचे त्यासी देणें तें उचित । मानुनियां हित घेतां सुखें ॥ ३ ॥
तुका म्हणे सुखें देई संसार । आवडीसी थार करीं माझे ॥ ४ ॥

९

खरें नानवट निक्षेपींचें जुनें । काढिलें ठेवणें समर्थाचें ॥ १ ॥
मजुराच्या हातें मापाचा उकल । मी तों येथें फोल सत्ता त्याची ॥२॥
कुल्लाळाच्या हातें घटाच्या उत्पत्ति । पाठवी त्या जाती पाकस्थळा ॥३॥
तुका म्हणे जीवन त्या नारायणीं । प्रभा ते किरणीं प्रकाशाची ॥४॥

—तुकाराम

**टीपा** — उबग—त्रास. भीतरींचें—आंतलें. शिरगोळा—गारगोटी. ककर-लहानसा खडा. तित्तिर—कवडा नावाचा पक्षी. वरळ—मार्ग सोडून-वांकडें. परवडी—विपुल, पोटभर. न समाये—मावत नाहीं. घुमरी—विपुलता. पाकस्थळ—पदार्थ शिजविण्याचें ठिकाण. थार—आश्रय, जागा. निक्षेप—पुरून ठेवलेलें द्रव्य. नानवट—नाणें. उकल—मुटका.

**प्रश्नः** —जसा भक्त तसा देव याला कवींनीं कोणते दृष्टांत दिले आहेत? जनक राज्य करीत असतां त्याचा एक पाय नेहमीं अग्नींत जळत असे, असें म्हणण्यात काय अर्थ आहे? राजहंसाची उपमा कोणास दिली आहे? तुकाराम महाराज यांनीं 'संसार सुखानें दे' असें कां म्हटलें आहे. !

**अभ्यासः** —खालील काव्यचरणांचा अर्थ उघड करा.

( १ ) काउळें ढोंपरा ककर तित्तिरा । राजहंसा चारा मुक्ताफळें ॥

( २ ) मजुराच्या हातें मापाचा उकल । मी तों येथें फोल सत्ता त्याची ॥

( ३ ) तुका म्हणे जीवन त्या नारायणीं । प्रभा ते किरणीं प्रकाशाची ॥

**पुरवणीवाचन**—श्री. ल. रा. पांगारकर यांनीं लिहिलेले तुकारामाचें चरित्र वाचा.

---

# १४ डॉ. केतकर—व्यक्तिदर्शन आणि स्मृति

**ओळख:**—श्री. शीलवतीबाई केतकर ह्या डॉ. केतकर यांच्या पत्नी होत. डॉ. केतकर इ. स. १९३७ साली दिवंगत झाले. त्यांच्या गुणगौरवा-निमित्त निरनिराळ्या मासिकांनीं विशेष अंक प्रसिद्ध केले. पुण्यांतील 'लोकशिक्षण' मासिकानेंहि ही कामगिरी बजाविली. त्याच मासिकांत शीलवतीबाईंनीं आपल्या पतीसंबंधीच्या जिव्हाळ्याच्या आठवणी प्रसिद्ध केल्या.




पत्नीनें पतीच्या आठवणी लिहून त्या प्रसिद्ध करणें ही गोष्ट प्रथम कै. रमाबाई रानडे यांनीं 'आमच्या आयुष्यांतील आठवणी' या पुस्तकांत केली. त्यानंतरचीं महत्त्वाचीं पुस्तकें म्हणजे कै. लक्ष्मीबाई टिळक यांचीं 'स्मृतिचित्रें' हीं होत. शीलवतीबाई केतकर यांनीं आपल्या पतीसंबंधींच्या आठवणी वरील लेखांत उघड केल्या आहेत. ह्यात वरील पुस्तकाप्रमाणेंच एक वैशिष्ट्य आहे. केतकर हे बुद्धिमान्, नडाडीचे, उद्योगी व कर्तबगार असे मराठींतील लेखक म्हणून नावाजले गेले. रूढींची कदर न बाळगतां आपणाला प्रिय वाटेल अशा तत्त्वांचें आचरण करितांना, ते लोकांच्या स्तुतिनिंदेची फारशी पर्वा करीत नसत. अशा थोर व्यक्तींचें खाजगी आयुष्य कसें असेल, हें जाणण्याची उत्सुकता सर्वांनाच असते. तिचें निरसन अशा प्रकारच्या लेखामुळें होतें.

**विषय:**—कांहीं कांहीं व्यक्तींच्यासंबंधीं आपला मनाशीं कांहीं कल्पना ठरून राहिलेल्या असतात. डॉ. केतकर हे लहरी स्वभावाचे होते

अशी कित्येकांची समजूत. अर्थात् ज्याच्या त्याच्या दृष्टिकोनाप्रमाणें एखाद्या व्यक्तीचें स्वभावचित्र निरनिराळें होऊं शकतें. शीलवतीबाईंना डॉ. केतकरांचें निकट सान्निध्य लाभल्यामुळें, त्यांच्या दृष्टिकोनांतून डॉ. केतकरांचें स्वभाव-दर्शन न्याहाळणें यांत एकप्रकारचें वैशिष्ट्य आहे.

लोकांची अशी एक सर्वसामान्य समजूत असतें कीं, अलौकिक बुद्धिमत्तेचा मनुष्य म्हटला म्हणजे तो स्वभावानें मोठा लहरी असावयाचा. अमुक एक प्रकारें तो वर्तन करील असें कोणी निश्चित सांगूं शकत नाहीं. तसेंच त्याच्या आवडीनिवडीहि मोठ्या तीव्र असावयाच्या; आणि खरोखरच इतिहासांत याचीं इतकीं विपुल उदाहरणें सांपडतात कीं, ही जणुं काय एक म्हणच होऊन गेली आहे. परंतु या नियमास डॉ० केतकर हे एक अपवाद होत. त्यांची वृत्ति अत्यंत समतोल असे व जगाच्या आपल्या अनुभवामुळें ती तशी झाल्याचें ते सांगत. जसा प्रसंग तसें वागावें, केव्हांहि अवास्तव फुशारून जाऊं नये किंवा अवास्तव कष्टीहि होऊं नये, उगीच रुष्ट होऊं नये किंवा क्षुल्लक गोष्टींनीं चिडून जाऊं नये, दुसऱ्याच्या दर्शनी मोठेपणाचा हेवा करूं नये किंवा मनांत देखील आपल्या प्रशंसेची शेखी मिरवूं नये, असें तें इतरांस सांगत आणि स्वतः त्याप्रमाणें वागत. दुसऱ्यांच्या कृत्यांकडे अत्यंत उदार दृष्टीनें पाहणें त्यांस पसंत असून, त्यांची ते नेहमीं भली बाजू लक्षांत घेत आणि त्यांतून सर्वथा इष्ट तेंच घडून येईल, अशी आशा बाळगीत महाराष्ट्रीयांस तर ‘ आशावादी ’ आणि ‘ डॉ. केतकर ’ हे शब्द कदाचित् समानार्थक झाले आहेत.

खरोखरच डॉ. केतकर दुर्दम आशावादी होते व ही शिकवणहि आपल्याला जगानेंच दिली, असें ते सांगत. मोठमोठे निराशेचे

प्रसंगहि जे उद्भवतात ते आपल्याला अमुक एका मार्गानें कार्यसिद्धि होईल अशी व्यर्थ आशा वाटत असते त्यापेक्षां श्रेष्ठ मार्गाचा शोध लागावा म्हणूनच उद्भवतात अशी त्यांची श्रद्धा होती; आणि त्यामुळेंच त्यांच्या वांट्यास आलेल्या दैवाच्या अत्यंत कठोर आघातांनींहि ते कधीं हताश झाले नाहींत. निराशेचे आणि 'डोळे उघडण्याचे' प्रसंग दुर्दैवानें त्यांच्यावर पुष्कळच ओढवले; परंतु ते सर्व त्यांनीं आदर्शभूत अशा धैर्यानें व आनंदानें सोसले. किंबहुना आपल्या कांहीं महत्त्वाकांक्षा व संकल्पित योजना उध्वस्त झाल्यावेळीं देखील ते कधींहि डगमगत नसत; किंबहुना त्यांच्या अंतःकरणांत नवें धैर्य, नवी आशा, नवी दृष्टि स्फुरण पावून, अदम्य उत्साहानें आपल्या भवितव्यतेचा मार्ग आक्रमण्यास ते पुन्हां सिद्ध होत. इतकेंच नव्हे, तर त्यांचा हा आनंदोत्साह सांसर्गिक असे. त्यांच्या संगतींत असतां आपण विषण्ण अथवा दुर्मुखलेले राहाणेंच शक्य नव्हतें. जेव्हां आपल्या सभोंवतीं संकटांचे ढग गोळा होत आहेत असें दिसे, पदोपदीं विघ्नेंच विघ्नें उद्भवत, व इकडे वळावें कीं तिकडे वळावें हें समजेनासें होई, अशा मनःस्थितींत डॉ. केतकर घरींच आहेत किंवा लवकरच घरीं येतील या प्रत्यक्ष जाणिवेमुळें तीं अभ्रें वितळूं लागत, आणि त्याच्यामागून आडून आडून डोकावणाऱ्या प्रकाशकिरणांमधून मध्यान्हींचा सूर्यनारायण आपल्या प्रतापी तेजानें तळपूं लागे ! लागलीच पुढें होऊन ती परिस्थिति ते समजून घेत; आणि एक एक गोष्ट ते स्वतः स्पष्ट करूं लागतांच त्या प्रसंगाचा बराच भाग काल्पनिक होता, स्वतःची भीति व संशयपिशाच्च त्याला कारणीभूत असून, त्या प्रसंगाचें सार-सर्वस्व पाहूं जातां त्यांत खरोखरच विशेष असें कांहीं नव्हतेंच,

किंबहुना घडणाऱ्या गोष्टी आपल्या मुळींच स्वाधीनच्या नसल्यामुळें त्या जशा घडतील तसें त्यांस तोंड देणेंच प्राप्त असून, त्या सर्वांतून आपला मार्ग निःसंशय निघेलच निघेल, असें आपल्या प्रत्ययास येई. "प्रत्येक गोष्ट आपल्या स्वाभाविक क्रमानुसार चालूं द्या." असें ते म्हणत; आणि थोड्याच वेळेपूर्वी जी गोष्ट केवळ अशक्य दिसे, तीच मग प्रायः साध्यी, नित्याची दिसूं लागे. अशा प्रकारें त्यांच्या केवळ व्यक्तिमत्त्वामुळें आपल्या स्वतःच्या अंतःकरणांत व सर्वत्र सभोंवतालीं किती विलक्षण आशा, धैर्य, व सुखसमाधान उत्पन्न होई, हें सुदैवानें त्यांच्याशीं ज्यांचा निकट संबंध आला होता व ज्यांनीं त्यांचा यत्किंचित् अनुभव घेतला होता, त्यांसच समजणें शक्य आहे.

"सर्व कांहीं ठीक होईल," असें ते सदा म्हणत: आणि "एखाद्या गोष्टीचा विचार अवश्य करा, पण मनस्ताप मात्र करून घेऊं नका," अशी त्यांची शिकवण असे. आपल्यांपैकीं पुष्कळांना मनस्ताप करून घेण्याची संवय असते; पण त्यांचें वैयर्थ्य ते नेहमीं नजरेस आणीत. मनस्तापानें कार्य साधत नाहीं, तें नासतें. जी गोष्ट आपल्या हातीं नाहीं किंवा जी खरोखर आपल्या काल्पनिक भीतीमुळें उत्पन्न झाली आहे, तिजबद्दल धुसफुस करण्यापासून ती सरळ तर होत नाहींच, उलट त्यामुळें प्रकृति मात्र बिघडते व आपली कर्तृत्वशक्ति लयास जाते. तसेंच, एकहि वास्तविक वा काल्पनिक गोष्ट अशी नाहीं कीं, जिच्याकरितां आपण आपल्या प्रकृतिस्वास्थ्यावर पाणी सोडावें असें ते म्हणत

ज्या व्यावहारिक प्रश्नांकडे अत्यंत काळजीपूर्वक लक्ष देणे अवश्य आहे आणि ज्यांची चिंता वाहण्यानें बहुतेक लोकांची तहानभूक व झोंपहि उडून जाईल, असे प्रश्न हातीं घेण्याचा

जेव्हां स्वतः डॉ. केतकरांवर प्रसंग येई; तेव्हां त्या चिंताजनक गोष्टींतून आपलें मन मधून मधून बराच वेळ काढून घेऊन तें दुसरीकडे ते लावूं शकत. उदाहरणार्थ, आपला आवडता कुत्रा बरोबर घेऊन ते सहल करावयास निघत; एकाएकीं सिनेमाला जाण्याचें ठरवीत; किंवा बाहेर कोठें जावयाचें तें निश्चित न करतांच कोठें तरी हिंडत राहात; व ठिकठिकाणीं चार लोकांशीं अगदीं वेगवेगळ्या विषयांवर गप्पा मारीत. अशाच प्रकारच्या अन्य प्रसंगीं कधीं कधीं मुलांशीं खेळत खेळण्यांत ते स्वतःस विसरून जात, किंवा बागेंतील थंड हवेंत चहा घेत घेत त्यांच्या आईबरोबर गत गोष्टींविषयीं अथवा पुढील योजनांसंबंधीं गप्पा मारीत बसत. किती गोड व आकर्षक त्या योजना असत! तथापि त्यांची विश्वघटना किती निराळी असावयाची! कधीं त्या योजना खूप भव्य असावयाच्या, तर कधीं अगदीं साध्या; कारण, तसें पाहूं गेल्यास डॉ. केतकर हे गृहस्थ साध्यांतले साधे होते. "तुम्हीं म्हणजे मोठें बाळ आहां!" असें त्यांना आम्ही म्हणत असूं; आणि असें म्हटलेलें त्यांना फार आवडे. कारण त्याचा तो जाति-स्वभावच होता. त्यांचें बालपण एकांतवासांत किंवा धाकांत गेल्याचा कदाचित् हा परिणाम असेल. त्यांच्या बालपणच्या अनेक वासना अतृप्त राहिल्या होत्या आणि कळत वा नकळत त्यांच्या-भोंवतीं त्या घिरट्या घालीत. कारण, बाळपणांतील उत्कट वासना प्रौढपणीं पूर्ण झाल्या तरी त्यापासून समाधान असें फार थोडें होतें आणि तें असमाधान मागें राहातेंच.

आपल्या बालपणींच महत्त्वाकांक्षी पित्याचा मृत्यु; विशीच्या आंतच असतांना प्रेमळ मातेचें निधन; लहान एकुलत्या एक व सुरेख बहिणीचा लग्नानंतर लवकर झालेला शेवट; आणि परदेशीं

आपलें वास्तव्य असतांना आवडत्या वडील भावाचा झालेला अंत; हे दुर्धर प्रसंग आणि त्यांबरोबर येणाऱ्या अनेक गोष्टी याच एखाद्याच्या आयुष्याचा सबंध रंग पालटण्यास पुरेशा आहेत. अर्थात् कौटुंबिक जीवनाच्या सारसर्वस्वालाच जो इतकीं वर्षें मुकला आहे, अशा पुरुषास शेवटीं एकदां सुखाचें कौटुंबिक जीवन लाभल्यानंतर तें विशेषच मोलाचें वाटावें, यांत नवल तें काय ! तरी प्रत्येक बालकाला आपला जो जन्मसिद्ध हक्क प्राप्त व्हावयास हवा असतो, त्याची प्रत्यक्ष भरपाई दुसऱ्या कशानेंहि होणें शक्य नाहीं. तथापि दगडमातीच्या सभोंवतालच्या चार भिंती व त्यांतील साहित्य म्हणजे 'घर' अशी डॉ. केतकरांची समजूत नसून, 'घर' म्हणजे त्यांत राहणारीं माणसें, अशी त्यांची भावना असे. एकदां एका डाकघरांतील प्राय: शृंगारहीन अशा खोलींत राहाण्याचा प्रसग आला असतां "तुम्ही जिथें जाल तिथें सुखाचें घर ठेवलेलेंच !" असें हसत हसत व दीर्घ नि:श्वास सोडीत त्यांनीं जे पूर्ण समाधानाचे उद्गार काढिले होते, त्यापेक्षां अधिक अन्वर्थक काय असूं शकेल ? किंबहुना डॉ. केतकर अत्यंत अल्पसंतुष्ट वृत्तीचे होते. अत्यंत सामान्य, अगदीं साध्यासुध्या गोष्टींपासूनहि त्यांना अतिशय आनंद होई ! मुलांवर व प्राण्यांवर त्याचें मोठें प्रेम असे; आणि खेळकर व बागडणारीं कुत्र्यामांजराचीं पिलें पाहून त्यांना फार आनंद होई. "हे लहान लहान जीव किती संतोष देतात !" असे उद्गार त्यांच्या तोंडून बाहेर पडत; आणि ते आपलेच एक सवंगडी आहेत असा वास लागून मुलेंबाळें व जनावरें त्यांजकडे अत्यंत आकर्षिलीं जात आणि तीं उभयतां लवकरच त्यांचे भक्त बनत. आपण जणुं काय त्यांच्यापैकींच एक आहों, अशाप्रकारें ते त्यांच्याशीं खेळत व दंगामस्ती करीत. त्याचप्रमाणें लोकांनीं अगदीं तुच्छ

गणलेलीं रानफुलें, अगदीं सामान्य फुलांचा एखादा वाटवा अथवा एखादाच सुरेख रंगदार तुरा पाहूनहि त्यांच्या वृत्ति हेलावून जात. खेड्यापाड्यांतून पदोपदीं आढळणारे सामान्य देखावे—उदाहरणार्थ, विहिरीवर पाणी भरणाऱ्या बायका किंवा पाण्याची घागर डोक्यावर घेऊन ठुमकत ठुमकत चाललेल्या स्त्रीची सुंदर हालचाल इत्यादि दृश्येंहि त्यांना मोहक वाटत.

—शीलवतीबाई केतकर.

प्रश्न—डॉ. केतकर यांचें व्यक्तिमत्त्व कशांत साठलेलें होतें ? आपलें मन काळजीपासून दूर ठेवण्याकरितां डॉ. केतकर कोणते उपाय योजीत ? त्यांना कौटुंबिक जीवन विशेष मोलाचें वाटत होतें याचें कारण काय ? डॉ. केतकर हे मोठे आशावादी होते, तसेंच ते अत्यंत अल्पसंतुष्टहि होते. या दोन परस्परविरोधी गोष्टींचा मेळ कसा बसवाल ? त्यांचा जीविताकडे पाहाण्याचा दृष्टिकोन कसा होता ?

अभ्यासः—(अ) खालील वाक्यांचे अर्थ स्पष्ट कराः—

(१) महाराष्ट्रीयांस तर आशावादी आणि डॉ. केतकर हे शब्द कदाचित् समानार्थकच झाले आहेत.

(२) बालपणांतील उत्कट वासना प्रौढपणीं पूर्ण झाल्या, तरी त्यांपासून समाधान असें फार थोडे होतें, आणि तें असमाधान मागें राहातेंच.

(३) "तुम्ही जेथें जाल तेथें सुखाचें घर ठेवलेलेंच."

(ब) बाबू सुभाषचंद्र बोस आणि डॉ. केतकर या दोन पाठ्यांतील स्वभावचित्रांच्या आधारें, तुम्हांस प्रिय असलेल्या एखाद्या व्यक्तीचें स्वभावचित्र लिहा.

पुरवणीवाचन—लोकशिक्षण मासिकाचा डॉ. केतकरांच्या स्मरणार्थ निघालेला जुना अंक मिळवा व त्यांतील य. रा. दाते, ग. त्र्यं. माडखोलकर

इत्यादिकांचे लेख वाचा. श्री. कु. क्षीरसागर यांनी लिहिलेला आणि प्रतिभेच्या विशेषांकांत प्रसिद्ध झालेला डॉ. केतकर यांच्या आठवणींवर लिहिलेला लेख वाचा. सर्व लेखांत समाविष्ट झालेले डॉ. केतकर यांचें संगतवार चरित्र लिहा.

---

# १६. कोण त्याला ना स्तवी ?

ओळख:—प्रो. माधव त्रिंबक पटवर्धन ऊर्फ माधव ज्यूलियन ( जन्म इ. स. १८९४, मृत्यु १९३९ ). हे प्रख्यात साहित्यिक होऊन गेले. ह्यांच्या शिक्षणाची सुरवात बडोद्यास झाली व एम्. ए. ची परीक्षा हे मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजांतून इ. स. १९१८ सालीं फार्शी व इंग्रजी विषय घेऊन उत्तीर्ण झाले. पुढें ते आठ वर्षें फर्ग्युसन कॉलेजांत फार्शीचे प्रोफेसर म्हणून होते.



मराठी विषयाचा त्याचा व्यासंग दांडगा होता. आतापर्यंत त्यांनीं काव्य, टीका, भाषाशास्त्र इ० विषयांवर अनेक पुस्तकें व निबंध प्रसिद्ध करून, आपल्या चतुरस्र बुद्धीची ओळख रसिकांस करून दिली आहे. विरहतरंग, सुधारक, गज्जलाञ्जलि, उमरखय्याम, तुटलेले दुवे इ० काव्याचीं पुस्तकें भाषाशुद्धीवरील लेख आणि छन्दोरचना, ही त्यांची वाङ्मयसेवा प्रसिद्ध आहे. त्यांचें लिखाण वास्तविक आणि विचारांना चालना देणारें असतें. कविसंमेलनाचे व साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष म्हणून त्यांचा यथायोग्य गौरव झाला आहे.

**विषयः**—' कोण त्याला ना स्तवी ? ' ही कविता कर्त्रीनीं बडोद्याचे श्री. सयाजीराव महाराज यांना उद्देशून लिहिली आहे. या कवितेवरून थोर राष्ट्रीय नेता कसा असावयास पाहिजे, याची आपणांस कल्पना होते. व्यापक दृष्टि ठेवणारा, रूढीची कदर न बाळगणारा, दलितवर्गाचें हित पाहाणारा, आणि वर्तमानकालावर विश्वास ठेवून कार्य करणारा नेताच अखेरीच वंद्य ठरतो, हा आशय या कवितेत आढळतो.

तथापि केवळ आशय उदात्त आहे म्हणूनच ही कविता तुम्हास आवडते काय ? आणखी कोणते मूलभूत गुण या काव्यांत उतरले आहेत ?

वानिती काव्यांत जेथें भाट सत्ता पाशवी,
 जी जनांचा नाश वी,
कष्टुनी सञ्जीवनी प्रेरी स्वदेशाच्या शवीं
 कोण त्याला ना स्तवी ?
राव होऊनी खपे राष्ट्रोन्नतीच्या साधनीं
 तोच चित्तांचा धनी !
आस ठेवी अंतरीं, येवोत विघ्नें आडवी ॥ कोण० ॥

वाघिणीचें दूध द्या राष्ट्रास, घ्या त्याच्या बळें
 ऋद्धिसिद्धीचीं फळें;
ही दिसे ज्याच्या प्रयत्नें आज आली पालवी ॥ कोण० ॥

भूतकालातील मिथ्या गौरवाच्या कारणें
 पाडणें हीं कां रणें ?
थाम्बवाया जो झिणे ही दुर्मतांची यादवी ॥ कोण० ॥

सोंग धर्माचें करूनी वावरे अन्याय कीं
मान्य हो ही नायकी;
पीडितांना उद्धरी जो न्हाणुनी प्रेमासवीं ॥ कोण० ॥

स्तोम जंगी रूढिचें जो पार भङ्गाया बघे
तो जनांचे शाप घे;
काळ लोटूनी हिताची संस्कृती येतां नवी ॥ कोण० ॥

काळसाह्यें जो यशस्वी क्रान्तिकार्यीं जाहला
कीर्तिला तो पावला;
खेंचुं काळालाच पाही जो प्रयत्नें मानवी ॥ कोण० ॥

भूप नक्षत्रांपरी उच्चासनीं हे शोभती
भव्य यांच्या नौबती;
शुक्रतारा जो पहाटेचा जणूं किंवा रवी ॥ कोण० ॥

जन्मदत्त श्रेष्ठतेला जो न डोके वाकवी
तत्त्वनिष्ठेचा कवी;
तो नसेना थोर जेवीं बाण किंवा भारवी
तो सयाजीला स्तवी. ॥ कोण० ॥

—माधवज्यूलियन्.

टीप:—वी—उत्पन्न करते. शव—प्रेत. वाघिणीचें दूध—इंग्रजी भाषेला वाघिणीचें दूध असें विष्णुशास्त्री चिपळूकर यांनीं म्हटलें होतें.

ऋद्धि—ऐश्वर्य. सिद्धि—जय. जन्मदत्त श्रेष्ठता—एखाद्या उच्चकुळांत जन्मास आल्यामुळें प्राप्त होणारा मोठेपणा. तत्त्वनिष्ठेचा कवि—ध्येयावर अढळ विश्वास ठेवणारा कवि. ( श्रेष्ठ पुरुष ).

**प्रश्नः**—भूतकालांतील मिथ्या गौरव म्हणजे काय ! खरें पुढारीपण कशांत दिसून येतें ! संस्कृति म्हणजे काय ! 'राजा कालस्य कारणम्' असें एकवचन आहे, तें खरें वाटतें काय ? या कवितेंत कोणास क्रांतिकारक म्हटलें आहे ! कां ?

**अभ्यास व पुरवणीवाचनः**—१ बाण आणि भारवी या संस्कृत-भाषेंतील श्रेष्ठ कवींची थोडक्यांत माहिती लिहा. २ 'भ्रान्त तुम्हां कां पडे' ही याच कवीची कविता वाचा. ३ केशवसुतांची 'तुतारी' आणि गोविंदाग्रजांचा 'दसरा' या सामाजिक दुरावस्थेवर टीका करणाऱ्या सरस कविता वाचा. ४ यशवंत कवीच्या 'गाउ त्यांना आरती' या कवितेशीं वरील कवितेची तुलना करा, आणि तुम्हांस अधिक कोणती आवडते तें सकारण लिहा.

**बाण**—संस्कृत भाषेंतील कादंबरी या गद्यकाव्याचे लेखक. चित्रभानु हें त्यांच्या वडिलांचें नांव. ह्यांनीं 'हर्षचरितम्', 'चंडिकाशतम्' वगैरे ग्रंथ लिहिले. हे हर्षराजाचे समकालीन होत. ते ७ व्या शतकांत होऊन गेले.

**भारवी**—प्रसिद्ध संस्कृत कवि. 'किरातार्जुनीयम्' हें यांचें काव्य आहे. 'उपमा कालिदासस्य भारवेरर्थगौरवम्' हें वचन प्रसिद्ध आहे.

---

## १६. साहित्यपरिषदेची तयारी.

**ओळखः**—मराठी साहित्यांत कै. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर ( जन्म इ. स. १८७१, मृत्यू इ. स. १९३४ ) ह्यांचें नांव विनोदी वाङ्मयाचे प्रवर्तक आणि आधुनिक नाट्यतंत्राचे आणि टीकाशास्त्राचे पुरस्कर्ते, म्हणून

कायम राहणारे आहे. त्यांचें शालेय शिक्षण वऱ्हाडांत आणि उच्च शिक्षण पुणें व मुंबई या ठिकाणीं झालें. लहानपणींच त्यांना वाचनाचा नाद जडला. नाटक आणि संगीत यांवर त्यांचें विशेष प्रेम होतें. 'वीरतनय,' 'मूकनायक,' 'गुप्तमंजूष,' 'वधूपरीक्षा,' 'जन्मरहस्य,' इत्यादि नाटकें, 'दुटप्पी कीं दुहेरी,' 'श्यामसुंदर' या कादंबऱ्या, 'गीतोपायन' हा काव्यसंग्रह, आणि साहित्यबत्तिशी, (सुदाम्याचे पोहे) हा विनोदप्रचुर ग्रंथ ही त्यांची वाङ्मयसेवा रसिकमान्य झाली आहे. यांखेरीज त्यांचे विविध पुस्तकांवरील अनेक टीकालेख प्रसिद्ध आहेत. कल्पकता आणि विनोद, हेच त्यांच्या वाङ्मयाचे प्रमुख घटक होत. त्यांतही प्रसंग आणि परिस्थिति ह्यांतील विसंगतीमुळें निर्माण झालेल्या विनोदापेक्षां, शब्दार्थचमत्कृतींच्या साहाय्यानें उत्पन्न झालेल्या कोट्या, त्यांच्या लिखाणांत अधिक आढळतात. तशीच त्यांत अतिशयोक्तिहि आढळते. त्यांचें वाङ्मय अभिजात असल्यानें तें चिरस्थायी झालें आहे.




विषयः—संमेलनें व परिषदा ह्यांमुळें वाङ्मयाच्या प्रगतीची कल्पना होते. अनेक साहित्यिकांच्या गांठीभेटी होऊन त्यामुळें परस्परांत विचारविनिमय होऊं शकतो. साहित्याचा परामार्ष घेतला जावा म्हणून संमेलनें होतात. तथापि कांहीं कलमबहाद्दरांना अशा वेळीं ग्रंथकार होऊन नांव कमाविण्याची बुद्धि होते ! प्रस्तुतच्या उताऱ्यांत अशा कीर्तीला हपापलेल्या कमी प्रतीच्या लेखकांवर सुदामा, पांडुतात्या व बंडुनाना हीं काल्पनिक पात्रें निर्माण करून लेखकानें विनोदगर्भ टीका केली आहे. मात्र विनोदाला पात्र

झालेल्या वरील व्यक्तींबद्दल आपणास एकप्रकारची मौज वाटते. खऱ्या विनोदाचें हें एक लक्षणच नव्हे काय ?

आमच्या गांवीं भरलेल्या चोरांच्या संमेलनाची हकीगत यापूर्वीं वाचकांना सादर केलीच आहे. त्यानंतर बडोदें व अकोलें येथें भरलेल्या साहित्यसंमेलनाच्या हृदयंगम हकीगती वर्तमानपत्रांतून वाचण्यांत आल्या. तेव्हां आपणहि आपल्या गांवीं साहित्यपरिषदेच्या एकाद्या बैठकीचा प्रसंग साजरा करावा असें माझ्या मनानें घेतलें. कोणतीहि नवी गोष्ट करावयाची झाल्यावर तिच्यासंबंधानें प्रथम बंडूनाना व पांडूतात्या यांचा सल्ला घेण्याची माझी वहिवाट असे. तिला अनुसरून मी त्या उभयतांना घरीं बोलाविलें व त्यांच्यापुढें माझ्या मनांत घोळत असलेला प्रश्न मांडिला. माझी कल्पना उभयतांनाहि पसंत पडली.

परंतु संन्याशाच्या लग्नाला ज्याप्रमाणें शेंडीपासून तयारी करावी लागते, त्याप्रमाणें आम्हांलाहि परिषदेच्या तयारीचा आरंभ स्वतः ग्रंथकार बनण्यापासून करणें भाग होतें. एक तर परिषदेच्या निमंत्रणपत्रिकेखालीं सह्या करणारे इसम ग्रंथकारच असले पाहिजेत; दुसरें असें कीं, ग्रंथकार पाहुण्यांना सामोरे जाणारे यजमानहि ग्रंथकारच असणें इष्ट होतें; तिसरें असें कीं, परिषदेसमोरयेणाऱ्या सूचनांपैकीं कांहीं सूचना तरी ग्रामस्थांकडून येणें सोइस्कर होतें व तसें होण्याला कांहीं ग्रामस्थ तरी ग्रंथकार या नांवाला पात्र पाहिजे होते. स्वतः ग्रंथ लिहिण्याचा प्रश्न निघाला तेव्हां पांडुतात्यांची हौस जरा मावळल्यासारखी दिसली, परंतु आम्हीं दोघांनीं त्यांना साहाय्य करण्याचें जेव्हां कबूल केलें, तेव्हां तेहि ग्रंथ लिहिण्याला तयार झाले. मात्र त्या कामीं आमची मदत घेण्याचें त्यांनीं

साफ नाकारिलें. प्रत्येकानें आपला ग्रंथ एक महिन्यांत छापून तयार ठेवण्याचें कबूल केलें.

दुसऱ्या दिवशीं मीं एक लहान व सोपीशी इंग्रजी कादंबरी विकत घेऊन एका स्नेह्याच्या मदतीनें तिचें भाषांतर करण्यास सुरवात केली. भाषांतराचें काम आठ दिवसांत पुरें झालें. यापुढें माझ्या स्नेह्याच्या मदतीची जरूर न राहिल्यामुळें मीं त्याला रजा दिली. त्यापुढील आठवडा मीं त्या भाषांतरांत मूळच्या नांवां-बद्दल मराठी नांवें घालण्यांत खर्च केला. मूळ कादंबरींत नाच, प्रीतिविवाह वगैरे सुधारकी थाटाच्या प्रकारांची रेलचेल असल्या-मुळें, मीं भाषांतरांतील सर्व पात्रांना सुधारक बनविलें. त्यामुळें मला नांवें बदलण्यापलीकडे कांहीं यातायात न पडतां, सुधारकांची टवाळी करण्याचें श्रेयहि घेतां आलें. अखेरीस सुधारक घराण्यां-तील नायकनायिका सुखांत पडल्याचें वर्णन आलें. तेव्हां मात्र तें जसेंच्या तसें मराठींत उतरणें माझ्या जिवावर आलें. सुधारकी ढंग करणाऱ्या स्त्रीपुरुषांना अंतीं सुख मिळालें असें दाखविल्यास सारा समाज रसातळाला जाईल ही माझी खात्री होती; म्हणून मुळांतल्याप्रमाणें नायकनायिकांचा धर्ममंदिरांत विवाह लावून त्यांची प्रवासाला रवानगी केल्यानंतर मीं कादंबरीचा शेवट या-प्रमाणें केला:—

'हें सुधारकी जोडपें आगगाडींतून एका पुलावरून प्रवास करीत असतां एकाएकीं पूल मोडून त्यांचा डबा पुढील एंजिनासह खालील नदींत पडला, आणि तो व मागील डबे जोडणारी सांखळी धक्क्यानें त्या डब्यापासून अलग झाली. इतक्यांत कर्मधर्मसंयोगानें एक भयंकर धरणीकंप होऊन मागील डब्यांपुढें एकाएकीं एक टेकडी उभी राहिली व यामुळें त्या डब्यांचा बचाव झाला. त्या डब्यांत

एकूणएक उतारू सनातन धर्माभिमानी होते ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

माझी कादंबरी प्रसिद्ध झाल्यावर मजवर चौर्याचा आरोप येऊं नये म्हणून मीं प्रस्तावनेंत दूरदर्शीपणानें असें एक वाक्य ठोकून दिलें:—'ही कादंबरी कोणत्याहि पुस्तकांचा आधार न घेतां लिहिली आहे. तथापि ......( एथें मीं मूळ इंग्रजी कादंबरीचें नांव दिलें होतें. ) या कादंबरीशीं साम्य दिसून आल्यास ग्रंथ-कराला त्यांत कमीपणा न वाटतां आपले विचार व भाषा एका प्रसिद्ध इंग्रज ग्रंथकाराच्या विचारांशीं व भाषेशीं तंतोतंत जुळल्या-बद्दल आनंदच वाटेल.' प्रस्तावनेच्या शेवटीं मला भाषांतराच्या कामीं मदत केल्याबद्दल माझ्या स्नेह्याचे आभार मानावयाला मी विसरलों नाहीं.

हें पुस्तक तयार झाल्यावर मी तें मुंबईला छापण्याकरितां पाठवून दिलें. प्रकाशकाच्या सल्लयानें त्यांत मधून मधून कांहीं चित्रें घालण्यांत आलीं व आरंभीं माझा स्वतःचा फोटोहि देण्यांत आला. परंतु चित्राखालीं द्यावयाच्या वाक्याशिवाय इतर मजकूर चित्रकारानें वाचिला नसल्यामुळें व कांहीं स्थळीं त्याचा ग्रंथ-कारांशीं मतभेद झाल्यामुळें, त्यांत कांहीं किरकोळ चुका राहून गेल्या. प्रतिनायक काळोख्या रात्रीं एका मृत्युपत्राची चोरी करीत आहे या प्रसंगाचें चित्र काढतांना चित्रांतील सारे भाग ठळक दिसावे म्हणून चित्रकारानें आकाशांत सूर्य तळपत ठेविला. मृत्युपत्रांतील एकूणएक अक्षर वाचकांना वाचितां यावें, म्हणून त्यानें त्याचा आकार शाळेंतील फळयाएवढा करून त्यांतील अक्षरें किल्ल्यांतील अक्षरांप्रमाणें मोठीं बनविलीं. शेवटीं प्रतिनायक फांशीं जातो व नायकनायिका विवाहग्रंथीनें बद्ध होऊन चतुर्भुज होतात

असा कथाभाग होता. परंतु चित्रकार अत्यंत कोमल मनाचा असल्यामुळें त्यानें प्रतिनायकाला पळावयाला लावून त्याच्याऐवजीं एका फांसावर फांशीं देणाऱ्या मांगाला व दुसऱ्या फांसावर खुद्द ग्रंथकर्त्याला लटकावून दिलें व नायकनायिकांच्या हातापायांत बिड्या ठोकून त्यांना खरोखरीच चतुर्भुज बनविलें. चित्रकाराचे हे सारे दोष शुद्धिपत्रांत दुरुस्त करण्याची मात्र मीं पूर्ण खबरदारी घेतली.

बंडूनानांना कादंबऱ्यांचा मोठा तिटकारा असे. हिंदुस्थानची अवनति होण्याला ते जीं कारणें पुढें करीत, त्यांत कादंबऱ्यांची रेलचेल हें एक प्रमुख कारण असे. मुलांच्या हातीं लहान लहान गोष्टींचीं पुस्तकें देण्यापेक्षां गणिताचीं किंवा व्याकरणाचीं पुस्तकें देणें शतपट बरें, असें ते जोरानें प्रतिपादन करीत. रांगणाऱ्या मुलांच्या हातीं सुद्धां कादंबऱ्या देण्यापेक्षां गंभीर विषयांवरील पुस्तकें किंवा विविध माहितीनें भरलेलीं वर्तमानपत्रें देणें बरें, असें त्यांचें प्रामाणिकपणाचें मत असे.

याप्रमाणें बंडूनानांना गंभीर व शास्त्रीय वाङ्मयाबद्दल पहिल्यापासून आवड असल्यामुळें, त्यांचा ग्रंथ एखाद्या शास्त्रीय विषयावर असावयाचा अशी मीं अटकळ बांधिली होती. ती अखेरीस खरी ठरली. कारण नानांनीं एका महिन्याच्या मुदतींत एक अंकलिपी लिहून प्रसिद्ध केली होती. अंकलिपींत कर्त्याच्या कल्पकतेला तो कितीसा अवसर असावयाचा? पण आमचे नाना अत्यंत कल्पक असल्यामुळें, त्यांच्या कल्पनेची छटा अंकलिपींतहि जागोजाग दिसत होती. त्यांनीं मुळीं विषयांचा क्रमच बदलून टाकिला होता. जेथें अंक असावयाचे तेथें एकोत्री, जेथें औटकी असावयाची तेथें पावकी, जेथें तिसाचा पाढा असावयाचा तेथें एकाचा, एकंच्या

स्थानीं असावयाचा अंक दहंच्या स्थानीं व दहंच्या स्थानीं असावयाचा आंकडा एकंच्या स्थानीं. सारांश, खिळे जुळविणारांनीं धरणीकंपाच्या गडबडींत काम केलें असतां अंकलिपीला जें स्वरूप यावें, तेंच नानांच्या अंकलिपीला आलें होतें. या अंकलपीच्या पुस्तकाबरोबर शुद्धिपत्राचें पुस्तक काढावयाचा नानांचा विचार असल्यामुळें, त्यांनीं पाठ्यांत पदोपदीं मुद्दाम चुका केल्यामुळें 'चुकीमुळें शुद्धिपत्र' या नेहमींच्या कार्यकारणभावाचा त्यांनीं 'शुद्धिपत्रकाकरितां चुका' असा विपर्यास केला होता. 'चार चोक तेरा,' 'तीन चोक सात' याप्रमाणें कुट्टक–गणितांतील अंत्य भाज्यभाजकांच्या जोड्यांप्रमाणें एकमेकांशीं फटकून राहाणाऱ्या अंकांच्या जोड्या त्यांनीं पावलोंपावलीं ठेवून दिल्या होत्या. यामुळें गणितासारख्या ठरीव नियमांच्या विषयांतहि वैचित्र्य व नावीन्य आलें होतें. मुदतीच्या महिन्यांत नाना रोज भांगेवर आणि गांजावर बराच ताव मारीत, याचें कारण आतां मला कळलें. या साऱ्या चुका शुद्धिपत्राच्या पुस्तकांत अर्थातच दुरुस्त केल्या होत्या. अंकलिपी व शुद्धिपत्रक यांपैकीं कोणत्याहि एका पुस्तकानें गिऱ्हाइकाचें न भागतां त्याला दोन्ही पुस्तकें घेणें भाग पडावें अशी नानांनीं शक्कल लढविली होती; आणि ती चांगल्या प्रकारें सिद्धीला गेली होती. खिळे जुळविणारांच्या प्रमादांमुळें या शुद्धिपत्रांतहि मनस्वी चुका राहिल्याकारणानें त्याचें दुसरें शुद्धिपत्र व त्याचेंहि त्याच कारणाकरितां तिसरें शुद्धिपत्र याप्रमाणें पूर्वपूर्व शुद्धिपत्रांचें नियमन करणारीं चारपांच शुद्धिपत्रें या अंकलिपीच्या पुरवणीरूप पुस्तकांत सामील झालेलीं होतीं. अर्थातच अंकलिपीच्या पुस्तकापेक्षां हें शुद्धिपत्रांचें पुस्तक बरेंच मोठें झालें होतें.

नानांच्या ग्रंथलेखनसामर्थ्याबद्दल केव्हांहि शंका नव्हती.

पांडुतात्यांसंबंधानें मात्र माझें मन बरेंच साशंक असून, आपण त्यांच्यामागें विनाकारण हें नसतें लचांड लावून दिलें आहे, असें मला वाटूं लागलें होतें. मुदतीपैकीं पहिला आठवडा तर त्यांनीं डोकें खाजविण्यांतच घालविला. त्या खाजविण्यानें त्यांच्या डोक्याच्या वरच्या बाजूला भला मोठा नायटा उत्पन्न झाला; पण त्यानें डोक्याच्या आंतील शंकांचें विशेषसें निराकरण झाल्या-सारखें दिसलें नाहीं. त्यांनीं रोज मजकडे येऊन ग्रंथ म्हणजे काय, तो किती पृष्ठांचा असला पाहिजे, प्रत्येक पृष्ठावर किती शब्द असले पाहिजेत, ग्रंथाचा पुठ्ठा विवक्षित जाडीचा पाहिजेच कीं काय वगैरे गोष्टींसंबंधानें चौकशा कराव्या. अशा रीतीनें मुदतीचा चौथा हिस्सा बाह्यांगाबद्दल काथ्याकूट करण्यांत घालविल्यावर पुढें पांडूतात्या काय दिग्विजय लावणार, याचा मी आपल्या मनाशीं अंदाज करून चुकलों. परंतु माझा अंदाज खोटा ठरणार अशीं हळूहळू स्पष्ट चिन्हें दिसूं लागलीं. आतांशा पांडूतात्या घराबाहेर फारसे दिसेनासे झाले. रात्रीं बारा बारा वाजेपर्यंत त्यांच्या खोलींत दिवा दिसूं लागला. त्यांचें घोरणें रस्त्यावर ऐकूं यावयाचें, तें ऐकूं येईनासें झालें. एकदां त्यांनीं मजजवळचें कॅलेंडर मागून नेलें. त्यावरून तर ठरलेल्या अवधींतील प्रत्येक दिवस सार्थकीं लावण्याचा त्यांचा कृतसंकल्प दिसला. तिसऱ्या आठवड्याच्या अखेरीला त्यांचें पुस्तक छापावयाला गेल्याची बातमीहि कानांवर आली. त्यासरसा आम्हीं तात्याबद्दल आजपर्यंत करून ठेवलेला ग्रह पार बदलून गेला. अनुकूल संधि आल्यास नराचा नारायण कसा बनतो, याचें पांडूतात्या एक चालतेंबोलतें उदाहरण वाटूं लागलें. त्यांच्या ग्रंथाची पृष्ठसंख्या चारशेंच्या जवळजवळ गेली आहे असें एक दिवस कानांवर आलें. त्यानें तर आमची छातीच दडपून

गेली. तात्यांची पाणीदार चर्या एकवार तरी दृष्टीस पडावी, म्हणून आम्ही टपून बसूं लागलों व मोठ्या कष्टानें त्यांची भेट झालीच तर त्यांच्याशीं मोठ्या अदबीनें बोलूं लागलों. पुढील महिन्याचा पहिला दिवस उजाडतो केव्हां याकडे आमचे डोळे लागून राहिले. महिन्याच्या शेवटीं शेवटीं तर आमचीं स्वतःचीं पुस्तकेंहि आम्ही पार विसरून गेलों होतों.

अखेरीला एकदांचा तो सोन्याचा दिवस उजाडला ! मी व बंडूनाना आपापल्या पुस्तकाची एकेक प्रत घेऊन तात्यांच्या घरीं गेलों. त्या वेळीं त्यांच्यापुढें त्यांचा प्रचंड ग्रंथ पडला असून, त्याकडे ते अभिमानपूर्वक पाहात होते. आम्हांला पाहातांच तात्या म्हणाले, " एकंदरींत ग्रंथकर्तृत्व ही कांहीं मोठीशी गोष्ट नाहीं. आपण लक्ष पुरवीत नाहीं तोंवरच त्याचा बाऊ वाटतो. पण तें काम हातीं घेतलें, कीं हातच्या मळासारखें वाटूं लागतें."

नंतर आपल्या प्रचंड ग्रंथलेखनामुळें आमचा अगदींच हिरमोड होऊं नये, म्हणून उत्तेजनपर दृष्टीनें आम्हांकडे पाहात तात्या म्हणाले, " असो, तुम्ही आपापलीं पुस्तकें काढा. मागाहून मी आपला ग्रंथ दाखवितों. असे लाजूं नका; तुमचा हा पहिलाच प्रयत्न आहे हें मला ठाऊक आहे. मी तुमच्यापासून फारशी अपेक्षा करीत नाहीं."

आम्हीं लाजत लाजत मोठ्या मुष्किलीनें आपलीं पुस्तकें तात्यांच्या पुढें केलीं. त्यांनीं एक पुस्तक एका हातांत व दुसरें दुसऱ्या हातांत घेऊन त्यांच्या वजनांचा अंदाज करीत म्हटलें, " एका महिन्यांत प्रत्येकानें इतक्या वजनाचें पुस्तक बाहेर आणावें, हें तुम्हांस भूषण आहे. मींहि आपल्या अल्प सामर्थ्याप्रमाणें हा चारशें पानांचा ग्रंथ काढला आहे." असें म्हणून त्यांनीं वर सोनेरी अक्षरें झळकत असलेला कापडी बांधणीचा आपला जाडा ग्रंथ बंडूनानांच्या

हातीं ठेविला. नानांनीं वरील अक्षरांवरून आपली दृष्टि एकदां फिरविली मात्र, आणि त्यांना असें कांहीं अनिवार हसूं लोटलें, कीं न भूतो न भविष्यति ! हसण्याचा जोर कांहींसा मंदावतांच ते ओरडले, ' अरे तात्या, ही तर नुसती डायरी आहे ! आणि



हिच्यावर तूं आम्हांला इतके दिवस झुलविलेंस ना ! शाबास आहे तुझी ! आणि हीं कोरीं पानें तुझ्या कोऱ्या ठणठणीत डोक्याला शोभण्यासारखीं आहेत खरीं ! बरें, डायरीच का होईना ! ती पुढील सालची नाहीं तर नाहीं, चालू सालची तरी असावयाची होती ! पण तुझा आपला तृतीयच पंथ ! ही मागील सालची डायरी घेणार कोण ? '

हा वर्षाव चालला असतांना तात्या ओशाळगतीनें थिजल्यासारखे होऊन बसले होते. परंतु इतक्यांत त्यांना कसलासा विचार येऊन ते प्रसन्न मुद्रेनें म्हणाले, " या डायरीच्या दोन हजार प्रतीं-

पैकीं एकहि खपली नाहीं तर त्यांतहि मला समाधान मानावयाला थोडीशी जागा आहे."

"ती कोणती ?"

"या डायरींत कांहीं चमत्कारिक चुका राहिल्या आहेत; व त्यांची दुरुस्ती ज्या शुद्धिपत्रांत केली होती तें शुद्धिपत्र डायरीला जोडावयाचें चुकीनें राहून गेलें. डायरी ज्या सालची आहे त्या सालांत फेब्रुवारीचे एकूणतीस दिवस असतां डायरींत चुकीनें तीस पडले आहेत. यामुळें पुढील साऱ्या तारखांचे वार चुकले आहेत. त्यांतून या वेड्या धोंड्याच्या महिन्यानेंहि याच सालीं येऊन सारी घाण केली ! बाळाचें नांवहि कसें योग्य ठेविलें आहे पण ! अगदींच दगड ! पुढल्या सालीं आला असता तर काय बिघडलें असतें ! पण तो नेमका डायरीच्याच सालीं आल्यामुळें, डायरींतील दिवाळी एक महिन्यानें अगोदर आली आहे. याचा अर्थ असा कीं, जो दिवस सारें जग सर्वपित्री अमावास्या म्हणून गंभीर विचारांत घालविणार, त्या दिवशी माझ्या डायरीचीं गिऱ्हाइकें अभ्यंगस्नान करून व फराळावर यथेच्छ ताव मारून फटाके उडवीत बसणार ! बरें, माझ्या हातून चूक झाली तर झाली, खिळे जुळविणारांना तर कांहीं अक्कल असावी ! तेहि सारे बेटे शतमूर्ख !"

"पांडूतात्या, ज्याअर्थीं ही डायरी गेल्या सालची आहे, त्याअर्थीं तिच्यामुळें गिऱ्हाइकांची फसगत होईल ही काळजी बाळगण्याचें तुम्हांला मुळींच कारण नाहीं. हिच्यांत कितीहि चुका असल्या तरी तुम्हांला ग्रंथकार बनविण्याचा कार्यभाग हिजकडून झालाच आहे. आतां पुढील कर्तव्याकडेच आपणांला लक्ष दिलें पाहिजे."

—श्री. कृ. कोल्हटकर.

**प्रश्न:**—सुदामा व त्याचे मित्रद्वय यांना आपल्या गांवीं साहित्यपरिषद भरविण्याची इच्छा कां झाली ? तिचें पर्यवसान कशांत झालें असावें ? मराठींत स्वतंत्र ग्रंथ कां निर्माण होत नाहींत ? सुदाम्यानें लिहिलेल्या कादंबरींत कोणते दोष होते ? चित्रकारानें त्या दोषांत कोणत्या रीतीनें भर घातली ? पांडूतात्यानें ग्रंथकार होण्याची आपली हौस कोणत्या रीतीनें फेडून घेतली ?

**अभ्यास:**—खालील वाक्यांत कोणते विशेष गुण प्रकट झाले आहेत ते लिहा व त्यांतील अर्थ अधिक स्पष्ट करा.

१ अखेरीस सुधारक घराण्यांतील नायकनायिका सुखांत पडल्याचें वर्णन आलें, तेव्हां मात्र तें जसेंच्या तसें मराठींत उतरणें माझ्या जिवावर आलें.

२ चित्रकार अत्यंत कोमल मनाचा असल्यामुळे, त्यानें प्रतिनायकाला पळावयाला लावून, त्याच्याऐवजीं एका फांसावर फांशी देणाऱ्या मांगाला व दुसऱ्या फांसावर खुद्द ग्रंथकर्त्याला लटकावून दिलें.

३ सारांश, खिळे जुळविणारांनीं घरणीकंपाच्या गडबडींत काम केलें असतां अंकलिपीला जें स्वरूप यावें, तेंच नानाच्या अंकलिपीला आलें होतें.

४. त्यांतून या बेट्या धोंड्याच्या महिन्यानेंहि याच सालीं येऊन सारी घाण केली ! बाळाचें नांवहि कसें अगदीं योग्य ठेविलें आहे पण ! अगदींच दगड !

( अ ) तुमच्या शाळेच्या संमेलनाच्या वेळीं अधूनमधून जे विनोदी प्रसंग घडतात त्यांचें वर्णन करा. ( ब ) वरील साहित्यसंमेलनाचा शेवट कसा झाला असेल, हा भाग तुम्ही आपल्या कल्पनेप्रमाणें विनोदपूर्ण भाषेंत लिहून पूर्ण करा.

**पुरवणीवाचन:**—रिकामपणाची कामगिरी ( गडकरी ), चिमणरावाचें चऱ्हाट, वायफळाचा मळा ( चिं. वि. जोशी ), दाजी ( ताम्हनकर ), जुना बाजार ( कॅ. लिमये ) हीं विनोदप्रचुर पुस्तकें वाचा.

# १७. अष्ट दिशांचा गोफ.

**ओळख**—कै. त्र्यंबक बापूजी ठोमरे ऊर्फ बालकवि (जन्म इ. स. १८९०, मृत्यु इ. स. १९१८). यांची कीर्ति निसर्गावर प्रेम करणारे एकनिष्ठ कवि म्हणून महाराष्ट्रभर झाली आहे. अल्पायुष्यांत त्यांनीं 'फुलराणी,' 'निर्झरास,' 'रजनीस आवाहन' ह्यांसारख्या आकर्षक कविता लिहून मराठी भाषेची मोठी सेवा केली. यांच्या गीतांवर, करुण-रम्य उदासीनतेची मनोहर छटा पसरलेली दिसते. विश्वांतील सौंदर्याशीं त्यांचा जीव तेव्हांच एकमय होई आणि मग त्या उत्कट मनोभावनेंतून ते काव्य लिहीत. त्यांच्या भाषेची 'कांति' कांहीं अपूर्वच वाटते.

**विषय**:—संध्याकाळच्या वेळीं आकाशांत फिरणाऱ्या एका गोजिरवाण्या खगबाळाला उद्देशून कवीनें ही कविता लिहिली आहे. त्याच्या सुखाचा आपणाला किती हेवा वाटतो, हें कवीनें स्पष्ट सांगितलें आहे. खगबाळा-प्रमाणेंच 'चैतन्याच्या कोवळ्या किरणांत' आपणास खेळावयास मिळावें ही कवीची उत्कट इच्छा येथें प्रतिबिंबित झाली आहे.

सांज खुले सोन्याहुनि पिंवळें हें पडलें ऊन.
चोहिंकडे लसलशित बहरल्या हिरवाळी छान !

पांघरली जरतार जांभळी वनमाला शाल
सांध्यतेज गिरिशिखरीं विखरी संमोहनजाल.

त्या तेजाचा प्राण चिमुकला संध्येचा दूत
बालविहग आनंद मूर्तिमान् झुलतो गगनांत ।

क्षणभर येथें क्षणभर तेथें भिंगोरी साची
अवकाशीं जाशि काय फिरविली फिरकी जादूची !

खेळावू कविबाळ करुनि जणुं भावांची होडी
मूर्तरूप देउनी तिला या वाऱ्यावर सोडी.

गिरिशिखराचें गोल फूल हें सांध्यतरंगांनीं
झुलुनि त्यांतला पराग कीं हा भरभरतो गगनीं ?

अष्टदिशांचा गोफ सभोंतीं हा भिरिभिरि पाहे
मंद झुले वनमाल वाहतां शांत झरा राहे.

समाधिस्थ जणुं काय जाहलें हा गिरि, हें रान
हा आनंदोद्रेक नाचरा गगनीं पाहून ?

सुंदरतेचा जलसा असला पाहुनिया धाला
काळहि वाटे विस्मित चित्तें स्तब्ध उभा ठेला.

सृष्टिदेविच्या सगुणा बाळा स्वर्गीच्या तान्ह्या
नांवहि रे तव ठाउक नाहीं मज गोजिरवाण्या !

निजदेहाचा करुनि असा हा सुंदर आंदोल
आत्मरंगीं रंगल्या मनाला झुलविसि कीं बोल ?

किंवा कोणी दिव्य देवता जरि न दिसे मज ती
लीलेनें तुज हालविते का घेउनिया हातीं ?

सुंदरतेच्या सुमनावरचें दंव चुंबुनि घ्यावें
चैतन्याच्या गोड कोवळ्या उन्हांत हिंडावें

प्रीतिसारिका गीत तियेचें ऐकावें कानीं
बनवावें मन धुंद रंगुनी काव्यसुधापानीं !

अंधाराचे पाश मनाचे हे गळुनी जावे
चित्त वाटतें सरळ तुझ्यापरि खगबाळा व्हावें.

भवदुःखाच्या अनंत डोहीं परि बुडतों पाहीं,
शांति मिळेना क्षणभर जीवा विश्रांती नाहीं.
काव्य-देवता अंतरली मज गरिबाला आज।
काळ लोटला हाय किती मन वरिताहे लाज.
भ्राते माझे वातावरणीं तुजपरि भरभरती.
पंख तुटुनिया विव्हळ पडलों मी धरणीवरतीं.
सुंदरतेच्या मोहनांत मन अमुचेंही नाचे
बंधहि होती शिथिल हरपतें, भानहि जगताचें.
जीव ओढतो वरवर जाया चैतन्यासाठीं
हाय ! सुटेना दृढ देहाच्या परि बसल्या गांठीं !
दिव्यानंदीं म्हणुनि उमाळा दुःखाचा दाटे.
सत्यहि जो आनंद कल्पनामय केवळ वाटे
अपूर्णता ही यापरि मजला जरि बुडवी शोकीं
चित्र मनोहर खगबाला परि मी तव अवलोकीं.
अपूर्ण अपुलें ईप्सित झालें पूर्ण दिसे जेथें
मनुजांचें मन सहज पावतें आकर्षण तेथें.
तुजला बघतां भरभर उडतां कविता आठवली
कशीबशी ती त्वत्प्रीतीस्तव या कवनीं लिहिली.

प्रश्नः—अष्टदिशांचा गोफ हें कवितेस दिलेलें नांव कसें अन्वर्थक आहे ? स्वतःची कोणती परिस्थिति कवीनें खगाला निवेदन केली आहे ? कवितेंत विशेषेंकरून कोणते अलंकार आले आहेत ?

अभ्यासः—( १ ) अपूर्ण अपुलें ईप्सित झालें पूर्ण दिसे जेथें,
मनुजाचें मन सहज पावतें आकर्षण तेथें.
( २ ) समाधिस्थ जणुं काय जाहले हा गिरि, हें रान.
वरील चरणांतील कल्पना अधिक उघड करा.

उत्प्रेक्षा अंलकाराचें लक्षण आणि त्याचें या कवितेतील उदाहरण लिहा.

**पुरवणीवाचनः**—श्री. दामोदर अच्युत कारे यांची 'सृष्टीच्या अंगणात' ही कविता वाचा.

---

## १८. निःपक्षपाती मतें.

**ओळखः**—सुप्रसिद्ध 'चित्रा' मासिकाचे संपादक, 'पिकलीं पानें,' 'शिंपले आणि मोतीं' इ० लघुनिबंधसंग्रहाचे लेखक आणि 'चांदरात' या सुरम्य काव्यसंग्रहाचे कर्ते म्हणून श्री. अनंत काणेकर, बी. ए., एल्‌एल्. बी. यांचें नांव सर्वश्रुत आहे. समाजांतील सद्यःस्थितीचें सूक्ष्म निरीक्षण करून त्यांत आढळून येणाऱ्या गुणदोषांवर ते आपल्या लेखनकौशल्यानें स्पष्ट प्रकाश पाडितात. त्यांच्या अंतःकरणाचा जिव्हाळा त्यांच्या लेखनांत उतरल्यामुळें तें हृदयस्पर्शी व वास्तववादी वाटतें.



**विषयः**—आज आपल्या समाजांत जे श्रीमंत, मध्यम व गरीब असे तीन वर्ग दिसून येतात, त्यांपैकीं शेवटच्या वर्गाची—गरिबांची—कशी दीनस्थिति होते व समाज त्याच्याकडे कसा बेफिकीरवृत्तीनें पाहातो हा एकच प्रश्न लेखकानें येथें मांडिला आहे. तो लक्षांत घेतल्यास लेखकाची कळकळ हीच त्याच्या मोहक प्रतिपादनशैलीच्या मागें दडलेली तुम्हांस दिसून येईल.

कांहीं दिवसांपूर्वीं घरांचीं भाडीं कमी करावीं, अशी एक चळवळ मुंबईत सुरू झाली होती. त्यावेळीं त्या चळवळीचे एक पुढारी माझ्याकडे येऊन म्हणाले, " तुमचं अगदीं निःपक्षपाती मत द्या बुवा या विषयावर. "

मीं म्हटलें, " मी निःपक्षपाती मत मुळींच देणार नाहीं. मी धडधडीत पक्षपाती मत देणार; आणि ज्याअर्थीं मी भाड्याच्या घरांत राहातों, त्याअर्थीं भाडीं नुसतीं कमी करावीं इतकेंच नव्हे तर शक्य असल्यास भाडीं घेऊंच नयेत, असें माझें ठाम मत आहे ! "

हो, उगीच निःपक्षपातीपणाचें ढोंग कशाला ? खरें पाहूं गेल्यास कोणी कधींच निःपक्षपाती मत देत नाहीं. प्रत्येक प्रश्नावर आपलें मत बनवितांना आपली कळत अगर न कळत स्वहितावर दृष्टि असतेच; आणि केव्हां केव्हां यांत स्वार्थाचा किंवा ढोंगीपणाचा खरोखरीच प्रश्न नसतो. आपण अगदीं प्रामाणिकपणानें निःपक्षपाती होण्याचा प्रयत्न करीत असतों आणि आपण स्वार्थी विचार करीत नाहीं, याची आपणाला पूर्ण खात्री वाटत असते; तरी पण त्यांत स्वपक्षपात केव्हां केव्हां वर डोकावतोच. म्हणूनच मी म्हणतो, कीं केव्हां केव्हां न कळत आपली स्वहितावर दृष्टि असते.

मला स्वतःची एक गोष्ट आठवते. आमचे गणूकाका एकदां फार आजारी होते आणि त्यांच्या शुश्रूषेचा बराचसा भाग माझ्यावर पडला होता. मी अगदीं थकून गेलों होतों. शेवटीं ते एकदां बरे झाले आणि हवा पालटण्याकरितां त्यांनीं लोणावळ्यास किंवा दुसऱ्या कुठल्या तरी हवेच्या ठिकाणीं जावें असें डॉक्टरांनीं सांगितलें. तव्हां लोणावळ्याला जावयाचा त्यांना मी फार आग्रह करूं लागलों. आणखी चारआठ दिवसांनीं जाईन, असें ते म्हणत होते. पण मी लगेच निघावयाला सांगत होतों. त्यांनीं तेथें लवकर

जाऊन खूप दिवस राहावें, म्हणजे त्यांना बरें वाटेल, असें खरो-खरच मला वाटत होतें आणि म्हणूनच त्यांना मी आग्रह करीत होतों. पण ते निघून गेल्यावर मला किंचित् असा भास होऊं लागला कीं, त्यांना एवढा आग्रह करण्यांत केवळ त्यांचेंच हित होतें असें नाहीं. ते एकदां लवकर गेले म्हणजे मलाहि थोडा विसावा मिळेल; आणि ही थोडी स्वहिताची भावना त्या आग्रहाच्या मुळाशीं असावी. आणि मला वाटतें, ती होतीच; पण त्यांत लाज वाटण्यासारखें कांहींच नाहीं. स्वतःच्या शरिरांतून स्वतः फुटून बाहेर पडणें कुणालाहि शक्य नाहीं आणि त्यामुळें आपल्या प्रत्येक विचारावर आणि आचारावर आत्मीयत्वाची थोडीबहुत छटा पडायचीच. स्वतःला सोडून आपण विचार तरी कसा करणार?

पण अशी ही परिस्थिति असतांनासुद्धां आम्ही स्वहिताचा किंवा स्वतःच्या वर्गाच्या हिताचा मुळींच विचार न करतां अगदीं



निःपक्षपाती मतें देतों, असें सर्व जगाला ओरडून सांगणारे महात्मे जगांत किती तरी आहेत. अशा एका महात्म्यावर अत्यंत

मार्मिक टीका असलेलें एक सुंदर व्यंगचित्र माझ्या एकदां पाहाण्यांत आलें होतें. त्यांतला विषय मोठा मजेदार होता. एक काळाकभिन्न पाण्याचा डोह काढला होता आणि त्याला ' दुर्दशा ' असें नांव दिलें होतें. त्या डोहांत एक शिडी असून तिच्या बऱ्याचशा खालच्या पायऱ्या डोहाच्या पाण्यांत बुडालेल्या होत्या. शिडीच्या अगदीं तळाला एक मजूर उभा असून त्याच्या शरिराचा सर्व भाग पाण्यांत बुडालेला आणि फक्त डोकें तेवढें पाण्याच्या बाहेर होतें. त्या मजुराच्या वर एक मध्यमवर्गीय मनुष्य उभा असून, त्याच्याहि वर शिडीच्या वरच्या टोंकाला धरून एक गलेलठ्ठ श्रीमंत मनुष्य उभा होता. आणि या सर्वांकडे पाहात एक निःपक्षपाती महात्मा व्याख्यान देत होता कीं, " बाबांनो, सर्व जग दुर्दशेच्या तडाख्यांत सांपडलें आहे, तेव्हां सर्वांनीं—श्रीमंतांनीं, गरिबांनीं—सारखाच स्वार्थत्याग करावयास तयार झालें पाहिजे. अगदीं कांहीं एक पक्षपात न करतां मी सांगतों, कीं तुम्हीं प्रत्येकानें फक्त एकच पायरी खालीं उतरावी ! "

किती निःपक्षपाती निकाल ! श्रीमंतानेंहि एकच पायरी खालीं यावयाचें. मध्यम वर्गानेंहि एकच पायरी आणि गरिबानेंहि एकच ! पण या निःपक्षपाती निकालाचा परिणाम मात्र एवढाच होणारा होता कीं, श्रीमंत मनुष्य एक पायरी खालीं आला, तरी वरच्यावर सुरक्षित राहात होता. मध्यमवर्गीयाचे एक पायरी खालीं येण्यानें पाय पाण्यांत बुडत होते, आणि गरीब मात्र एक पायरी खालीं आल्याबरोबर डोकेंहि पाण्याखालीं बुडून जिवानिशीं मरत होता ! तरी पण असल्या निःपक्षपाती महात्म्याचे पोवाडे गाणारे हरीचे लाल जगांत काय थोडे आहेत !

—अनंत काणेकर.

**प्रश्नः**—स्वतःला सोडून आपण विचार करूं शकत नाहीं, हें सत्य लेखकानें कोणत्या उदाहरणानें स्पष्ट केलें आहे ? मनुष्याला निःपक्षपाती मत देणें शक्य आहे काय ? केव्हां ?

**अभ्यासः**—( १ ) स्टेशनवर हमालाचें काम करीत असलेल्या मजुराचें शब्दचित्र लिहा.

( २ ) श्रीमंत आणि गरीब हे दोघेहि असंतुष्ट आहेत, अशाबद्दलचा एक संवाद तयार करा.

**पुरवणीवाचनः**—श्री. वि. स. खांडेकर यांचें 'वायुलहरी' हें पुस्तक वाचा.

---

# १९. प्रवासी.

**विषयः**—श्री. वामन भार्गव पाठक यांच्या 'प्रवासी' या काव्यांतून खालील उतारा घेतला आहे.

मनुष्याचा स्वभावच असा आहे कीं, त्याला वर्तमानकाळापेक्षां भविष्य-काळच फार रम्य वाटतो. दररोजचीं कर्तव्यकर्मे मनःपूर्वक केल्यास आपण सुखी होऊं ही कल्पना त्याला केव्हां केव्हां नसते. अशाच विचारसरणीचा एक प्रवासी खालील कवितेंत आपले अनुभव निवेदन करीत आहे. लहान-पणीं त्यानें ज्या गोष्टी केल्या त्यांच्या गोड आठवणीनें त्याचें मन व्यास झालें आहे. आपण जरी पुष्कळ धडपड केली तरी आपणास आपलें ध्येय गांठितां आलें नाहीं असें त्यास वाटतें, आणि आपलें जीवन हें अजून अस्थिरच आहे असा त्यास अनुभव येतो. परंतु या अस्थिरतेंतच खरें सौंदर्य आहे असें निसर्गातील दृश्यांवरून शेवटीं त्याच्या ध्यानांत येतें. आरंभीं चिंतातुर असलेला प्रवासी शेवटीं कसा आशावादी होतो, व समाधान पावतो, हें खालील उताऱ्यावरून तुमच्या ध्यानांत येईल.

होउनी चिंतार्त तो हे शब्द तेव्हां बोलला—
"मार्ग माझ्या जीविताचा आज कोठें चालला।
रम्य मी पाहून शृंगें धांवलों अद्रीकडे
सन्निधीं येतांच पायीं बोचले कांटेखडे;
स्वर्धनू पाहूनि तेव्हां अंतरीं संतोषलों
लुप्त तें झालें श्रमी मी वाळवंटीं राहिलों!
कल्पनाकुंजांत पाणी भावनेचें शिंपुनी
रम्य मीं उद्यान केलें भावि काला निर्मुनी!
ध्येयवृक्षीं गोड आशा-पक्षिणी झेपावल्या
आणि पाणी स्वर्नदीचें प्यावयाला धावल्या!
चंद्रशाला त्या विशाला आज गेल्या भंगुनी
मात्र छायेमाजि आहे त्या स्मृतींच्या रंगुनी!"

"आठवे छत्रांत तेव्हां माउलीच्या राहुनी
थोर केले व्याप कीर्ती मेळवाया या जनीं
सोसुनी आघात नाना ज्ञानविद्या सेविली
होउनी आरूढ काया ध्येयचक्रीं भागली
सेवुनी गर्विष्ठ भारी मीं धनाढ्यांची मती
पाळिली नाहीं मनाची वा रुचीचीही क्षिती!
शेवटीं येई यशाचें बाहुलें माझ्या करीं
घेउनी तें ठायिं ठायीं हिंडलों वाद्यापरी!"

"शाळुच्या शेतांत ताटें खावयाला कोवळीं
आणि पाणी प्यावयाला शांतशा भीमाजळीं
देउनी मोठ्या प्रमोदें हात दादाच्या करीं
पाडसाला घेउनी गेलों सवें घोड्यावरी.

लोटतां पाणी मजेचें तेथ थारोळ्यावरी
पाय जों पाटांत माझे हर्षलों तों अंतरीं.
खाउनी शेंगा तुरीच्या मोकळ्या रानामधें
शीळ घालोनी मुखानें हिंडलों मोदामधें.
काय तेव्हां वाटलें तें मोददायी जीवन ?
आज मी काव्यात्म झालों आठवोनी ते दिन !
ठाउकें कोणास माझें चाललेलें जीवित
कीं कवी कोणी खुळा राहील काव्यीं गुंफित !"

" जाहली स्फूर्ती मनाला काव्यमाला गुंफिल्या
जागुनी रात्री कितीदां मीं उषा आलोकिल्या.
पाहिला लांबून जों गंभीर तो काव्योदधी
प्रेमभावें सत्कवींच्या लीन झालों मी पदीं !
डुंबण्याला पल्वलींही धीर घे ना अंतर
कोठुनी सामर्थ्य येई पोहण्या रत्नाकर
घेउनी तीरावरोनी बोल आलों बोबडे
लोक भोळे मानिले त्यांनीं हिरे माझे खडे !
वाटला त्यांच्या स्तुतीनें स्वर्ग तेव्हां ठेंगणा
एक मी लोकीं म्हणालों शाहणा कीं देखणा
मान्य ती प्राणाहुनीही वाटली व्याजस्तुती
ना कधीं ध्यानांत आलें त्यामुळें ये दुर्गती !
आज ती लोपून गेली स्फूर्तिची दिव्यांगना !
जीव हा स्वप्नांतल्या लोभे तियेच्या दर्शना !"

" थोडका आवेश होता माझिया वाणीमधें
अल्पकाळीं लाभली तों वाहवा लोकांमधें !

लोट लोकांचे जमा जों जाहले माझ्या घरीं
लागल्या शोभावयाला कीर्तिच्या माला करीं !
अंतरंगीं काय होतें ज्ञान तें ठावें मला
पोपटाचें सांग लोकीं दाखवावें ती कला !
ज्या कलेनें मोहुनी मी जाहलों वेडापिसा
कीर्तिची चित्तीं पिपासा मीन कीं जाळीं जसा.
मात्र वीणेची तुटोनी तार गेली जेधवा
जाहली माझी पुनः नाहीं कदापी वाहवा !
प्रेम का निर्व्याज लोकीं सापडायाचें खरें ! ''
लोपतां ऐश्वर्य कीर्ती दूर होतीं पांखरें !''

'' पातलें चोहींकडे हें लोकशाहीचें युग
देश माझा दीन झाला पारतंत्र्यीं जाचक.
राष्ट्रवीरांच्या स्मृतीनें चित्त हें प्रक्षाळिलें
हारही पायीं स्तुतींचे त्यांचिया अर्पीयले !
द्यावया स्फूर्ती जनातें व्यर्थ वाणी खर्चिली !
पाहिजे देशोन्नतीला ती न काया अर्पिली
धन्यता पावेल का तो जो कडेला पोहतो ?
जो उडी आगींत घेई तो पुढारी शोभतो !''

'' चंचले हे तारके गे धन्य तूंतें मी नमीं
तेज नाहीं जाहलें थोडें तुझें केन्हां कमी.
आणि बाळा निर्झरा तूं मूर्ति चांचल्यांतली
यामुळें गोडी जलाची बा तुझी का वाढली:?
आज तूं येथें उद्यां स्वर्गांत फेरी घालिसी.
स्थैर्य नाहीं मारुता, तूं सौख्य आम्हां अर्पिसी

चाललें मेघांत मोठें हें विजेचें नर्तन
दृष्टिला सौंदर्य तीचें मोह ठेवी घालुन.
जाहलें चांचल्य विश्वीं चारुतेनें मण्डित
जीविताचा मी प्रवासी काय नाहीं शोभत ? ''

**प्रश्नः**—प्रवासी आरंभीं चिंतातुर कां झाला होता ? लहानपणीं त्यानें कोणत्या गोष्टी केल्या ? त्याचें त्याला काय फळ मिळालें ? शाळूच्या शेतांत हिंडत होता तेव्हां तो सुखी होता काय ? काव्य आणि वक्तृत्व यांबद्दल त्याला काय अनुभव आले ? आपले आयुष्य जरी चंचल आहे, तरी त्यांत मौज आहे असें त्यास केव्हां पटलें ?

**अभ्यासः**—( १ ) शालेय जीवनांतील कांहीं रम्य आठवणींचें टांचण तयार करा. ( २ ) तुम्हीं केलेल्या एखाद्या सहलीचें वर्णन करा.

**पुरवणीवाचनः**—गोल्डस्मिथ या कवीचें Traveller हें काव्य वाचा.

---

# २० भाषाभिवृद्धीची सामाजिक दृष्टि.

**ओळखः**–प्रो. श्री. म. माटे ( जन्म इ. स. १८८६ ) यांचे प्राथमिक शिक्षण साताऱ्यास आणि उच्च शिक्षण पुण्यास झालें. अध्यापक आणि समाजसेवक या नात्यानें त्यांनीं आतांपर्यंत मोठीच कामगिरी केली आहे. अस्पृष्टांच्या प्रश्नांकडे त्यांचें लक्ष कित्येक वर्षांपासून खिळून राहिलें आहे. ते अभिजात वक्तेहि आहेत. ' विज्ञानबोध ', ' अस्पृष्टांचा प्रश्न ', ' महाराष्ट्र–सांवत्सरिक ,' ' परशुरामचरित्र ' वगैरे विचारपरिप्लुत ग्रंथांच्या प्रसिद्धीनें त्यांनीं मराठी वाङ्मयाची अमोलिक सेवा बजाविली आहे कमाविलेली भाषा आणि सडेतोड विचारसरणी यांमुळें त्यांचें लिखाण

मननीय वाटतें. त्यांतच, विनोदशीलताहि प्रकट होत असल्यानें तें मनोरंजक होतें. हल्लीं ते सर परशुरामभाऊ कॉलेजमध्यें मराठीचे प्राध्यापक म्हणून काम करीत आहेत.

**विषय:**—लोकांचा व्यवहार जसा वाढत जाईल, तशी त्यांच्या भाषेचीहि वाढ होत असते, हा सर्वसाधारण नियम आहे. मात्र निरनिराळ्या क्षेत्रांत काम करणाऱ्या व्यक्तींनीं आपणांस मिळणारे विविध अनुभव आपल्याच शब्दांत व भाषेंत ग्रथित केले पाहिजेत, तरच भाषेची वाढ होऊं शकते. सोबतच्या उताऱ्यांत लेखकांनीं भाषेकडे पाहण्याचा आपला दृष्टिकोण कसा असावा, हें उघड केलें आहे. भाषेचें कार्य ही एक सामाजिक बाब आहे आणि तिचा विकास घडवून आणणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे, ही कल्पना सर्वत्र प्रसृत झाली पाहिजे. भाषेची वाढ अनेक प्रकारांनीं होते. त्यांतच तिच्यांत रूपकांचें जें वैशिष्ट्य येतें त्याची फोड लेखकांनीं अनेक उदाहरणांसह किती विनोदी प्रकारानें केली आहे ती वाचा.

"निरनिराळ्या दृष्टीनें एखाद्या विषयाकडे पाहाणें" असा कांहीं एक प्रकार असतो. आर्थिक दृष्टीनें पाहाणें, ऐतिहासिक दृष्टीनें पाहाणें, हें जसें, तसेंच सामाजिक दृष्टीनें पाहाणें हेंहि एखाद्या विषयाचा बोध खराखुरा होण्यास फार उपयोगीं पडतें.

भाषा वाढते म्हणजे तिच्यांतील शब्द वाढतात. शब्द हे मनांत उद्भवलेल्या कल्पनांचीं व गोचर पदार्थांचीं नांवें असतात हें उघड आहे. हे शब्द जों जों जास्त होत जातात तों तों भाषेची समृद्धि होत जाते. शब्दांची वाढ अधिक होण्याचीं जीं अनेक साधनें आहेत. त्यांत रूपकांची योजना हें एक फार मोठें साधन आहे. प्रथम प्रथम हौशी बोलणारा किंवा लिहिणारा आपल्या लिहिण्यांत किंवा बोलण्यांत सरसपणा आणण्यासाठीं सुंदर

रूपकांची योजना करतो. हीं रूपकें परिचित असलीं किंवा थोड्या कल्पनेनें ओळखतां येण्यासारखीं असलीं, तर वाचकांना किंवा श्रोत्यांना अतिशय आनंद होतो; व त्यांच्या या गुणामुळें तीं लोकांमध्यें चांगलींच चलन पावतात, लोक त्यांचा सरसकट उपयोग करूं लागतात; इतका कीं, शेवटीं त्यांतील काव्यगुण लोपून साध्या व्यावहारिक शब्दांचें रूप त्यांना प्राप्त होतें व अशा रीतीनें शब्दसंख्या वाढते. एखाद्यानें पंधरा मिनिटांच्या बोलीनें जर एखादा हेलकरी केला, पण मुक्कामाचें घर लवकर सांपडलें नाहीं, म्हणून त्यानें त्याला पाऊण तास तेवढ्याच मजुरीवर रखडविलें, तर आपल्या या पराक्रमाचें फुशारकीनें वर्णन करतांना तो म्हणतो, "मीं त्या हेलकऱ्याला तसाच पुढें ताणीत नेला." आतां अगदीं प्रथम ज्यानें 'ताणीत नेणे' हा शब्दप्रयोग केला असेल त्यानें काव्यमय रचना केली होती हें स्पष्ट आहे. रबराचा तुकडा एक बोटभर लांब असतो व एरव्हीं मोजून पाहिलें तर त्याची लांबी तितकी भरते. पण कांहीं कारणासाठीं हेंच रबर ताणलें तर हातभर लांब होतें. अर्थात् ही लांबी अंगिकारितांना रबराला क्लेश होतात हें सहज दिसतें. हा 'ताणणें' याचा अर्थ आहे. हेलकऱ्याचीं जीं पंधरा मिनिटें होतीं त्यांचीं 'ताणून' पंचेचाळीस केलीं व त्याच्या क्लेशांकडे लक्ष दिलें नाहीं, हा सगळा अर्थ पहिल्यानें माणसानें रूपकानें सांगितला; पण पुढें तो शब्द अनेकवार उपयोगांत आल्यामुळें लोक त्याचा काव्यगुण विसरले व तो शब्द साध्या व्यावहारिक अर्थाचा होऊन बसला; म्हणजे रूपकाचा साधा शब्द झाला.

शब्दकोश उघडून पाहिला, तर अशा तऱ्हेनें आपलें रूप गमावून बसलेले शब्द अगदीं मुळापर्यंत व्युत्पत्तिदृष्ट्या नेऊन

पोहोंचविलेलें तेथें सांपडतीलच असें नाहीं. कारण, असें केल्यानें कोशकर्त्याचें काम फारच वाढेल. म्हणून रूपकपणा टाकल्यावर त्याला जो व्यावहारिक अर्थ उत्पन्न झालेला असतो तेवढा देऊनच कोशकर्त्याला भागवावें लागतें. पण एवढें मात्र खरें असतें कीं, हा शब्द रूपकरूपानें आला व त्याचा साधा शब्द होऊन बसला. आपण पुष्कळदां ' हाडकणें ' हा शब्द ' वाळणें ' या अर्थानें वापरतों. पण मूळचें तें रूपक आहे. वाळून वाळून फक्त हाडें उरणें म्हणजे ' हाडकणें '; पण आतां हें त्यांतलें काव्य नाहींसें होऊन त्याला अगदीं साध्या शब्दाच्या अर्थाचें रूप आलें आहे. यानेंच भाषा वाढत जाते. अमुक कारणासाठीं ' हरताळ ' पडला असें आपण हजारदां वाचतों व त्याचा लौकिक अर्थ आतां कायम झाला असल्यामुळें या शब्दांत पूर्वीं रूपकाचा काव्यगुण होता, ही माणसांची ओळखहि बुजत चालली आहे, माणसें पूर्वीं पोथ्या लिहीत असत. लिहितांना लिहून झालेलें एखादें अक्षर नको असलें तर त्याच्यावर हरताळीचें चूर्ण फांसण्याची चाल असे. तें फासलें म्हणजे जरी तें अक्षर थोडेंबहुत दिसत असलें तरी तें मोडलेलें आहे असें समजावयाचें, असा रूढ संकेत होता. त्याप्रमाणेंच अमुक एका आपत्तीमुळें जर व्यवहार बंद ठेवावयाचा असला, तर दुकानें बंद ठेवून किंवा थोडीं किलकिलीं ठेवून आपण तो बंद ठेवीत आहों व अशा रीतीनें आपला उद्वेग व्यक्त करीत आहों या अर्थीं प्रथम कोणीं हौशी रसिकानें तो शब्द योजला. पण पुढें पुढें त्यांतील काव्यगुण लोप पावून हरताळ पाडणें म्हणजे व्यवहार बंद पाडणें असा रूढार्थ झाला व तो एक नवा शब्दच बनून राहिला. नगराकडे धाब्याचीं घरें असतात. वीज पडणें किंवा दुसरा कसला तरी उत्पात होणें यानें जर वस्ती हादरली, तर हें घरावरचें धाबें

अर्थातच दणकणार. हा प्रकार लक्षांत ठेवणाऱ्या कोणीं रसिकानें आपत्तीमुळें किंवा भयामुळें नखशिखांत घाबरून गेलेल्या माणसाचें वर्णन करतांना काव्यगुणानें म्हटलें कीं, त्याचें धाबें दणाणून गेलें. त्याची ती कविता पाहून तेव्हांचे श्रोते खरोखरच संतुष्ट झाले असतील. त्या काव्यगुणामुळेंच तो शब्द लोकप्रिय बनला व लोकप्रियतेमुळें त्याचा वारंवार उपयोग झाला. तो तसा झाल्यामुळें शब्दांतील काव्यगुण मावळला आणि त्याला " फार भिणें, घाबरगुंडी उडणें " असलें प्राकृत रूप प्राप्त झालें. पण एक शब्द मात्र भाषेमध्यें नवीन आला. अशा प्रकारें रूपकत्व गमावून बसून साध्या अर्थानेंच भाषेंत कायम होऊन बसलेल्या शब्दांची संख्या भाषेंत अफाट आहे; म्हणूनच भाषेला Fossil Poetry असें म्हटलेलें आहे.

आतां अशा प्रकारें स्वभाषेंत रूपकें प्रविष्ट करणें व शेवटीं त्यांना साधें शब्द होऊन बसण्याची संधि देणें हें काम, ती भाषा बनवीत जाणारे जे कोणी असतील, त्यांच्या हातीं असतें. त्यांच्या स्वतःच्या जीवितांत जीं सुंदर रूपकें त्यांना अर्थव्यक्तीसाठीं योजावींशीं वाटतात तीं ते योजितात. त्यांना तरी याहून जास्त काय करतां येणार ? जीविताचीं जीं अंगें त्यांना परिचित तींच ते उचलणार व योजणार. एखादी गोष्ट शिकविणें, थोडया उरस्फोडीनें ती विद्यार्थ्याला पटविणें या अर्थानें 'संथा देणें' हा शब्दप्रयोग पूर्वींची शास्त्रीवैदिक मंडळी करीत. आधुनिक सुशिक्षितांनीं हाच शब्द उचलला, व 'मॅक्डोनल्ड यांनीं अमुक गृहस्थापाशीं सामाजिक ज्ञानाची संथा घेतली, पण त्यांना खरें मर्म उमगलें नाहीं' असा शब्दप्रयोग केला. सध्यां जे मध्यमवयीन ब्राह्मण आहेत त्यांना हा शब्द अडणार नाहीं, पण आणखी पिढी दीड पिढीनंतर या

शब्दाचा अर्थ कोशांतच पाहावा लागेल. निबंधमाला संपविण्याच्या वेळेस विष्णुशास्त्र्यांनीं म्हटलें आहे, "आम्ही आतां अवभृत-स्नानास मोकळे होत आहों." शास्त्रीबोवांच्या वेळच्या वाचकांस या रूपकाचा अर्थ समजत असेल, पण "यज्ञ संपवून यजमान हा कृतकृत्य होत्साता नदीवर स्नानाकरितां जाई, त्या जाण्याला अवभृतस्नानास मोकळें होणें असें नांव होतें," असा अर्थ नवीनास स्पष्ट करून सांगावयास हवा. "विनाकारण हें सव्यापसव्य कोण करीत बसतो!" यांतील रूपक श्राद्धपक्षाची चाल जों जों कमी होत जाईल तों तों दुर्बोध होत जाईल, हें स्पष्ट आहे. पण वरील सर्व शब्दप्रयोगांचे व्यावहारिक अर्थ मात्र भाषेंत कायम राहिलेले आहेत. हे नवे शब्द मुळांत रूपकरूप होते; व लेखक हे ज्या पेशांत वागणारे होते त्या पेशांतून त्यांनीं तीं रूपकें उचलिलीं होतीं. आतां जर मराठी भाषेंत शब्दांचा भरणा व्हावयास हवा असेल, तर निरनिराळ्या पेशांतील, धंद्यांतील रूपकें भाषेंत प्रविष्ट व्हावयास हवीं; व तीं प्रविष्ट करून देण्यास त्या त्या पेशांतील, धंद्यांतील माणसें वाङ्मयलेखनाच्या प्रांगणांत उतरावयास हवींत; असें झालें म्हणजे शब्दांची भर भराभर होत जाईल. याचा अर्थ असा कीं, ज्यांना विद्येचा संस्कार झालेला नाहीं अशा ज्या शेंकडों धंदेवाल्या जाती आहेत, त्यांच्यांतील माणसें शिक्षित होऊन आपलें मनोगत व्यक्त करण्यासाठीं स्वतःला परिचित असलेल्या रूपकांचा उपयोग करण्याची बुद्धि त्यांना उत्पन्न व्हावयास हवी. तेली लेखक आपलीं रूपकें घेऊन भाषेंत येईल; तसाच न्हावी तसाच कोळी, तसाच साळी. हे सगळे लोक आपल्या रूपकांच्या भांडवलानिशीं एकदां लेखनव्यवसायांत उतरले म्हणजे मराठी भाषेचें वैभव गडगंज भरत जाईल.

सध्यांसुद्धां प्रत्यक्ष त्या त्या समाजांतील नसूनहि थोड्या ओळखदेखीमुळें व व्यवहारामुळें आपण कांहीं कांहीं रूपकें योजून, त्यांना सामान्य शब्दांचा गौरवहि प्राप्त करून दिला आहे. आपण " इंगा फिरणें ' असा शब्दप्रयोग करतों. पण हा प्रयोग चांभार-वाड्यांतील आहे. आपल्या लेखणींतून उतरत असल्यामुळें तो पावन झाला आहे असें वाटतें, इतकेंच काय तें. कातडें मूळचें खडबडीत व अगदीं आडमुठें असें असतें. तें एका बाजूनें पायांत धरून व दुसऱ्या बाजूनें हातांत धरून आपल्या हातांतील लोखंडाचा इंगा चांभार त्याच्यावरून जोरानें फिरवितो. त्यानें असें एकदोनदां केलें म्हणजे तें आडमुठें कातडें अंगावरून वारें गेल्याप्रमाणें अगदीं ढिलें पडतें. हा अर्थ ध्यानांत आला म्हणजे " मोठे खाडखाड बोलत आहेत पण एकदां साहेबापुढल्या नोकरीचा इंगा फिरला म्हणजे नरम होतील. " या टीकावाक्यांतील रूपकाची खरी खुमारी ध्यानांत येईल. " पण, काकासाहेब ठिय्या देऊन बसले होते ते हलेचनात. " या वाक्यांतील ' ठिय्या ' शब्द आपण सुतारखान्यांतून उचललेला आहे. पायाखालीं धरून जर एकादी फळी रंधावयाची असली, तर ती पुढें निसटूं नये म्हणून पुष्टिपत्ररूपी जें खालीं मोठें लाकूड असतें, त्याला एक आडवी पट्टी सुतारलोक ठोकतात, व तिच्या अटणीला ही रंधावयाची पट्टी लावतात. ही जी लहानशी आडवी ठोकलेली पट्टी असते तिला ' ठिय्या ' असें म्हणतात. ती जशी हालत नाहीं तसे काकासाहेबहि हालत नाहींत, असें हें मूळचें रूपक होतें. अशा प्रकारचे अनेक शब्द आपण धंदेवाइकांकडून उचलले आहेत, हें खरें; पण खुद्द धंदेवालेच जेव्हां वाङ्मयांत उतरतील तेव्हां ही रूपकांची भरती झपाट्यानें होईल.

याच विचाराची खुलावट आजहि कल्पनेनें करतां येण्यासारखी आहे. एखादा गवंडी जर लेखनव्यवसायांत पडला व त्याला " विचाराची Level पुरेशी वर गेलेली नाहीं, " असें म्हणावयाचें असलें तर कदाचित् तो म्हणेल कीं, " विचाराची कमान जितकी उंच व्हावयास हवी तितकी झालेली नाहीं. " त्यानें एकावर एक तर्कसिद्ध अनुमानें करून जर मोठेंच पक्षपात-साहित्य दाखविलें असलें तर कदाचित् तो म्हणेल कीं, " ही एवढी परंपरा मीं उभी केली आहे. सज्जनांनीं खुशाल ओळंबा लावून पाहावा व कोठें पक्षपात दिसतो का सांगावें. " गांवांत कांहीं शिष्ट माणसें पुढारी म्हणून मिरवतात. पण चळवळीची सगळी दगदग मागें राहून काम करणाऱ्या कांहीं व्यक्तींनाच पडते व वास्तविक तेच पुढारी असतात. हा विचार आपल्या पेशाला अनुसरून व रूपकानें बोलतांना तो गवंडी असा वर्णील कीं, " अमुक अमुक गृहस्थ हे दर्शनी पुढारी आहेत. पण तमुक गृहस्थ हे बापडे डुबाव पुढारी, म्हणजे भिंतींत लपलेल्या खांबासारखे आहेत. " परीट वाङ्मयांत आला व " कितीहि बोलले तरी आपल्या तोंडाला हा सुरकुतीहि पडूं देत नाहीं. " असें वर्णन त्याला करावयाचें असलें तर तो लिहील कीं, लोक इतके अद्वातद्वा बोलले पण त्यानें तोंडावरची इस्त्री बिलकूल बिघडूं दिली नाहीं. तेली सार्वजनिक कामांत पडला व प्रयत्नपरंपरेपैकीं एकादा प्रयत्न जर नीट साधला नाहीं तर तो म्हणेल कीं, " हा घाणा नीट निघाला नाहीं. " वक्त्याचें वक्तृत्व श्रोत्यांच्या भावनेसह वाढत वाढत जाऊन त्याचा कळस झाला व श्रोत्यांनीं ' वाहवा ' म्हणून टाळी दिली व या प्रसंगाचें वर्णन करण्याचें काम एखाद्या गवयाकडे असलें; तर तो लिहील कीं, " वक्ता व श्रोते हे समेवर आले. " कोष्टी आपलें बिलावरचें

भाषण संपवितांना म्हणेल कीं, " सभ्य गृहस्थहो, माझें हें सांगणें आपल्याला पसंत पडतें का पाहा." परदेशांतून नाना प्रकारचीं तत्त्वें इकडे आणावीं पण आपल्याला कोणतें मानवतें तें पत्करावें व बाकीचें टाकावें," हा विचार व्यक्त करतांना प्रस्तुत कोष्टी लेखक म्हणेल कीं, " जांगड माल वाटेल तितका आणावा, पसंत पडेल तो ठेवून घेऊं, बाकीचा परत पाठवूं." " ज्याच्यावर हल्ला करावयाचा त्याच्यावर नेम धरून झांप घेतली पाहिजे." हा विचार व्यक्त करतांना एखादा शिकारी वावदूक म्हणेल, " किरण साधून उडी टाकली पाहिजे." " आपण आपले साधे गडी आहों " असें शेतकरी वक्त्यास सांगावयाचें असलें तर तो म्हणेल, " माझें बोलणें अगदीं रायवळ आहे, यांत गांवरानपणा म्हणजे तिखटपणा कसलाहि नाहीं." तसेंच " चळवळ अगदीं यशस्वी होण्याची वेळ आली पण सरकार कोपल्यामुळें तिची पिछेहाट झाली " हा विचार शेतकरी वक्ता असें सांगेल कीं, " चळवळ अगदीं पोटऱ्याला आली होती; पण सरकारी अवकृपेचा कडाका पडला व ती करपून गेली." आपल्या विद्यार्थ्यांना एखाद्या विषयाची एकदां समजूत पाडिली, ती अपुरी म्हणून पुन्हा एकदां देऊन पाहिली, पण तीहि अपुरी पडते असें दिसतांच, शिक्षक स्वत: मूळचा जर रंगारी असला तर आपल्याशीं उद्गार काढील कीं, " तिसरा हात द्यावयास पाहिजे !"

वरील उदाहरणें सुद्धां मी केवळ अनुमानानें बसाविलीं आहेत. मला त्या त्या धंद्याची तपशीलवार माहिती नाहीं. अर्थात् त्या त्या धंद्यांतील लोक जेव्हां लेखनाचें व वक्तृत्वाचें कसब हस्तगत करतील, तेव्हां त्यांनीं खंत न मानतां आपापलीं परिचित रूपकें लेखनांत प्रविष्ट करावीं. त्यांचा पुष्कळदां उपयोग झाला म्हणजे

तीं सर्वांच्या परिचयाचीं होतील व भाषेंत साधे शब्द म्हणून नव्या अर्थानें वावरूं लागतील. अशा तऱ्हेनें मराठींतील शब्दांचा भरणा झपाट्यानें वाढेल. याचा अर्थ असा कीं, आपल्या समाजांत शिक्षण फैलावलें पाहिजे व लिहिणें, बोलणें हे व्यवसाय जे एकाच वर्गाकडे आहेत ते सर्व वर्गांत फैलावलें पाहिजेत. तसें झालें म्हणजे सर्व समाजांच्या निरनिराळ्या वासना, त्यांचे रागलोभ, त्यांच्या आकांक्षा, चित्रविचित्र रूपकांचीं रूपें धारण करून समाजाच्या पुढें येतील. एकीकडे सर्व समाजांचें मनोगत व्यक्त होण्याचें कार्य होईल व दुसरीकडे शब्दकोश पुष्ट होत जाईल. वर दिलेल्या विवेचनावरून भाषासमृद्धीकडे सामाजिक दृष्टीनें पाहाणें म्हणजे काय याचा पुरेसा बोध होईल, अशी नम्र आशा आहे.

प्रश्नः—भाषेमध्यें नवीन नवीन शब्दांची भर कशामुळें पडते ? रूपकांतील काव्य कशामुळें नष्ट होतें ? मराठी भाषेंतील कोणत्या रूपकांचें काव्य आज नष्ट झालें आहे ? निरनिराळ्या धंद्यांतील लोकांना आपल्या भाषेची सेवा कोणत्या प्रकारांनीं करितां येईल ?

अभ्यासः—( १ ) अवभृतस्नान, सव्यापसव्य, ठिय्या, डुगाव, हरताळ इ. शब्दांच्या अर्थांची स्पष्ट फोड करा. ( २ ) तुम्हांस माहीत असलेले व रूपकावर बसविलेले कांहीं वाक्प्रचार लिहा. ( ३ ) क्रिकेट व फुटबॉल या खेळांतील कांहीं प्रसंगावरून व त्यांतील शब्दांच्या आधारें तुम्ही स्वतः कांहीं रूपकात्मक वाक्यें तयार करा.

पुरवणीवाचनः—कै० वि. वा. भिडे व कै० वा. गो. आपटे यांनीं 'वाक्प्रचार व म्हणी' या विषयावर लिहिलेलीं पुस्तकें वाचा.

---

# २१. दोन विभूति.

ओळखः—कविपरिचय धडा पंधरा पाहा.

विषयः—सोबतचें सुनीत श्री. माधव ज्यूलियन यांच्या 'तुटलेले दुवे' या प्रसिद्ध काव्यांतून घेतलेलें आहे. महात्मा गांधी आणि रवींद्रनाथ ठाकूर यांच्या जीवित-कार्याचें यथोचित वर्णन कवीनें मोजक्या शब्दांत या सुनीतांत भावनोत्कट पद्धतीनें केलें आहे.

मी पाहूनि विभूति दोन नमलों त्यांच्यापुढें तत्क्षणीं—
येती थोर अजूनिही सुत असे या हिन्दभूच्या कुशीं।
दोघेही गुरु शुक्र, मित्रच म्हणा, दोघे विचाराग्रणी,
तो त्यागी कृश एक आणि दुसरा हा राजयोगी ऋषी.
दाढीदार सतेज शान्तवदनीं गांभीर्य हें प्रेमळ,
अङ्गीं नाजुक सैल रेशमि झगा, टोपी शिरीं मखमली,
त्याची क्षीण तपाळ मूर्ति, किति तद्‌हास्यीं महन्मङ्गल !
नेसे तो निजहात कातिव-सुती कौपीन जाडी भली.
हा गीताञ्जलिनें दिगन्त पसरी हिन्दी मनोवैभव,
अिच्छी पश्चिमपूर्वयोग, निवडूं पाहे खरी संस्कृती.
तो सत्याग्रह शूर वीर पडला बन्दींत सत्यास्तव,
अध्यापी नव राज्यनीति, पटवी स्वाङ्गें करूनी कृती.
हा ठाकूर रवींद्रनाथ मिरवे साहित्य-सम्राट्, पण
गान्धी मोहनदास पाहि वळवूं दारिद्र्य-नारायण.

—माधव-ज्यूलियन.

**सुनीतः**—हा वाङ्मयप्रकार इंग्रजींतून मराठींत आला आहे. चौदा ओळींच्या भावगीतांत आठ व सहा किंवा बारा व दोन एवढ्या चरणांचे दोन विभाग पाडून, पहिल्यांत भावदिग्दर्शन उत्कटतेनें करून दुसऱ्यांत त्याला चमत्कारिक रीतीनें कलाटणी देऊन रसिकांच्या मनांत कुतूहल आणि आनंद एकाच वेळीं निर्माण करणें हा सुनीताचा हेतु होय. प्रस्तुतच्या सुनीतांत महात्मा गांधी व रवींद्रनाथ ठाकूर यांच्या स्वरूपांचें पहिल्या तीन श्लोकांत वर्णन करून, शेवटच्या दोन ओळींत त्यांच्यांतील विरोध कवीनें दाखविला आहे. मात्र बाह्यतः वरील दोन विभूतींत भेद दिसत असला, तरी दोघेहि एकाच ध्येयानें कसें कार्य करीत आहेत, हें साम्य उभें राहातेंच.

**अभ्यासः**—महात्मा गांधी व रवींद्रनाथ ठाकूर यांचें चरित्र थोडक्यांत लिहा.

**पुरवणीवाचनः**—कविवर्य ठाकूर यांनीं लिहिलेलें आपल्या जीवनाचें स्मृतिचित्र आणि महात्मा गांधी यांनीं लिहिलेले सत्याचे प्रयोग ही मराठींत भाषांतरित झालेलीं पुस्तकें वाचा.

---

## २२. डॉ. रवींद्रनाथ ठाकूर.

**ओळख**—श्री. द्वारकानाथ गोविंद वैद्य, (जन्म इ. स. १८७७ मृत्यु १९४०) हे मराठी भाषेंतील एक प्रख्यात लेखक होऊन गेले. मुंबईंतील सुबोध-पत्रिका या नियतकालिकेशीं त्यांचा संबंध इ. स. १८९७ पासून होता. गेल्या चाळीस वर्षांच्या अवधींत त्यांनीं अनेक स्फुट निबंधांच्या द्वारें आपले सात्त्विक विचार समाजांत खेळत ठेविले होते. 'संसार आणि धर्मसाधन' या पुस्तकांत त्यांचे निबंध समाविष्ट झाले आहेत. त्यांनीं सर नारायणराव चंदावरकर यांचें विस्तृत चरित्र लिहून मराठींतील

चरित्रवाङ्मयांत मोलाची भर घातली आहे. शुचित्व आणि सुबोधता हेच त्यांच्या भाषाशैलीचे प्रभावी गुण होत.

विषयः—हिंदुस्थानांतील एक थोर विभूति म्हणून डॉ. रवींद्रनाथ ठाकुर यांची कीर्ति सर्वत्र पसरली आहे. त्यांच्या थोर यशाचें रहस्य कशांत सांठलेलें आहे याची थोडीशी ओळख हा धडा वाचून तुम्हांस होईल. चरित्रीभूत व्यक्तीशीं लेखक किती समरस झाले आहेत!

डॉ. रवींद्रनाथांच्या चरित्राचें विशेष आस्थेनें जे अध्ययन करतील, त्यांचें जीवनरहस्य ध्यानांत आणण्याचा प्रयत्न करितील, त्यांच्या व्याख्यानांच्या वेळीं धर्मभाव, धर्म, आत्म्याचें सुख-दुःख, धर्माचरण, धर्माविषयीं आपलें कर्तव्य इत्यादि विषय निघाले असतांना, त्यांचा दिसून येणारा उत्साह, त्यांचें गांभीर्य, त्यांचा सतेज चेहरा व त्यांचा मधून मधून कंपित होणारा आवाज हीं जे कोणी आपल्या स्मृतिपटलावर आणितील, त्यांस त्यांच्या सर्व जीवनावर धर्माचा कसा परिणाम झालेला आहे, तें निराळें सांगावयास नको.



ज्या वेळीं रवींद्रनाथ आजच्याप्रमाणें प्रसिद्धीस आलेले नव्हते, बंगाली भाषेच्या पलीकडे त्यांच्या गीतांजलीचा सुगंध पसरलेला नव्हता, इंग्रजी भाषेमध्यें त्यांनीं एकहि लेख लिहिला नव्हता, तथापि बोलपूर येथील शांतिनिकेतन संस्थेची स्थापना करून,

आपलीं सर्व ध्येयें तेथें अनुभवून पाहाण्याचा त्यांनीं निश्चय केला होता, त्या वेळीं प्रस्तुत लेखकाचा व रवींद्रनाथांचा अल्प काळ समागम झालेला आहे. १९११ सालीं एके दिवशीं त्यांचे परमपूज्य तीर्थरूप महर्षी देवेंद्रनाथ ह्यांनीं बोलपूर येथें स्थापिलेल्या स्फटिकाच्या ब्राह्ममंदिरामध्यें सूर्यास्तानंतर रवींद्रनाथ आपल्या आसनावर विराजमान झाले. त्यांच्या मागोमाग त्यांचे सर्व विद्यार्थी येऊन आपापल्या स्थानीं बसले. बाहेर शुभ्र चांदणें पडलें होतें. सर्वत्र गंभीर शांतीचें साम्राज्य पसरलें होतें.

अशा आल्हादकारक व शांत समयीं मंदिरामध्यें चंद्रप्रकाशावांचून अन्य प्रकाश येऊं न देतां रवींद्रनाथांनीं मातृभाषेंत आपल्या प्रवचनास आरंभ केला. अहाहा ! काय तें प्रवचन ! त्या प्रवचनाच्या वेळचा तो मंजुळ ध्वनि, तें गांभीर्य, ती सतेज दृष्टि, प्रसंगीं मुखांतून निघणारा तो इंगळयासारखा एखादा शब्द व ती एकतानता अनुभवून रवींद्रनाथांच्या जीवनाचें हे रहस्य आहे, रवींद्रनाथांच्या काव्याच्या माधुर्याचें उगमस्थान त्यांचा धर्मावरील देवावरील विश्वास हें आहे, त्यांचा जागृत देशाभिमान, त्यांची आर्यसंस्कृतीविषयींची परम आदराची वृत्ति, त्यांची बालकांच्या कल्याणाची उत्कटेच्छा, त्यांचें कोमल हृदय, त्यांनीं स्वदेशाची बजाविलेली सेवा व त्यांचा स्वार्थत्याग, ह्या सर्वांचें रहस्य, त्यांची परमेश्वरावरील उच्च श्रद्धा ही होय, हें आमच्या लक्षांत आलें व पुढें संभाषणप्रसंगीं ह्याच विश्वास दृढ झाला. सारांश, अशा प्रकारें ज्यांच्या सर्व सामर्थ्याचें व कर्तृत्वाचें उगमस्थान धर्म परमेश्वरावरील दृढनिष्ठा व भक्ति ह्यांत आहे, अशा त्यांचा सर्व बाबतींत हिंदीजनांस जो संदेश आहे त्याचें साधारण स्वरूप वाचकांस सादर करण्याचा आम्हीं विचार केला आहे. पण तसें

करूं लागण्यापूर्वी रवींद्रनाथांची थोडी पूर्वपीठिका पाहाणें अयोग्य होणार नाहीं. रवींद्रनाथ हे असाधारण पुरुष आहेत व ते एकांगी नाहींत, हें सर्वमान्य आहे. राजकीय बाबतींत ते तिखट आहेत हें लॉर्ड्स्च्या सभेंत जनरल डायरसंबंधानें १९२० च्या जुलै महिन्यांत जो वाद झाला, त्यावेळीं लंडन येथें त्यांनीं काढलेल्या उद्गारावरून अगदीं नव्यानें सर्वांच्या लक्षांत येऊन चुकलें आहे. रवींद्रनाथांचे तीर्थरूप देवेंद्रनाथ हे अलौकिक पुरुष होऊन गेले. लोकांनीं त्यांच्या अंगचे दया, क्षमा, शांति, धर्मादिशास्त्रांचें ज्ञान आणि जिकडे तिकडे धर्मबुद्धि जागृत व्हावी याबद्दलची उत्कंठा इत्यादि गुण पाहून व त्यांची प्रचीति घेऊनच त्यांना महर्षि ही पदवी दिली होती. त्यांच्या चारित्र्याचा रवींद्रनाथांवर अतिशय परिणाम झालेला आहे. गीतांजलि हें त्यांच्या मननशीलतेचें फळ आहे व मननशीलता ह्या गुणाचा वारसा महर्षींकडून त्यांस मिळाला आहे. विवाहानंतर आपल्या खेडेगावीं जाऊन तेथील सर्व मालमत्तेची व्यवस्था पाहाण्याची वाडिलांची झालेली आज्ञा त्यांस प्रथम रुचली नाहीं; परंतु ‘ गीतांजलि, ’ ‘ साधना ’ यांसारखे ग्रंथ, त्या खेडेगांवीं राहिल्यामुळें त्यांच्या ठिकाणीं वाढलेली जी मननशीलता व संसारांतील संकटें सहन करण्याचें आलेलें सामर्थ्य, ह्यांचीं फळें होत. त्याचप्रमाणें बाबू राजनारायण बोस ह्यांचा जाज्वल्य देशाभिमान, त्यांची प्रखर सत्यनिष्ठा, त्यांची स्वावलंबनपरता, स्वदेशीसंबंधाचा त्यांचा सक्रिय अभिमान, आपले हक्क व आपलीं कर्तव्यें ह्यांविषयींची त्यांची जागृति, आर्यसंस्कृति, आर्यज्ञान, धर्माचें उदात्त स्वरूप ह्यांविषयींचे त्यांचे विचार, त्यांचा तिखटपणा, अन्याय, अधर्म, अनीति व अनौदार्य ह्यांसंबंधानें त्यांचा तिरस्कार ह्या सर्व गुणांचा लहानपणींच तरुण

रवींद्रावर अत्यंत इष्ट असा परिणाम झालेला होता. तशा तालमींत रवींद्रनाथ वाढले. बहुतेक शिक्षण घरीं व नंतर विलायतेंत झालेलें. मननशीलतेमुळें सृष्टिसौंदर्याचें वेड जणूं लागल्यासारखें झालें व ते काव्य रचूं लागले. आज स्वतः रवींद्रनाथ म्हणताहेत कीं, " माझ्या लहानपणच्या कविता अगदींच पोरकट आहेत, त्यांची एकपरी मला आतां लाज वाटते ! काय तो उद्दामपणा, काय तो ताठा ! काय ती आत्मश्लाघा ! सर्वच चमत्कारिक." हें सर्व जरी खरें मानिलें तरी त्यावेळीं काव्यरचनेकडे त्यांचें लक्ष लागलें म्हणूनच हिंदुस्थानला व सगळ्या जगाला रवींद्रनाथ लाभले. पुढें पुढें त्यांचें काव्य अत्यंत मनोहर, मधुर व प्रेमळ झालें. सर्व बंगाल्यांत त्यांचीं गीतें आबालवृद्धांच्या तोंडीं बसलीं आणि जेव्हां त्यांनीं स्वतः आपल्या गीतांजलींतील कांहीं निवडक वेच्यांचें भाषांतर तयार केलें व त्यांस नोबेल प्राईझ मिळालें, तेव्हां त्यांची कीर्ति जगभर पसरली. सर्व महत्त्वाच्या भाषांत गीतांजलीचीं रूपांतरें झालीं व ह्या गीतांजलीच्या द्वारें रवींद्रनाथ जगद्विख्यात झाले. रवींद्रनाथांनीं स्वतः आपल्या गीतांजलीचें सरळ भाषांतर केलें नसतें, हें भाषांतर विलायतेंत प्रसिद्ध झालें नसतें, नोबेल प्राईझ त्यांना मिळालें नसतें व त्यांचे लेख व व्याख्यानें इंग्रजीमध्यें प्रसिद्ध झालीं नसतीं, तर रवींद्रनाथांची ओळख सगळ्या हिंदुस्थानाला तरी झाली असती किंवा नाहीं याची आम्हांला शंका आहे ! बंगाल्याबाहेर रवींद्रनाथाविषयीं जो आदर, जो अभिमान व जो प्रेमभाव अनुभवास येत आहे त्याचें कारण इंग्रजीमध्यें त्यांचे अनेक लेख व ग्रंथ जनतेला वाचावयास मिळूं लागले हें होय, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. रवींद्रनाथांविषयीं आदरभाव वाढावयास आणखी एक सबळ कारण झालें आहे. नोबेलप्राइझ मिळे-

पर्यंत शांतिनिकेतन शाळेसाठीं दरसाल ते हजारों रुपये स्वतःचे खर्चीत आले. पुढें त्यांस १९१३ सालीं एक लक्ष वीस हजार रुपये किंमतीचें हें बक्षीस मिळालें, पण एवढा द्रव्यनिधिहि त्यांनीं शांतिनिकेतनाला देऊन टाकला! एवढेंच नव्हे तर त्यावर आपला स्वतःचा कांहीं हक्क आहे, हा विचारहि त्यांस शिवला नाहीं व आजहि ते शांतिनिकेतनासाठीं पदरचे हजारों रुपये खर्च करीत असतात. पूर्ण विचार करून शिक्षणविषयक जें ध्येय त्यांनीं ठरविलें आहे, त्याच्यासाठींच अशा प्रकारचा त्याग मोठ्या आनंदानें करीत असणाऱ्या थोर व्यक्तीसंबंधानें दिवसेंदिवस आदरभाव जर वाढत गेला, तर त्यांत आश्चर्य तें काय? दुसरें असें आहे कीं, रवींद्रनाथ केवळ कवीच आहेत असें नसून, ते इंग्रजी भाषेंत उत्तम व्याख्याते व लेखक आहेत. काव्याच्या द्वारें दिलेला संदेश सर्वांस कधीं कधीं पोहोंचत नाहीं, सर्वांस तो पटत नाहीं, सर्वांस त्यांतील मर्म कळतेंच असें नाहीं; परंतु उत्तम लेखांच्या अगर व्याख्यानांच्या द्वारें मिळणारा संदेश त्वरित सर्वांस सहज लाभतो व सहज कळतोहि. उत्तम काव्याच्या द्वारें धर्मसंदेश उत्तम पटतो. परंतु राजकीय चळवळीचा सांगोपांग विचार, राजकीय हक्कांचा इतिहास, निरनिराळ्या देशांतील रीतीभाती, चळवळी, लोकांचे गुण, कर्तृत्व वगैरेसंबंधानें आलेले अनुभव गद्याच्या द्वारेंच प्रथम लोकांपुढें आले पाहिजेत. हें रवींद्रनाथांनीं केलें आहे व अनेक देश पाहून, सर्व देशांचा अनुभव घेऊन, त्यांनीं जो संदेश दिला आहे, तो वाचकांच्या कानांवर त्यांच्या लेखांच्या द्वारेंच घालण्याचा आमचा विचार आहे.

रवींद्रनाथ जगविख्यात कवि आहेत; त्यांच्या काव्याचें रहस्य कळावें म्हणून मोठमोठ्या लोकांनीं प्रयत्न केलेले आहेत; ते सर्वत्र

अत्यंत प्रिय आहेत; मोठमोठ्या अधिकाऱ्यांमध्येंहि त्यांच्याविषयीं आदर वसत आहे; असें जरी आहे, तरी लोकाराधनाचें वेड त्यांना लागलेलें नाहीं. लॉर्डांच्या सभेंत पंजाब प्रकरणावर वाद होऊन जेव्हां भलताच निकाल लागला व कॉमन्स सभेच्या ठरावासहि कमीपणा आला, त्या वेळीं विलायतेंत असतांना रवींद्रनाथांनीं तो उलटा न्याय झालेला पाहिला. ह्या पंजाब प्रकरणामुळें त्यांनीं आपल्या 'सर' कीचा त्याग केला होता व त्यांचें कोमल मन अत्यंत व्यथित झालेलें असतां जेव्हां निकाल झाला तेव्हां त्यांनीं लंडन येथें स्पष्ट उद्गार काढले: —

"मेहेरबानी नको, राज्यकर्त्यांच्या मेहेरबानीवर विसंबून वागण्यांत नित्य किती मानहानि होते व शेवटीं स्वतः कसें तोंडघशीं पडावें लागतें, त्याची उत्तम प्रतीति आतां येत आहे. सामाजिक, आर्थिक आणि राजकीय जीवनाच्या भक्कम पायावर संघटन करून व अंतस्थ दोष काढून टाकून आपणच आपला सध्यांच्या हीन दशेंतून उद्धार करून घेण्याची वेळ आली आहे. देशकार्यासाठीं ज्या ज्या आपत्ति ओढवतील त्या त्या सोसण्याची तयारी दाखवा. ऐक्याचा सदैव पुरस्कार करा. सांप्रत डोळ्यांत पडलेल्या चरचरीत अंजनापासून जर योग्य बोध घेतला तर वाईटांतून चांगल्याची निष्पत्ति होते, ह्या न्यायानें सांपत्तिक उत्कर्ष, आध्यात्मिक शुद्धि व राष्ट्रीय स्वाभिमान ह्या गुणांनीं युक्त असलेल्या नवयुगाचा मार्ग स्पष्ट दिसूं लागेल. परावलंबन व याचना ह्या दोन दोषांना झुगारून देऊन आणि निष्फळ क्रोध व सूडाची भावना ह्यांपासून आपल्या अध्यात्मिक बळाचें संरक्षण करून आपण आपला देशकार्याचा मार्ग चोखाळीत राहिल्यास खरी श्रेष्ठता आपल्याला हस्तगत करतां येईल."

**प्रश्नः**—रवींद्रनाथांचें जीवन आणि त्यांनीं लिहिलेलीं पुस्तकें यांच्यांत कोणतें साम्य आहे? रवींद्रनाथांनीं आपल्या लहानपणच्या काव्यासंबंधीं काय उद्गार काढिले आहेत?

**अभ्यासः**—'नोबल प्राइझ,' 'शांतिनिकेतन' यांच्याविषयींची थोडक्यांत माहिती लिहा.

**पुरवणीवाचनः**—कै. गो. वा. कानिटकर यांनीं गीतांजलीचें केलेलें मराठी भाषांतर आणि श्री. कानडे यांनीं त्यांचें लिहिलेलें समग्र चरित्र मिळवा आणि वाचा.

---

# २३. 'बाळ या नारळाला……'

**ओळखः**—नाट्यछटाकार दिवाकर यांचें संपूर्ण नांव शंकर काशिनाथ गर्गे (जन्म इ. स. १८८९, मृत्यु इ. स. १९३१). इंग्रजी



नाटकांतील आत्मगत भाषणाच्या धर्तीवर आणि ब्राउनिंग कवीच्या नाट्यगीतांतील स्वगतावरून त्यांनीं मराठींत 'नाट्यछटा' हा वाङ्मयप्रकार आणिला. सामाजिक रूढ कल्पना किंवा मानवी स्वभावांतील परस्परविरोधी छटा त्यांच्यावर उपहासगर्भ टीका त्यांच्या नाट्यछटांतून आढळतात. दिवाकर यांचा इंग्रजी ग्रंथकारांच्या विशेषतः शेक्सपिअर व ब्राउनिंग यांच्या-वाङ्मयाचा विशेष अभ्यास होता. केशवसुतांच्या काव्यावरहि त्यांचें विशेष प्रेम होतें. नू. म. विद्यालयांत मोठया

मानानें शिक्षकाचें काम करीत असतां ते इ. स. १९३१ सालीं कालवश झाले. प्रो. पोतदार यांनीं त्यांच्यासंबंधीं खालील उद्गार काढिले आहेत–
"नाट्यछटेचा आद्यप्रवर्तक, आदर्श शिक्षक, नव्यायुगाच्या नव्या पाइकांचे गुरु जे केशवसुत त्यांचा निःसीम अभिमानी व सक्रिय उपासक आणि तुकोबांनीं म्हटल्याप्रमाणें अंगाला मळ लागूं न देतां 'जन्मा आलियाचें फळ' मिळविणारा एक प्रेमळ, आनंदी आणि सच्चा सज्जन हें त्यांचें थोर यश काळालाहि हिरावून घेतां येणार नाहीं."

विषय:—सोबतची नाट्यछटा रूपकावर बसविली आहे. वेणूच्या घराण्यांत ज्याप्रमाणें सोन्यानें मढविलेल्या नारळाची—मग त्यांत अर्थ असो किंवा नसो-पूजा करण्याची परंपरा सुरू होती, त्याचप्रमाणें कित्येक रूढ कल्पना आणि भ्रामक समजुती यांच्यावर विश्वास ठेवणारे, अंध श्रद्धेनें व्यापलेले लोक समाजांत असतात. नवें तत्त्व एखाद्या कालीं उपकारक ठरतें, तेंच पुढें कालाच्या परिस्थितीच्या ओघांत जुनें होतें व हें न ओळखणाऱ्या परंपराप्रिय समाजावर सोबतच्या नाट्यछटेंत टीका आली आहे. साध्या प्रसंगाची निवड करून लेखकानें त्यांत केवढा आशय आणिला आहे तो पहा.

"......बाळ वेणूबाई ! असें काय बरें वेड्यासारखं करावं ? हें बघ, हा नारळ कीं नाहीं, फोडण्याकरितां देव्हाऱ्यांत ठेवलेला नाहीं ! याला रोज सकाळीं गंध, अक्षता, फुलें वाहून याची पूजा करावयाची !–पूजा कशाला करावयाची ? वेडी पोर ! ऐक, मी काय सांगतों तें. एके दिवशीं रात्रीं काय झालें,–आपल्या बागेंत बंगल्या-शेजारीं नारळाचें मोठें झाड आहे तें ?–त्या झाडाखालीं, श्रीरामचंद्र, लक्ष्मण–सीतामाईबरोबर गोष्टी सांगत बसलेले तुझ्या पणजोबांना स्वप्नांत दिसले ! सकाळीं ते जे उठून पाहातात, तों आपला

एक नारळ त्या झाडाखालीं पडलेला ! झालें ! देवाचा प्रसाद म्हणून पणजोबानें तो घरीं आणला, त्याचीं सालपटें काढलीं, मग देव्हाऱ्यांत ठेवून त्याची पूजा केली ! रोज या नारळाची पूजा करावयाची असा त्यांनीं आपला नेम चालविला. पुढें देवाच्या दयेनें त्यांना पुष्कळ पैसा मिळाल्यावर, त्यांनीं याला चांगला सोन्यानें मढविला ! बघ, कशी खऱ्या नारळाच्या शेंडीसारखी जरीची शेंडी आहे ती ! झालेंच तर ही मखमलीची पिशवी, त्याला बसायला रेशमी कापडाची मऊमऊ गादी–पाहिलीसना कशी छानदार आहे ती ?–काय ? काय म्हटलंस ? या नारळांत–या जरीनें, सोन्यानें मढविलेल्या नारळांत गोड गोड पाणी !–चांगलें खोबरें असेल ? हः हः वेडी रे वेडी ! बेटा वेणुबाई ! या नारळांत आतां कोठून खोबरें व पाणी असायला ? पणजोबांना ज्या वेळेस तो झाडाखालीं सांपडला त्यावेळेस त्याच्यांत खोबरें आणि पाणी असेल ! त्या गोष्टीला जवळ जवळ आतां दोनशे वर्षें व्हायला आलीं ! आतां या नारळांतले पाणीहि नाहींसें झालें आहे व खोबरेंहि नाहींसें झालें आहे !–मग यांत आहे काय ? बेटा ! कवटी सोन्याची, शेंडी जरीची, पण आंत किं नाहीं, सडलेली, कुचकी, अशी निवळ घाण आहे ! आतां कांहीं तो खाण्याच्या उपयोगाचा नाहीं ! समजलें आतां ? तो देण्याबद्दल आतां पुन्हाः नाहीं ना कधीं हट्ट धरायची ?......"

प्रश्न—वेणूच्या घरांत नारळाची पूजा कां करीत असत ? वेणूनें कोणता प्रश्न केला ? तिला मिळालेल्या उत्तरानें तिचें समाधान झालें असेल काय ? तुम्हांला वेणूनें तोच प्रश्न विचारिला असता तुम्हीं तिला काय उत्तर दिलें असतें ?

**अभ्यासः**—नाट्यछटा म्हणजे काय हें तुमच्या शब्दांत लिहा. खोटं बोलूं नये असें दुसऱ्यास सांगणारा एक मुलगा स्वतःच खोटें बोलत आहे, या प्रसंगावर एक विनोदी ‘ नाट्यछटा ’ रचा.



वरच्या चित्रांत वेणूची आई वेणूच्या भावाची, नारळाची पूजा कां करावी याबद्दल समजूत घालीत आहे, अशी कल्पना करून नाट्यछटेंत योग्य तो फरक करा.

**पुरवणीवाचनः**—कै. दिवाकर यांचें ‘ नाट्यछटा ’ हें पुस्तक वाचा.

---

## २४. उपासकास.

**ओळखः**—श्री. य. द. पेंढरकर ( जन्म इ. स. १८९९ ) ऊर्फ यशवंत, ह्यांनीं आपल्या अनेक सुरस कवितांच्या द्वारें महाराष्ट्रांतील रसिकांच्या अंतःकरणाचा ठाव घेतला आहे. त्यांनीं मिळविलेली रसिकप्रियता अभिमानास्पद आहे. हे मूळचे चाफळकरचे राहणारे. ह्यांचें बहुतेक लेखनकार्य पुण्यासच झालेलें आहे. यशवंती हें त्यांचें आरंभीं प्रसिद्ध झालेलें

काव्याचें पुस्तक, त्यानंतर त्यांनीं 'यशोधन,' 'भावमंथन,' 'बन्दिशाळा', 'जयमंगला', 'यशोगन्ध' वगैरे भावपूर्ण काव्यग्रंथ प्रसिद्ध करून, मराठी वाङ्मयाची बहुमोल सेवा केली आहे. त्यांची प्राय: कोणतीहि कविता वाचल्यास तींत त्यांचे भावनोत्कट हृदय आणि व्यक्तिमत्व प्रकट झाल्या-खेरीज राहात नाहीं. तसेंच काव्य-गायनाच्या द्वारें सर्वसाधारण जनतेंत आणि रसिकवर्गांत काव्याची गोडी निर्माण करणाऱ्या आधुनिक कवींत त्यांची प्रामुख्यानें गणना होते.



विषय:—खऱ्या कलावंताकडे लोक कोणत्या दृष्टीनें पाहातात आणि त्यांची कशी दिशाभूल होते, हें कवीनें सोबतच्या कवितेंत आपणाकडे, काव्यदेवतेच्या उपासकाची भूमिका घेऊन स्पष्ट दाखविलें आहे. देवीची प्रतिमा करून तिला डोक्यावर घेऊन मिरविणाऱ्या भक्ताच्या खऱ्या व्रताची कोणालाच जाणीव नसते. शारदेची—काव्यदेवीची—भक्ति करावयाची म्हणजे कोणतें सतीचें वाण स्वीकारावें लागतें याची इतरांस कल्पना नसते. लोक बाह्य देखाव्याला भुलून जातात, परंतु खऱ्या अंतःकरणाची फारच थोड्यांस जाणीव असते. लोकांच्या अंतःकरणांतील दुःखें नाहींशीं करून त्यांना आनंद देणें हेंच खरोखर कवीचें कार्य असतें; परंतु या कार्याचें महत्त्व सहजासहजीं कोणाच्या ध्यानीं येत नाहीं. म्हणूनच आपल्या अंतः-करणांत उदित झालेल्या प्रतिभेच्या नन्दादीपाचा ज्योत लोकापवादाच्या वाऱ्यानें विझूं नये व आपलें लक्ष त्याकडे राहूं नये, म्हणून शेवटीं

आपल्या उपास्यदेवतेस कवीनें विनविलें आहे. थोडक्या शब्दांत पुष्कळ आशय आणण्याचा गुण ( सूचकता ) या कवितेंत तुम्हांस आढळेल.

धिण्ड तुझी काढितों फिरवितों तुज दारोदार
प्रतिष्ठा मिळवाया लोकीं
त्वत्प्रतिभेच्या भाण्डवलावर माझा व्यापार
शब्दशर असे कुणी रोखी
परन्तु माझ्या भाव मनींचा आकळतो तुजला
सत्य ना लपे त्वदालोकीं !
अङ्गारे लावून पाहणें दाह जनीं शमला
हेतु ना दुजा ध्येयफलकीं !
चालवितों व्रत तव भक्तीचें, सुलभ जना गमतें —
जनांची वरवरची दृष्टी.
तयार व्हाया परि अङ्गारे अन्तरङ्ग जळतें;
आंतली ज्ञात कुणा सृष्टी ?
तव मूर्तीचे वागवितों मी माथां पेटारे
रिती परि झोळी काखेला.
दण्डावरचे आसूडाचे तसेच फटकारे
तयांचा तर्क कुणीं केला !
म्हणोत कोणी कांहींही परि लागुन फुङ्कर तो
विझो हा नच नन्दादीप !
पदर आड धरि तुझ्या कृपेचा विनन्ति ही करितों
तूंच कीं मज सकलाधीप.

प्रश्नः—डोक्यावर देवीचे देव्हारे घेऊन मिरविणारा उपासक कशा रीतीनें आपली उपजीविका करितो? कवीनें त्याची भूमिका आपणाकडे कशाकरितां घेतली आहे? 'अङ्गारे लावून पाहणें,' 'आसुडाचे फटकारे अंगावर घेणें, यांनीं कोणते अर्थ ध्वनित झाले आहेत? उपास्य दैवतास शेवटीं भक्तानें कोणती विनंति केली आहे? या कवितेंतील रूपक उघड करा.

अभ्यासः—( १ ) खालील काव्यचरणांचा अर्थ स्पष्ट करा:—

'त्वप्रतिभेच्या भाण्डवलावर माझा व्यापार'
शब्दशर असे कुणी रोखी.
अङ्गारे लावून पाहणें दाह जनीं शमला
हेतु ना दुजा ध्येयफलकीं.

( २ ) 'रूपक' या अलंकाराची लक्षणांसहित फोड करा.

पुरवणीवाचनः—( १ ) रॉबर्ट ब्रीज या कवीची 'कवि आणि पक्षी' ही कविता वाचा; आणि तीवरून 'कला कशी निर्माण होते' यावर लहानसा निबंध लिहा. ( २ ) ह्याच कवीची 'कलावंतास' आणि श्री. पाटक यांच्या 'आशागीतांतील,' 'मायावती' या कविता वाचा.

---

# २५. कला आणि मानवी जीवन.

ओळखः—प्रो. विनायक सदाशिव गोगटे, एम्. ए. हे बाहाउद्दीन कॉलेज, जुनागड येथें तत्त्वज्ञानाचे प्रोफेसर आहेत. त्यांच्या लघुकथा रत्नाकर मासिकांतून प्रथम प्रसिद्ध झाल्या. त्यांचे कांहीं स्फुट निबंध 'गिरनारच्या

छायेंत ' ह्या पुस्तकांत समाविष्ट झाले आहेत. सोबतचा उतारा त्या




पुस्तकांतील आहे. याशिवाय त्यांचें ' सुखाचा शोध ' हें पुस्तक प्रसिद्ध आहे. त्यांच्या लेखनांतील तत्त्व-जिज्ञासु प्रवृत्ति विलोभनीय वाटते.

विषयः—कला आणि जीवन या दोन परस्परविरोधी गोष्टी नसून, जीवनांतूनच कलेची निर्मिति होते, ही कल्पना या घड्यांत प्रामुख्यानें आली आहे. आपल्या आयुष्यांत ज्या घडामोडी होतात, त्यासुद्धां कलावंत लेखकास रमणीय व उद्‌बोधक वाटल्या पाहिजेत, आणि मानवी स्वभावांतील अमंगल स्वरूप उघड करण्यापेक्षां त्यांतील उदात्त भागाचें दर्शन रसिकांना करविणें हें लेखकाचें कर्तव्य होय, असें प्रो. गोगटे यांनीं येथें कसें उघड केलें आहे तें पाहा.

**मानवी जीवनांतील कलेचें उच्चस्थान व तिची मानवी उन्नतीला होणारी मदत लक्षांत घेतल्यास, कलेमध्यें वास्तविकतेची, अगर जीवनाचें अगदीं हुबेहूब चित्र रंगविण्याची मर्यादा काय असावी, हें आपणांस ठरवितां येईल. निसर्गाचें प्रतिबिंब उमटवितांना ज्याप्रमाणें त्यांतील मनोरम व महत्त्वपूर्ण आंगाला उठाव व प्रामुख्य आणून, क्षुल्लक व सौंदर्यहीन भागास मुद्दाम गौणत्व आणणें हें कलावंताचें कर्तव्य असतें, त्याचप्रमाणें मानवी जीवनाचें चित्र रंगवितांना त्यांतील रम्य व उद्‌बोधक भागास प्राधान्य देऊन, क्षुद्र व हिणकस भाग लपविण्याचें काम त्यानें केलें**

पाहिजे. कोणत्याहि वस्तूचें अगदीं हुबेहूब व वास्तविक चित्र रंगविणें हें अतिशय सूक्ष्म अवलोकनशक्तीचें व कल्पकतेचें द्योतक आहे, यांत शंका नाहीं. एखाद्या म्हाताऱ्या मनुष्याच्या तोंडावरील प्रत्येक सुरकुती, खांचा, खळगे व दाढीचा प्रत्येक केस हुबेहूब चितारणाऱ्या कलावंताच्या आंगची विशेष निरीक्षणशक्ति व कौशल्य त्या चित्रांत प्रगट होतें हें खरें आहे. पण कांहीं कांहीं गोष्टी अशा असतात कीं, त्यांचें वास्तविक स्वरूपदर्शन हें नैतिक दृष्ट्या तर अपायकारक असतेंच, पण कलेच्या दृष्टीनेंहि तें हानिकारक असतें. नाटकच्या रंगभूमीवर आलेला स्त्रीवेषधारी नट कितीहि नकली असो, त्यानें आपली कुरूपता झांकण्यासाठीं कितीहि कृत्रिम साधनांचा उपयोग केलेला असो, ही सर्व प्रतारणा व कृत्रिमता आपणांस खपेल; पण रंगभूमीच्या बाहेरील त्याचें खरें वास्तविक स्वरूप कसें असतें, याचें वर्णन जर नाटककार इतर पात्रांच्या द्वारें आपणांस ऐकवूं लागला, तर तें केवळ अप्रासंगिकच नव्हे, तर कलेच्या दृष्टीनें अत्यंत अनिष्ट होईल. अश्लील व बीभत्स वाङ्मय याच कारणासाठीं आक्षेपार्ह ठरतें. श्रेष्ठ प्रकारच्या कलावंतास एखादी शिल्पकृति निर्माण करण्यासाठीं वास्तविक चित्रांची जरूर असली तरी ती गोष्ट अपवादात्मक समजली पाहिजे. अशा वास्तविक स्वरूपदर्शनाचा बाजार मांडणें म्हणजे माकडांच्या थव्याचे हातीं जळतें कोलीत देण्यासारखेंच होय हें विसरतां कामा नये. शिवाय मानवी जीवनाचें असें क्षुद्र व हिडीस स्वरूप उत्कटपणें दर्शविणारा कलावंतहि, त्या जीवनांतील रम्य व उदात्त स्वरूप रसिकांच्या डोळ्यांआड करून एकप्रकारें अवास्तविकतेच्या दोषास पात्र होतो. मग जीवनांतील केवळ उदात्त व सुंदर स्वरूप रंगविणारा कलावंतहि त्यांतील क्षुद्र व हिडीस स्वरूप

झाकून त्याच अवास्तविकतेच्या दोषास पात्र होत नाहीं काय ? असें कोणी विचारील. या प्रश्नास उत्तर असें कीं, व्यंगें उघड करण्याच्या कलेपेक्षां तीं झाकणारी कलाच अधिक सुपरिणामी, व अधिक आकर्षकहि होईल. कलेमध्यें प्रतारणेचा भाग थोडाबहुत असणें हें अपरिहार्यच आहे. मग ही प्रतारणा मनुष्याच्या अधोगतीस कारणीभूत होईल अशा रीतीनें करण्यापेक्षां, त्यास कल्याणकारक होईल अशा रीतीनें करणेंच अधीक श्रेयस्कर होय. शिवाय मनुष्य कितीहि पापी व दुराचारी असला, तरी त्याच्या अंतर्यामीं ईश्वरी शक्ति गुप्त रीतीनें वास करीत असते, व त्याच्या बाह्य दुराचाराचें भडक चित्र रंगविण्यापेक्षां त्याच्या हृदयांतील गूढ परमेश्वरी शक्तीचा आविष्कार करणारी कलाच अधिक उद्‌बोधक व अधिक चित्ताकर्षकहि ठरेल. मानवी जीवन हें आपणांस प्रथमदर्शनीं वाटतें तितकें नीरस-गलिच्छ व हीन दर्जाचें खचित नाहीं. अत्यंत रुक्ष व क्षुल्लक भासणाऱ्या आपल्या रोजच्या दिनक्रमांत व व्यावहारिक घडामोडींत देखील एक गूढ व अनंत शक्ति आपल्या रम्य व उदात्त स्वरूपाचें हळू हळू आविष्करण करीत असतें व तिच्या स्वरूपाकडे सूक्ष्म दृष्टीनें पाहाण्याची पात्रता व सामर्थ्य आपल्या आंगीं नसल्यामुळेंच आपणांस आपलें जीवन रुक्ष, सौंदर्यहीन व अर्थशून्य भासतें. हें रूक्षतेचें व शून्यत्वाचें पटल दूर करून, जीवितांतील अद्‌भुतरम्य व गूढ स्वरूप प्रत्येकाच्या दृष्टी समोर आणणें हेंच खऱ्या कलावंताचें कार्य आहे. आपल्या कलेसाठीं साधनसामुग्री, आपल्या काव्यासाठीं अगर नाटकासाठीं विषय शोधण्यास कलावंतास या पृथ्वीच्या बाहेर कोठें जावें लागत नाहीं. आपल्या रोजच्या आयुष्यांतील वरून अगदीं क्षुल्लक दिसणाऱ्या गोष्टींतूनच

त्याच्या सखोल व सूक्ष्म दृष्टीला हवी तेवढी साधनसामुग्री सांपडते. मनुष्याच्या जीवनांत रोजच्या रोज चालणारे सुविचार व कुवासना यांमधील युद्ध, सुखदुःखांचे हेलकावे, संकटांचे पर्वत व ते उल्लंघून जाण्याकरितां मनुष्य रोजच्या रोज करीत असलेली नवी नवी तयारी, प्रेम व कर्तव्य यांचा झगडा, इत्यादि सर्वसामान्य गोष्टींच्या सामुग्रीवरच जगांतील मोटमोठीं काव्यें व नाटकें निर्माण झालीं आहेत व अजूनहि होत आहेत. जीवनक्रमाचें जाळें हें प्रेम, औदार्य, सहकारिता, ऐक्यभाव, धैर्य, सहिष्णुता इत्यादि सुवर्णतंतूंनीं कसें अद्‌भुत रीतीनें विणलें जात आहे हें दर्शविणें व आपल्या कल्पकतेच्या जोरावर मनुष्य-मात्रास मोहित करून व या जीवितजालांत बद्ध करून त्यांतील सुमधुर रस चाखावयास सुलभ करून देणें, हें कलावंताचें कार्य आहे. अशा कलेच्या सेवनानें मनुष्यास हें जीवन रुक्ष व अर्थ-शून्य न वाटतां रसमय, अर्थमय व सौंदर्यमय वाटूं लागेल. मनुष्याचें जीवन हें सुखदुःख, आशा-निराशा यश व अपयश, सद्‌गुण व कुवासना इत्यादि द्वंद्वांच्या भोंवऱ्यांत अखंड फिर-णारें व एकदां इकडे व एकदां तिकडे हेलकावें खाणारें तारूं आहे. जीवनाच्या या अखंड भ्रमणांतून त्याचें सुंदर, शाश्वत व उदात्त स्वरूप आपल्या बुद्धिकौशल्यानें ग्रहण करून, तें आदर्श-रूपानें जगापुढें ठेवण्याचें कार्य कलावंत करीत असतात. या त्यांच्या कलाकृतीचें रसज्ञतेनें व मार्मिकतेनें सेवन करणाऱ्या मनुष्यास जीवनाकडे व एकंदर सृष्टिक्रमाकडे पाहण्याची अभिनव व सखोल दृष्टि प्राप्त होते. कलासेवनाची ही पात्रता बहुजनसमा-जास प्राप्त व्हावी, यासाठीं कलाशिक्षण सार्वत्रिक होणें अत्यंत आवश्यक आहे.

**प्रश्नः**—वाङ्मयांत जीवनाचें हुबेहूब चित्र रंगवितांना लेखकास कोणत्या मर्यादा पाळाव्या लागतात? ‘व्यंगें उघड करण्याच्या कलेपेक्षां तीं झाकणारी कलाच अधिक सुपरिणामी व आकर्षक होईल’ या विधानावर टीका करा. कलावंताचें मुख्य कार्य लेखकाच्या मतें कोणतें आहे? कलाशिक्षणापासून कोणते फायदे होतात?

**लेखनः**—खालील वाक्यांचे अर्थ स्पष्ट करा.

( १ ) कलेमध्यें प्रतारणेचा भाग थोडाबहुत असणें हें अपरिहार्यच आहे.

( २ ) आपल्या कलेसाठीं विषय शोधण्यास कलावंतास या पृथ्वीच्या बाहेर कोठें जावें लागत नाहीं.

( ३ ) अशा कलेच्या सेवनानें मनुष्यास हें जीवन रूक्ष व अर्थशून्य न वाटतां रसमय, अर्थमय व सौंदर्यमय वाटूं लागेल.

**पुरवणीवाचनः**—कविवर्य तांबे यांचा ‘कला आणि जीवन’ हा निबंध वाचा. त्याचप्रमाणें श्री. वि. स खांडेकर यांची ‘दोन ध्रुव’ ही कादंबरी वाचून, कलेचा जीवनाशीं कसा संबंध असतो हें दाखवा.

**संवादलेखनः**—कला आणि जीवन यांची आपापल्यापरी तरफदारी करणाऱ्या दोन मित्रांतील संवाद लिहा.

---

# २६. ना. गोपाळ कृष्ण गोखले.

**ओळखः**—आधुनिक मराठी कवितेच्या इतिहासांत प्रो. शंकर केशव कानेटकर, एम्. ए. ऊर्फ गिरीश ( ज. इ. स. १८९३ ) यांचें नांव अनेक दृष्टींनीं भूषणभूत होणारें आहे. कै. केशवसुतांच्या मागाहून मराठी कवितेला ज्यांनीं विशेष कलात्मक वळण लावून दिलें, अशा नामवंत कवींत त्यांची

गणना होते. त्यांच्या काव्यांतील पदलालित्य जितकें मनोहर तितकेंच त्यांतील भावनाविष्करण आकर्षक वाटतें. ' सौंदर्यपूजन ' हा त्यांच्या मनोधर्माचा एक विशेष गुण आहे. मग तें पूजन निसर्गातील एखाद्या दृश्याचें असो किंवा दररोजच्या व्यवहारांतील साध्यासुध्या विषयाचें असो, त्यांचें अंतः-करण त्याकडे धांव घेतें. भावनेला संयमित ठेवूनही तिची उत्कटता सूच-कतेनें व्यक्त करण्यांत त्यांचें वैशिष्ट्य दिसून येतें.

सातारा जिल्ह्यांतील रहिमतपूर हें यांचें मूळगांव. त्यांचें शालेय शिक्षण सातारा व पुणें येथें झालें. बालपणापासूनच त्यांचा ओढा लेखनकलेकडे होता. याचें एकच प्रत्यंतर म्हणजे आपल्या वयाच्या अवघ्या पंधराव्या वर्षीं त्यांनीं ' श्रीशिवाजीवंदन ' ही पहिली कविता लिहिली. तेव्हांपासून त्यांची काव्योपासना अखंड सुरू आहे. ' अभागी कमल, ' ' आम्बराई, ' आणि ' कांचनगंगा ' हे त्यांचे काव्यसंग्रह विशेष प्रसिद्ध आहेत. यांखेरीज ' काव्यकला ' हें टीकात्मक लेखांचें पुस्तक आणि नाट्यछटेवरील प्रबंध त्यांनीं प्रसिद्ध केले आहेत. हल्लीं ते विलिंग्डन कॉलेज, सांगली येथें मराठीचे प्राध्यापक आहेत.

**विषयः**—वयाच्या अवघ्या ४९ वर्षांच्या अवधींत कै. गोपाळ कृष्ण गोखले ( मृत्यु इ. स. १९१५ ) यांनीं अनेक रीतींनें आपल्या राष्ट्राची सेवा केली. डे. ए. सोसायटीचे आजीवसेवक, फर्ग्युसन कॉलेजां-तील प्राध्यापक, हिंदुस्थानच्या वरिष्ठ कायदेमंडळांतील सभासद, आणि धडाडीचे लोकाग्रणी म्हणून त्यांचें नांव भारतवासीयांच्या पुढें नेहमीं उभें राहील. श्री. गिरीश यांनीं सोबतच्या सुनीतांत त्यांच्या लोकोत्तर गुणांचा भावनात्मक पद्धतीनें परिचय करून दिला आहे. प्रथमारंभींच डोळ्यांत भरणारें त्यांचें मनोहर स्वरूप, बुद्धिमत्तेचें द्योतक असे ते डोळे आणि तें भव्य कपाळ, तसेंच या बाह्यस्वरूपाच्या आंत दडून राहिलेलें व राष्ट्रप्रेमानें ओथंबलेलें त्यांचें अगाध अंतःकरण, यांचें प्रभावी दिग्दर्शन

कवीनें पहिल्या आठ ओळींत केलें आहे. येथें एक कल्पना पूर्ण होते. अखेरीच्या सहा ओळींत पुन्हा दोन भाग पडतात. ९ ते १२ या ओळींत ह्या अलौकिक पुरुषाच्या कलेवराला प्रत्यक्ष पाहून भाविकाची मनःस्थिति कशी झाली असेल याचें वर्णन आलें असून, शेवटच्या दोन ओळींत व्यक्ति ही कृतीनें—आपल्या कार्यानें—कशी जिवंत राहूं शकते हें तत्त्व कवीला पटतें आणि त्याचें शिर साहजिकच भारतसेवकाच्या पायीं नम्र होतें.

धीरोदात्त तुझी अजून हसरी मूर्ती पुढें खेळते,
तें बुद्धिप्रभ लोचनांतिल दिसे औदार्य आकर्षक;
ती गम्भीर सहिष्णुता, वदनिची शांती मनोदर्शक,
तो मञ्जुध्वनि वाक्प्रवाह पुढती सारें उभें राहतें !
त्वन्मानव्य अगाध ! नित्य रमलें देशैकभावें मन,
राष्ट्रांच्या प्रगतींत पाउल पुढें केव्हां पडे हिन्दवी–
या चिन्तेंत जळून, दूर करण्या दुःखें तशी यादवी–
सोशी घाव अघोर ऐरणिवरी, द्यायास तेजःकण.
होतें व्याकुळ चित्त ! बान्धव तुझ्या दारीं तदा पातले,
अश्रूंनीं हसरें कलेवर तुझें ते न्हाणुनी वन्दिती;
कार्यामाजिं तुझ्या अलौकिक असें देवत्व ते पाहती,
तें हृन्मन्दिरिं सांठवून सुमनीं त्यांनीं तुला पूजिलें.
दृश्यादृश्यकणांत हें प्रगतिचें चैतन्य आलोकितों
अन् मी भारतसेवका, तुज मनोभावें नमस्कारितों.

प्रश्नः—कै. गोपाळ कृष्ण गोखले, यांच्या जीवितकार्यात अलौकिक असे काय होतें ? त्यांचें दर्शन कोणास केव्हां घडलें ? दृश्यादृश्यकणांत कवीला प्रगतीचें चैतन्य आढळून आलें म्हणजे काय ?

अभ्यासः—(क) भारतसेवक या नात्यानें कै. गोपाळ कृष्ण गोखले यांनीं केलेल्या कामगिरीचें वर्णन करा.

(ब) या सुनीतांत जीं 'विशेषणें' आलीं आहेत तीं कशीं यथार्थ आहेत तें दाखवा.

पुरवणीवाचनः—श्री. माधवजूलियन यांचें 'दोन विभूति,' यशवंत यांचें 'श्रीलक्ष्मीदेवीस,' आणि गिरीशांचें प्रस्तुतचें सुनीत, ह्यांचें वाचन व मनन करून, त्यावरून सुनीत या वाङ्मयप्रकाराबद्दल तुम्हांस काय माहिती मिळते ती लिहा.

---

# २७. सामाजिक कादंबऱ्या.

परिचयः—कु. वेणूबाई पानसे, एम्. ए., बी. टी. ह्या पुणें येथील म. ए. सोसायटीच्या 'गर्ल्स हायस्कूल' च्या सुपरिंटेंडेंट म्हणून काम करीत आहेत. वरील शाळेच्या षष्ट्यब्दिसमारंभानिमित्त प्रसिद्ध झालेल्या 'प्रगतिपथावर' या पुस्तकाच्या त्या एक संपादिका होत्या. कै. हरि नारायण आपटे, यांचें सुरस चरित्र लिहून त्यांनीं आपलें मराठी भाषेवरील प्रेम व्यक्त केलें आहे. त्यांची लेखनशैली सरळ पण प्रासादिक आहे.

विषयः—कै. हरि नारायण आपटे हे मराठींतील पहिले सुप्रसिद्ध कादंबरीकार होत. सामाजिक आणि ऐतिहासिक प्रसंगांवर त्यांनीं ज्या कादंबऱ्या लिहिल्या त्यांवरून त्यांच्या अभिजात लेखनकलेची ओळख पटते. सोबतच्या धड्यांत सामाजिक कादंबरीकाराच्या आंगीं कोणते गुण असावे लागतात याची चर्चा करून, तसे गुण कै. हरिभाऊंच्या आंगांत कसे उपजत वास करीत होते, याबद्दलचें विवेचन आलें आहे.

**यशस्वी सामाजिक कादंबरीकारास समाजांतील नाना संप्रदाय**

व चालीरिती यांचें ज्ञान जरूर असलें पाहिजे. एकंदर समाजाच्या परिस्थितीची चांगली कल्पना असल्याशिवाय, त्याच्या हातून उच्च दर्जाचें वाङ्मय निर्माण होणें शक्य नाहीं. मनुष्यस्वभावाचें सूक्ष्म ज्ञान होण्यासाठीं त्यास समाजांत मिसळून प्रत्यक्ष अनुभव घेतला पाहिजे. जितका प्रत्यक्ष जगाशीं त्याचा परिचय अधिक, तितकीं त्यानें रेखाटलेलीं मनुष्यस्वभावाचीं चित्रें अधिक सुंदर, स्वाभाविक व विविध प्रकारचीं अशीं उतरतील. समाजापुढें असणाऱ्या जिव्हाळ्याच्या सर्व प्रश्नांचें त्यास सांगोपांग ज्ञान असणें आवश्यक आहे. कारण त्यावांचून त्याच्या कादंबऱ्यांचें महत्त्व कोणास वाटणार नाहीं. कादंबरीकार उत्कृष्ट मानसशास्त्रज्ञ असला तरच त्यानें निर्माण केलेलीं पात्रें खरीं अशीं वाटतील. मानवी मनांतील परस्परविरोधी अशा नाना मनोव्यापारांची सूक्ष्म क्रिया त्यास कळली पाहिजे. समाजांतील स्त्रीपुरुष स्वीकार करतील अशा तऱ्हेचा समाजसुधारणेचा मार्ग त्यास आंखतां आला, तरच त्याच्या कामगिरीचें महत्त्व! व अशा तऱ्हेचा समाजसुधारणेचा मार्ग सूचित करावयाचा झाल्यास, भविष्यकालाचा पडदा दूर सारून, त्या पलीकडच्या गोष्टी सूक्ष्म तऱ्हेनें निरीक्षण करणारी दिव्य दूरदृष्टि त्यास असलीच पाहिजे. द्रष्ट्याचेंहि काम कादंबरीकारास करावें लागतें. अवलोकनशक्ति अत्यंत सूक्ष्म असून तिचा उपयोग त्यास स्वानुभवानें संपादन केलेल्या ज्ञानानें आपल्या कादंबऱ्या परिणामकारी बनविण्यांत करितां येतो. सामाजिक कादंबरीकाराचें सहानुभूतीचें क्षेत्र अत्यंत विशाल स्वरूपाचें असलें, तरच स्वतःच निर्माण केलेल्या पात्रांशीं त्याचें तादात्म्य होऊं शकेल; व असें तादात्म्य झाल्याशिवाय स्वभावचित्रलेखन उत्कृष्ट होणें असंभवनीय आहे. याशिवाय

सहृदयता, सौंदर्यप्रतीति; कथानकरचनेचें व भाषेचें सौंदर्य, इत्यादि महत्त्वाच्या गुणांवाचून कादंबरीकारास यश येणार नाहीं. परंतु समाजास सन्मार्ग दाखविण्याइतका ध्येयवाद कादंबरीकाराच्या ठायीं जरूर हवा; कारण, त्रिकालाबाधित उदात्त तत्त्वांवर व उच्च दर्जाच्या ध्येयवादावर उभारल्याशिवाय कोणतीहि कादंबरी चिरंतन स्वरूपाची होणें असंभवनीय आहे.

हरिभाऊंना आपल्या हिंदुसमाजांतील चालीरितींचें उत्तम ज्ञान होतें. बालविवाह, एकत्र कुटुंबपद्धति, केशवपन, स्त्रियांत शिक्षणाचा अभाव इत्यादि गोष्टींमुळें आमच्या गृहसौख्याचा पाया ढिला झाला, याची त्यांस जाणीव होती. नाना तऱ्हेच्या खोट्या धर्मसमजुती व लोकभ्रम यांखालीं स्त्रियांची अनेक दृष्टींनीं कुचंबणा चाललेली होती. ही परिस्थिति पाहून हरिभाऊंच्या अंतःकरणांतील दयानिधि साहजिक उचंबळून आला व आपल्या कादंबऱ्यांच्या द्वारें समाजांत जागृति उत्पन्न करून, स्त्रियांची उन्नति करण्याचें ध्येय पुढें ठेवून त्यांनीं तें सिद्धीस नेलें. सामाजिक जुलमामुळें स्त्रियांची स्थिति करुणास्पद झाली होती, तर राजकीय जुलमामुळें देश परतंत्र होऊन देशांतील पुरुष हतबल झाले होते. उद्योगधंदे खालावून देशांतील लोक पराकाष्ठेचे दरिद्री झाले होते. अशा रीतीनें देशाच्या सामाजिक, राजकीय व औद्योगिक परिस्थितीचें पूर्ण ज्ञान त्यांस असल्यानें, त्यांनीं आपल्या कादंबऱ्यांच्या द्वारें ही स्थिति सुधारण्याचे अनेक मार्ग सूचित केले. ‘ मधली स्थिति, ’ ‘ गणपतराव, ‘ पण लक्षांत कोण घेतो, ’ ‘ मी ’ इत्यादि कादंबऱ्यांत समाजोन्नतीचे मार्ग त्यांनीं स्पष्ट आंखले आहेत. ‘ मी ’ कादंबरींत ‘ आत्मत्याग ’ हाच देशसेवेचा खरा मार्ग असून, देशाची स्थिति सुधारण्यामार्गीं कोणीं सामाजिक तर कोणीं राजकीय प्रश्न हातीं

व्यावेत व याच मार्गाचा अवलंब केल्यानें देशाची सर्वांगीण सुधारणा होईल, असें तत्त्व त्यांनीं प्रतिपादन केलें. ‘ आजच ’ यामध्यें सामाजिक, राजकीय व औद्योगिक विषयांवर चर्चा केली, तर ‘ कर्मयोगांत ’ कर्मश्रद्धा व धर्मश्रद्धा ह्या दोन्हींची जरूर आहे, हें तत्त्व लोकांच्या मनावर बिंबविलें. हरिभाऊंना देशोन्नतीस आवश्यक अशा सर्व सामाजिक व राजकीय प्रश्नांची कल्पना होती व त्यांच्या अंगीं उत्कृष्ट प्रकारचा ध्येयवाद असल्यानें त्यांनीं सुंदर ध्येयसृष्टि निर्माण केली व देशोन्नतीचा मार्ग दाखवून दिला. त्यांनीं कादंबऱ्यांत घेतलेले प्रश्न लोकांच्या पूर्ण परिचयाचे होते, एवढेंच नव्हे, तर त्यांनीं सूचित केलेल्या सामाजिक सुधारणा लोकांच्या आटोक्याच्या बाहेरच्या नव्हत्या. त्यामुळें त्यांच्या ध्येयसृष्टींतील सुधारणांचा स्वीकार सामान्य जनतेकडून लौकर व फारसे प्रयास न पडतां झाला. नवीन सुधारणा समाजापुढें मांडण्याची त्यांची हातोटी इतकी उत्तम होती कीं, तरुण पिढींतील सुशिक्षितांचें सहज मतपरिवर्तन झालें व जुन्या मंडळींचें मन विशेष न दुखवितां, त्यांनीं आपल्या सुधारणांचे प्रश्न पुढें मांडल्यानें त्यांचा विरोध तीव्र स्वरूपाचा झाला नाहीं. जुन्या मंडळींनीं जरी त्यांस नांवें ठेविलीं तरी तरुणांनीं सुधारणा अंमलांतच आणल्यामुळें नांवें ठेवण्यापलीकडे फारशी प्रतिक्रिया त्यांनीं केली नाहीं. हरिभाऊ भराऱ्या मारणारे ध्येयवादी नसून क्रियावान् व्यावहारिक ध्येयवादी होते. म्हणूनच त्यांची ध्येयसृष्टि प्रत्यक्ष सृष्टींत अवतरलेली थोडक्याच काळांत त्यांस दिसली. जुन्या लोकांशीं ते फटकून वागले नाहींत, तर त्यांचा रोष पत्करून ते त्यांस चिकटून राहिले; त्यामुळें जुन्या मतांच्या मंडळींवरहि त्यांचें शेवटपर्यंत चांगलें वजन राहिलें.

आपटे घराणें अतिशय मोठें होतें. कुटुंबांतील मंडळी, आजोळचे नातेवाईक व त्या सर्वांचे आप्तेष्ट मिळून मोजदाद केल्यास कुटुंबांत घरचीच सरासरी पांचपंचवीस मंडळी होती. शिवाय त्यांचा मित्रपरिवारहि मोठा होता. त्यामुळें मनुष्यस्वभावाचें सूक्ष्म निरीक्षण करण्यास, त्यांस संधि मिळाली. त्यांनीं हिंदुस्थानभर प्रवासहि केला होता. त्यामुळें प्रत्यक्ष जगांतील नानातऱ्हांच्या घडामोडींशीं व मनुष्यांशीं त्यांचा परिचय झाला. त्यांची अवलोकन-शक्ति अत्यंत सूक्ष्म होती. त्या शक्तीच्या जोरावर त्यांस जगाचें व मनुष्यस्वभावाचें ज्ञान संपादन करतां आलें व यामुळेंच त्यांच्या सामाजिक कादंबऱ्यांत नानातऱ्हांच्या वृत्तींचीं विविध पात्रें त्यांनीं रंगविलीं. यशवंतराव, भावानंद, गणपतराव, यमुना, ताई, रावबहादूर आडमुठे, शंकरमामंजी, दिगंबरपंत इत्यादि पात्रांचें परीक्षण केलें असतां हरिभाऊ हे श्रेष्ठ प्रतीचे मानसशास्त्रज्ञ होते, असें कबूल करणें भाग आहे. मनुष्याच्या हृदयांतील नाना विकार-विचारांचे धागे उलगडण्यात ते प्रवीण असून, त्यांच्या सहानुभूतीचें क्षेत्र विशाल होतें. या त्यांच्या व्यापक सहानुभूतीमुळेंच नानाप्रकारच्या पात्रांशीं समरस होऊन, त्यांचीं हुबेहूब चित्रें त्यांस रेखाटतां आलीं. लहानथोर, गरीबश्रीमंत असा भेद त्यांच्यापाशीं नव्हता.

त्यांनीं आपल्या कोणत्याहि कादंबरींत शृंगाररसाला प्राधान्य दिलें नाहीं; किंबहुना शृंगार-रसावांचूनहि उत्कृष्ट प्रकारची कादंबरी लिहिणें शक्य आहे, हें त्यांनीं सिद्ध केलें. त्यांच्या कादंबऱ्यांतील पतिपत्नींचे संभाषणप्रसंग अत्यंत मर्यादेनें व शालीनतेनें लिहिले गेले असल्यानें, त्यांच्या कादंबऱ्या वाचण्यास लहान मुलांमुलींस संकोच वाटत नाहीं. त्यांच्या कादंबऱ्या लहान मुलांमुलींस व स्त्रियांस वाचावयास देण्यास कोणीहि हरकत घेणार नाहीं.

सदभिरुचीचा कादंबरीकार या दृष्टीनें त्यांची योग्यता अलौकिक आहे. क्षुद्र अभिरुचीच्या वाचकांची लोकप्रियता संपादन करण्याचा हरिभाऊंना केव्हांहि मोह पडला नाहीं. कादंबऱ्या खपाव्या म्हणून भावनोद्दीपक वैषयिक गोष्टी त्यांनीं लिहिल्या नाहींत. सामान्य जनतेंत सदभिरुचि उत्पन्न करून, त्यांची उन्नति करण्याचा त्यांनीं आपल्या लेखणीच्या द्वारें प्रयत्न केला.

**प्रश्न:**—सामाजिक कादंबरीकाराच्या आंगीं कोणते गुण असावे लागतात ? कादंबरीकार या नात्यानें कै. हरिभाऊ आपटे यांचें वैशिष्ट्य कशांत होतें ! आपटे घराण्याचा उल्लेख या धड्यांत कशाकरितां आला आहे ?

**अभ्यास:**—खालील वाक्यांतील विचार तुमच्या शब्दांत अधिक स्पष्ट करा.

( १ ) द्रष्ट्याचेंहि काम कादंबरीकारास करावें लागतें.

( २ ) हरिभाऊ भराऱ्या मारणारे ध्येयवादी नसून, क्रियावान् व्यावहारिक ध्येयवादी होते.

**पुरवणीवाचन:**—कै. हरिभाऊ आपटे यांच्या 'मी,' 'पण लक्षांत कोण घेतो,' 'मायेचा बाजार' या सामाजिक आणि 'उषःकाल,' 'सूर्योदय' या ऐतिहासिक कादंबऱ्या वाचा.

---

*

# २८. गस्तवाल्यानें पाहिलेली स्वारी.

**ओळखः**—श्री. गणेश हरी पाटील, बी. ए., टी. टी. ( जन्म इ. स. १९०७ ) ह्यांचा 'रानजाई' या नांवाचा कवितासंग्रह प्रसिद्ध आहे. ह्यांचें शालेय शिक्षण न्यू इंग्लिश स्कूलमध्यें आणि उच्च शिक्षण फर्ग्यूसन कॉलेजमधून झालें. हे मूळचे मंचरचे राहणारे. 'शिवनेरी' सारख्या ऐतिहासिक स्थलाच्या आसपास यांचें बालपण गेलें. त्यामुळें तेथील वातावरणाचा गोड ठसा त्यांच्या काव्यावर उमटल्यासारखा दिसतो. 'रानजाई,' 'तेथें,' 'वाटसरू,' 'माझ्या खेडेगांवीं' वगैरे त्यांच्या कविता मनोहर आहेत. त्यांनीं 'बालशारदा' या नांवाचा बालगीतांचा संग्रह संपादित केला आहे. हल्लीं ते जळगांव तेथील ट्रेनिंगकॉलेजांत प्रिन्सिपॉल म्हणून काम करीत आहेत. त्यांची भाषाशैली मराठमोळ्यास शोभणारी आहे.

**विषयः**—मराठ्यांचा अस्त व इंग्रजांचा उदय ह्यांच्या संधिकालांत जे विचारतरंग मराठ्यांच्या मनांत घोळत असतील त्यांचें प्रकटीकरण श्री. पाटलांनीं या गीतांत गेलें आहे. खेडेगांवांतील एक गस्तवाला आपला अनुयायी धर्माजी वेस्कर याच्यासह अपरात्रीस गांवचा खडा पहारा करीत हिंडतो. माळावरील बहिरोबाचें देऊळ आणि त्यावर फडफडणारें पांढरें निशाण पाहून, खंडोबाची स्वारी आतां निघणार म्हणून हुश्शार राहाण्याबद्दल तो आपल्या धन्यास बजावितो. इतक्यांत त्याच्या अंतश्चक्षूंपुढून खालील गीतांत वर्णिल्याप्रमाणें मराठ्यांच्या वैभवशाली स्वाऱ्या जातात असा त्यांना भास होतो. कदाचित् त्या काळचे हे अवशिष्ट लोकभ्रम असतील; परंतु ऐतिहासिक वातावरणाच्या उठावांत त्याचा परिपोष कवीनें किती यथार्थ केला आहे, तो पाहा.

पुनवेचा माथ्यावरुनी ढळला खालीं चान्द
गांवांतुन घालुन आलों गस्तीची मी साद
धर्माजी वेस्कर माझा सङ्गें जोडीदार
गांवाशिवेबाहिर गेलों ओलाण्डून पठार.
चान्दण्यांत बहिरोबाचें डोले शुभ्र निशाण
दीपमाळ काळीकाळी पुढतीं भग्न भयाण।
सामोरा घारकड्याचा भव्य अहा विस्तार !
बसली कीं पङ्ख उभारुन विशाल कोणी घार !
धर्माजी अवचित बोले, "शाळूच्या शेतांत
घारकड्यावरुनी खालीं भुतें कधीं येतात
पुनवेच्या रातीं अपुला सरन्जाम घेऊन,
देवाची स्वारी जाते घारकड्याखालून !
अद्भुत हें ऐकुन आलें शहारून मम अङ्ग *
'देवाची स्वारी' अद्भुत अद्भुत खास प्रसंग !
चौथऱ्यास टेकुन होतों स्वस्थ उभे किति वेळ
काय कुणी अमुच्याभोंवतीं करी जादुचा खेळ !
तोंच वदे धर्मा कांहीं हृदि होउन संचार
देवाची स्वारी आहे जात, रहा हुश्शार !"
आणि खरोखर कीं दिसला चमत्कार नेत्रांस
ठेवा कीं ठेवुं नका मग आम्हांवर विश्वास !
आघाडिस राजे, त्यांचे पिछाडीस सरदार
चन्देरी घोड्यांवरती होउन गेले स्वार.
सरन्जाम चन्देरी अन् चन्देरी शिरपेंच
जरिपटका चन्देरी अन् चन्देरी मोर्चेल

चन्देरी त्यांच्या ढाला, चन्देरी तलवार
        चन्देरी शिङ्गें कर्णे, चन्देरी ललकार.
राजांची स्वारी गेली पहा अशा थाटांत !
        दूर दूर दौडत दौडत दौडत दिसली जात !
कोठुनि ती आली, गेली कुण्या बरें मुलखांत !
        अन्तर्हित झाली किंवा पलिकडल्या किल्ल्यांत ?
ठायिं ठायिं अजुनी पडक्या किल्ल्यांचे अवशेष
        काय बरें फेरी सुचवी राष्ट्राला संदेश ?
पुण्यशील छत्रपतीच्या प्रथित महाराष्ट्रांत
        मर्द मराठ्यांच्या स्वाऱ्या अद्यापिहि निघतात"

—ग. ह. पाटील.

प्रश्न:—धर्माजीनें आपल्या साथीदारास कोणती कानगोष्ट सांगितली ? कोणाचें अङ्ग केव्हां शहारून आलें ? चांदण्या रात्रीच्या वेळीं त्या दोघांना कोणता चमत्कार दिसला ? कवीनें 'राजाच्या' स्वारीचें वर्णन कसें केलें आहे ? पडक्या किल्ल्याचे अवशेष राष्ट्राला कोणता संदेश सुचवितात ?

अभ्यास:—(१) ह्या कवितेंत एकप्रकारचें अद्भुत वातावरण निर्माण करण्याकरितां कवीनें कोणतें शब्दचातुर्य दाखविलें आहे, तें उदाहरणांसह स्पष्ट करा.

(२) रात्रीच्या वेळीं गस्त घालींत हिंडणाऱ्या खेडेगांवांतील गस्तवाल्याचें शब्दचित्र लिहा.

पुरवणीवाचन:—श्री. पाटील यांचा 'रानजाई' आणि श्री. ग. ल. ठोकळ यांचा 'मीठभाकर' हे काव्यसंग्रह वाचा.

---

# २९. गिरणीचा मालक कोण ?

**ओळखः**—श्री. भार्गवराम विठ्ठल वरेरकर, हे आजचे सुप्रसिद्ध नाटककार, लघुकथालेखक आणि बोलपटांतील संवाद–लेखक म्हणून मान्यता पावलेले आहेत. 'संन्याशाचा संसार,' 'सत्तेचा गुलाम,' 'हाच मुलाचा बाप,' 'सोन्याचा कळस' ही त्यांचीं नाटकें म्हणजे आज–कालच्या समाजस्थितीचीं कालात्मक परंतु यथार्थ चित्रेंच होत. 'विधवा कुमारी,' 'धावता धोटा' या त्यांच्या कादंबऱ्या वास्तविक स्वरूपाच्या आहेत. यांखेरीज 'स्वैर-संचार' व 'षोडशी' हे त्यांचे लघुकथासंग्रह विश्रुत आहेत. समाजांतील श्रमजीवी वर्गाबद्दल त्यांचें अंतःकरण तिळतिळ तुटतें. त्याचप्रमाणें अंधानुकरणामुळें ज्या रूढि आज समाजांत प्रबल झाल्या आहेत, त्यांवर ते आपल्या लेखनाच्या द्वारें निर्भीड टीका करितात. त्यांची भाषाशैली साधी, सोपी परंतु आकर्षक असते. त्यांचें लेखन आजच्या वास्तववादी वाङ्मयांत चमकतें.



**विषयः**—सोबतचा उतारा त्यांच्या 'सोन्याचा कळस' या नाटकांतून घेतला आहे. वरील नाटक गिरणींत काम करणाऱ्या मजुरांच्या सद्यःस्थितीवर उभारलेलें आहे. माधवजी या नांवाच्या गिरणी–मालकाची मुलगी हंसा, तिचें लग्न करसनजीच्या मुलाशीं–विठ्ठलदासाशीं–व्हावयाचें ठरतें. परंतु तो, विठू–मजुराचा वेष घेऊन बाबा शिगवण या मजुरांच्या अनुभवी पुढाऱ्याच्या सहवासांत राहातो. तेथेंच त्याला मजुरांच्या खऱ्या परिस्थितीची जाणीव होते. मध्यंतरी वसनजीच्या ( गिरणीचा मॅनेजर ) मसलतीमुळें गिरणींत संपाची वावटळ उठते...त्यावेळीं हंसा आणि

विठ्ठलदास यांच्या दिलदार आणि ध्येयनिष्ठ अंतःकरणाची मजुरांना ओळख पटते. बाबा शिगवण आणि त्याची मुलगी बिजली ह्यांनीं मजुरांची बाजू घेऊन जो लढा चालविला, त्यांतच तीं दोघेंहि सामील होतात. पुढें त्यांचें खरें स्वरूप उघडकीस आल्यावर, गिरणीचे मालक आपला हट्ट सोडतात. संप मोडतो आणि शेवट गोड होतो.

प्रस्तुतच्या उताऱ्यांत ( सोन्याचा कळस, अंक ३, प्रवेश १ ) मजुरांचा पुढाकार घेऊन, त्यांच्या उन्नतीकरितां नेहमीं झटणारा बाबा शिगवण, आणि गिरणीचे मालक माधवजी आणि करसनदास, ह्यांच्यांत चाललेल्या आपापसांतील हक्कांच्या वाटाघाटीबद्दलचा संवाद आलेला आहे. यावरून तुम्हांस त्यांच्या स्वभावाची आणि मजुरांच्या परिस्थितीची ओळख पटेल.

[ माधवदास यांच्या बंगल्याची गच्ची. करसनदास, माधवदास, वसनजी अगदीं जवळ जवळ खुर्च्यांवर बसून बोलत आहेत. ]

माधवजी—वसनजीची सूचना विचार करण्याजोगी आहे. हरबावर आपण विश्वासून बसलों आहोंत खरे, पण या लोकांवर सर्वस्वीं किती विश्वास टाकून बसायचं, हेंहि नक्की ठरवलं पाहिजे. संप आज ना उद्यां होणार यांत शंका नाहीं, पण तो उद्यां न होतां आज झाला, तरच आपला फायदा होणार. पावसाळ्यानंतर संप होणं फार धोक्याचं आहे.

करसनजी—हें संपाचं त्रांगडं आपल्याला मुळींच आवडत नाहीं. या संपामुळं कुणाचंच कधीं कल्याण झालं नाहीं. मजुरांना काय किंवा मालकांना काय संप झाला कीं, सुख मिळणार नाहीं, असं माझं मत आहे. थोडयाशा फायद्यासाठीं लाखो माणसांना उपाशीं पाडायचं हें मला तरी पटत नाहीं.

माधवजी—आपलं म्हणणं बरोबर आहे. मलाहि तसंच

वाटतं, पण एकेक प्रसंग मोठें चमत्कारिक असतात. त्या प्रसंगांना तोंड देण्यासाठीं असले हे संप घडवून आणावे लागतात. आज कितीतरी गिरण्यांतून शेंकडों गठ्ठे माल तयार होऊन पडला आहे. जपानच्या चढाओढीमुळं आमच्या मालाचा उठाव होत नाहीं. मालाच्या पैदाशीला आळा घालावा तर मजुरांची संख्या कमी करावी लागणार. त्यांनीं संप करण्यापेक्षां आपण तो आपल्या अनुकूलतेप्रमाणें घडवून आणणं, हें जास्त मुत्सद्दीपणाचं होणार आहे.

करसनजी––मी तुम्हांला एकदां सांगितलं ना, कीं मी कांहीं तुमच्या बाहेर नाहीं; तुमची योजना मला पसंत पडो कीं न पडो, जिथं तुम्ही आहांत तिथं मी आहें. पण एकंदरींत माझं मन सांगतं–

वसनजी––नोकरानं मालकांना सूचना देणें म्हणजे धाडस आहे. पण माझं म्हणणं आपण पूर्ण विचारांत घेऊन पहावं एवढंच माझं मागणं आहे. आजपर्यंत ज्या नमुन्यानं धंदा चालवला त्यांत आपली गिरण इतर गिरण्यांच्या मानानं फायदा देत नाहीं, हें कुणीहि कबूल करील. बाकीचे सर्व गिरणीवाले ज्या तत्त्वानं चालवूं पाहातात, त्या तत्त्वाला विरोध करून चालणार नाहीं. सर्वांनीं हातांत हात घालूनच धंदा केला पाहिजे, तरच ह्या गिरणीचा व्यवहार सुरळीत चालणार आहे. एवढेंच माझं म्हणणं, यापेक्षां दुसरं कांहीं म्हणणं नाहीं.

करसनजी––आजपर्यंत मी कुणालाच विरोध केला नाहीं. धंदा सुरळीत चालावा, या एकाच तत्त्वावर माझा सारा भडिमार आहे. तशी वेळ आली तर क्षणभर माझा चांगुलपणा मला गुंडाळून ठेवावा लागेल, याचीहि मला जाणीव आहे.

माधवजी—असं पाहा भाईसाहेब, आपल्यावर आजच कांहीं जोखीम येऊन पडली नाहीं. योजना अशी आहे कीं, बाहेरच्या लोकांना त्यामुळं आंतलं इंगित मुळींच कळणार नाहीं. लोक सारी जोखीम मजुरांवरच टाकतील. आम्ही होऊन हा संप घडवून आणला आहे हें कुणालाहि कळणार नाहीं. आज या कामीं तुम्हांला प्रत्यक्ष पुढाकार घ्यायला नको. इतर गिरण्या बंद पडतील त्यावेळीं तुमची गिरणीहि कांहीं उघडी राहाणार नाहीं, तीहि इतरांबरोबर बंद होणारच. त्यावेळीं तुम्हीं आमच्या हातांत हात घालून राहायचं आश्वासन दिलं म्हणजे आम्हांला धीर येईल, एवढंच माझं म्हणणं.

वसनजी—ज्याच्या गिरणींत पहिल्यानं संप होतो, त्याच्यावर पुढें मोठीं जोखीम येऊन पडते. त्या दृष्टीनें आम्ही सुरक्षित आहों. त्या दृष्टीनं माधव शेटजीवर मोठी जबाबदारी आहे. त्या वेळीं त्यांना पाठिंबा पाहिजे--मोठा जोराचा आसरा पाहिजे, आणि तो देण्याचं काम मित्रत्वाच्या नात्यानं आमच्यावर येऊन पडत आहे.

करसनजी--मित्रत्वाचं नातं असं कां म्हणतां ? ते आणि मी कांहीं दोन नाहींत. दोन्ही घराणीं नात्यानं जोडलीं जाणार आहेत. कुणीं सांगावं दोन्ही गिरण्या उद्यां एकाच व्यक्तीच्या हातीं चालवल्या जाण्याचा संभव आहे. माधवजीचं कल्याण तेंच माझं, असं आजपर्यंत मी मानीत आलों आणि यापुढं त्यांत फरक करायला कांहींच कारण झालेलं नाहीं. (हरबा येतो.) यावं, बसा हरबा, ठरल्यापेक्षां बराच वेळ झाला तुम्हांला.

हरबा--हो, वेळ झाला खरा. पण होराशकुन पाहिला—वेळ अनुकूल नव्हती—म्हणून वीस मिनिटं खालीं रस्त्यावर उभा राहिलों.

वसनजी—हरबा, हें ज्योतिषाचं वेड तुम्ही डोक्यांतून काढून टाकलं नाहीं तर आयत्यावेळीं आमचा घात कराल बरं.

हरबा—चुकतां आहांत मॅनेजर साहेब. या ज्योतिषाच्या वेडावरच माझीं कामं होताहेत. हें वेड नसतं तर मला कुणीं विचारलं नसतं. आम्ही जॉबर लोक म्हणजे मजुरांचे वैरी असा सर्वांचा समज. कुठलाहि मजूर कधींहि आमच्याशीं मोकळेपणानं वागत नाहीं. पण सारे मजूर मला विचारतात—माझा सल्ला घेतात—माझ्या शब्दाबाहेर जात नाहींत. कां ? द्याल का याचं उत्तर ?

माधवजी—खरं आहे. इतर गिरण्यांतून असं दिसून येतं खरं. जॉबर लोकांवर मजुरांचा विश्वास नसतो खरा.

हरबा—हीच तर खुबी आहे. याच जोरावर मी त्यांना नाचवतों आहे. गिरणबाबू म्हणजे महामूर्ख आहेत. त्यांना नाचवायला कांहींतरी ढोंग असावं लागतं हातीं ! दोन ढोंगं मीं हातीं ठेवलीं आहेत. पहिलं हें ज्योतिष, हें सर्वांनाच पटतं. याला कोणाचाच विरोध नाहीं. आणि दुसरं जें आहे तें मोठं जोरदार आहे—पण तें सर्वांनाच पटत नाहीं.

करसनजी—मला कुठलंच पटत नाहीं. पण हें दुसरं काय आहे ?

हरबा—मोठ्या बाया ! वारं अंगांत आणायचं, त्यांच्या तोंडून सांगवायचं, देवाचा कौल मिळाला कीं, हे आमचे गिरणगांवचे वीर एका क्षणांत चीत होऊन जातात. मोठ्या बायांनीं कौल दिला, कीं त्यापुढं अपील नाहीं.

वसनजी—तें मला माहीत आहे. या लोकांचा या मोठ्या बायावर पूर्ण विश्वास आहे आणि त्या देतील त्या कौलाप्रमाणें डोळे झांकून वागतांना ते यत्किंचितहि मागला पुढला विचार करीत नाहींत.

करसनजी--मोठें आश्चर्य आहे ! जगांत काय एकेक वेडं असतात हें कांहीं सांगतां यायचं नाहीं. आम्ही लोक मोठे धोरणी म्हणवतों, पण मी पाहिलं आहे–आमचे मोठमोठे जहांबाज व्यापारी सुद्धां ज्योतिष्याच्या शब्दाविरुद्ध एक पाऊल सुद्धां टाकीत नाहींत.

हरबा—आणि तसल्याच शाहाण्या मूर्खांचा फायदा आम्ही घेत असतों. पण तें आतां राहुं दे. गुरु बदलला आहे, चंद्रांशीं त्याचा त्रिकोण होतो आहे. या योगावर हें काम उरकून घेतलं पाहिजे. बाबा शिगवणाला याच वेळीं भेटायला यायची वेळ दिली आहे, सारेच येणार आहेत डेप्युटेशन घेऊन त्यावेळीं मी आपलं काम कसं बजावतों तें पाहा. मी आतां जातों. मला त्यांच्याबरोबर आलं पाहिजे. ( जातो. )

माधवजी--मोठा नेकीचा माणूस आहे. एकदां एक काम पत्करलं कीं, जिवाकडे सुद्धां पाहायचा नाहीं.

वसनजी--पण बक्षिसाचं मधाचं बोट मात्र आधीं लावावं लागतं आणि नंतर पाळावं लागतं, नाहींतर तितकाच उलटायला कांहीं कमी करायचा नाहीं.

माधवजी--असं हें चालायचचं अशीं हीं गाजरं हातीं घ्यायचीं, त्यांच्या पुंग्या करावयाच्या, वाजवायच्या आणि वेळ झाली कीं मोडून टाकायच्या असं केल्याशिवाय कामं होत नाहींत. प्रत्येक वेळीं एकाच माणसावर विश्वास टाकून कामं होत नसतात. दरवेळेला नवीं नवीं माणसं हातीं धरावीं लागतात. अशी सारींच वचनं आपण पाळीत गेलों तर उद्यां भीक मागावी लागेल आम्हांला ! ( कांहीं गिरणीवाले येतात. सर्वांचे जय गोपाळ साहेबजी होतात. सर्व खुर्च्यांवर बसतात. )

माधवजी—आतां असं पाहा–या कामीं बोलण्याचं पुढारीपण

तुम्हीं मला दिलं आहे. बोलायचं काम मी करीन. तुमच्या कांहीं शंका किंवा सूचना असल्या, तर त्यांचा डेप्युटेशन गेल्यावर आपण खाजगी रीतीनं खल करूं. बाबा, धोंडू, हरबा, शिवबा व इतर मजूर येतात. ) या मंडळी, बसा. ( सर्व खालीं बसतात. बाबा मधल्याच एका रिकाम्या खुर्चीवर बसतो. ) म्हातारेंबुवा—

बाबा—थांबा, माझं नांव बाबा शिगवण. बाबा म्हणा मला पाहिजे तर ! ! म्हणे म्हातारेबुवा ! पण शेटसाहेब, आपण कुठं इतके तरणेबांड आहांत ?

करसनजी—बरं बरं होऊन जाऊं द्या. पण असं पाहा बाबा, तुम्हांला कांहीं जगाचे आचारविचार माहीत आहेत कीं नाहींत ?

बाबा—पण असं पाहा माधवजी शेट, आधीं बोलण्यापूर्वी मला एक सांगायचं आहे. तुम्हांला एक मुलगी आहे ना ? बरं. या बैठकींत तिला घ्या.

माधवजी—मुलीला ? माझ्या मुलीला या बैठकींत ?

बाबा—कां बरं ? तुमचा मुलगा असता तर या खलबतांत नसता का तो सामील झाला ? मीं तिला वचन दिलं आहे. ती आल्याशिवाय मी एक शब्दहि बोलणार नाहीं.

वसनजी—तर मुळींच कांहीं बोलूं नका कुणी आमंत्रण दिलं नव्हतं तुम्हांला ! तुम्ही होऊन आलांत इथं आणि आतां तुम्हीच अटी घालतां ?

बाबा—ठीक आहे, मी जातों तर ! चल रे हरबा-धोंडू ! ( सर्व उठतात. )

करसनजी—थांबा–बसा खालीं सारेजण. जा वसनजी, हंसाबेनला म्हणावं—

माधवजी--हें काय ? एका म्हाताऱ्या मजुराच्या लहरीसाठीं मुलीला इथं चारचौघांत आणून बसवायची—

करसनजी—कांहीं हरकत नाहीं. ती तुमची मुलगी असली तरी माझी भावी सून आहे. त्या पुढच्या नात्यानं मीच तिला इथं बोलावतो आहे म्हणावं ! जा रे ( वसनजी जातो. ) आतां असं पाहा बाबा, एवढी ही मोठी मंडळी बसली असतांना या खुर्चीवर बसणं तुम्हांला कसं योग्य वाटलं ?

बाबा—याचंहि उत्तर ती आल्यावरच देईन.

माधवजी—बाबा, मी बजावून सांगतों, कीं, जें कांहीं बोलायचं तें पूर्ण विचार करून बोला. मुलीला समोर बसवल्यानं बापावर वजन पडेल असं तुम्हांला वाटत असेल, तर ती तुमची भूल आहे. ( बाबा नुसता हंसतो. ) हंसून घालवूं नका मी पुनः बजावून सांगतों.

बाबा—आणि मीहि बजावून सांगतों, तुम्ही कोण आहांत तें मला माहीत आहे. पण मी कोण आहें, हें मात्र तुम्हांला माहीत आहेच असं नाहीं, हेंहि तुम्ही विसरूं नका !

करसनजी--सामोपचाराच्या बैठकींत हीं सुरवातीलाच भांडणं कशाला ? ही पाहा हंसा आली. ( हंसा व वसनजी येतात. ) ये बेन, इथं बैस.

बाबा—हंसाबेन, आमच्या या भांडणांत आम्हीं तुला सरपंच नेमलं आहे. शेवटचा निकाल तूं द्यायचा.

वसनजी—पण तो आम्हांला मान्य झाला पाहिजे ना ?

बाबा—ऐकलंस हंसाबेन, तुझा निकाल आम्ही मान्य धरूं— मग तूं जाणूनबुजून आमचा गळा कापलास तरी आमची हरकत नाहीं.

करसनजी—मीं तुम्हांला विचारलं होतं--

बाबा—त्याचंच उत्तर देतों आहें. ऐका, तुम्हां मोठ्या लोकां समक्ष मी या खुर्चीवर बसलों, याचा तुम्हांला राग आला. मी बेमुर्वत आहे असं तुम्हांला वाटलं ! शेटसाहेब मी असं विचारतों मीं यांत काय गैर केलं ? तुम्ही एक गृहस्थ माणूस आहांत, तसाच मीहि एक गृहस्थ आहे तुमच्या गिरणीची रखवाली करतांना मी तुम्हांला लवून मुजरा करीन, पण घरीं माणूस जातीच्या या एक-छत्री साम्राज्यांत तुम्ही आणि मी सारखेच आहोंत..

माधवजी—असं कसं होईल ? मी मालक आहे, तुम्ही नोकर आहांत.

बाबा—खरं आहे, पण ते इथं नव्हे. तुमच्या मालकीच्या राज्यांत-आरोरा मिलमध्यें ! इथं-या गृहस्थाच्या पवित्र प्रदेशांत-तुम्ही आणि मी सारखेच आहोंत. तुम्ही श्रीमंत गृहस्थ आसाल-मी एक दरिद्री गृहस्थ असेन-पण आपण दोघेहि गृहस्थ आहोंत यांत मात्र शंका नाहीं. गृहस्थ या नात्यानं देवाच्या घरीं तुमचा आणि माझा दर्जा सारखाच आहे, झालं. बोला आतां पुढं.

वसनजी—बोलायचं आहे तुम्ही. डेप्युटेशन आहे तुमचं !

बाबा—असं का ? मीं अगदींच विसरलों होतों. मला वाटलं कीं, डेप्युटेशन तुमचं आहे आणि तुम्ही आमच्यापुढं आपलं गाऱ्हाणं घेऊन आला आहांत.

वसनजी—आणखी नाहीं का कांहीं वाटलं.

बाबा —आणखीहि वाटलं असतं, पण तुम्हीं आमचीं तोंडं बांधून टाकली आहेत. आमची सत्ता तुम्ही बळकावून बसलां आहांत. खरे फिर्यादी तुम्ही-आरोपीहि तुम्हीच-पण जागा बदलली आहे ! वसनजी-बाळ-छोटे मॅनेजरसाहेब, जागा बदलली आहे बरं !

माधवजी--ठीक-ठीक-आतां तुमचं काय म्हणणं आहे? थोडक्यांत काय तें सांगून टाका.

हरबा--आमचं म्हणणं असं आहे-

बाबा--गप्प राहा. तें काम तुझं नव्हे. शेटसाहेब, आमचं म्हणणं एवढंच आहे कीं, सत्य म्हणून जगांत कांहीं तरी शक्ति आहे. डाव-पेंचाच्या घाणीला या सत्याची धुरी पुरेशी होते. तुम्हांला तुमचा गिरणींत संप व्हायला पाहिजे ना ?

माधवजी —मुळींच नाहीं, कोण म्हणतो तसं ?

बाबा—नाहींना ? ठीक; आम्हांलाहि संप नकोच आहे.

माधवजी —मग तुम्हांला काय पाहिजे आहे ?

बाबा—आम्हांला काय पाहिजे, तें तुम्हांला माहीत आहे. शेटसाहेब. एवढा मोठा कारखाना-पदोपदीं अपघाताची भीति ! एक चांगलासा दवाखाना प्रत्येक गिरणींत नको का ?

माधवजी—ठीक. आणखी काय ?

बाबा—आपल्या गिरणींतून कामावर येणाऱ्या बायका शेकडों आहेत. त्यांतल्या शेंकडा पाऊणशें लेकुरवाळ्या आहेत. त्यांची तान्हीं अर्भकं त्यांनीं कुठं टाकावीं ? त्यांना केव्हां पाजावं ? प्रत्येक गिरणींत अशीं तान्हीं मुलं राखायची कांहीं व्यवस्था नको का करायला ?

करसनजी—ठीक ठीक. सूचना अगदीं योग्य आहे.

बाबा—रोज आमच्या कांहींना कांहीं तक्रारी असतात. कांहीं साध्याच असतात; पण वेळप्रसंगीं कांहींना गंभीर स्वरूप येतं. अशा तक्रारींची वाट आपण कशी लावणार ?

माधवजी--तुम्ही तक्रार करा-आम्ही तिचं निवारण करूं.

हरबा---आणि तुमचा आमचा मतभेद झाला तर ?

बाबा---तूं गप्प राहा रे ! समजा, तुम्हीं दिलेला निकाल आम्हांला पटला नाहीं तर ?

माधवजी---तर तुमचा मार्ग आम्हांला मोकळा आहे ! पटलें तर राहा, नाहींतर नोकरी सोडा.

बाबा---कुणाला देतां हें उत्तर ? आम्हांला ?

माधवजी---हं हं-म्हाताऱ्या, तोंड आटोपून बोल.

बाबा---मीहि सांगतों, कीं म्हातारेबुवा, तुम्हीहि जरा तोंड आटोपून बोला, गिरणीच्या मालकासमोर बोलतांना जरा अदबीची आठवण ठेवा.

माधवजी---गिरणीच्या मालकासमोर ? म्हणजे ? गिरणीचा मालक कोण ?

बाबा---गिरणीचा मालक मी ! हा हरबा-हा शिवबा-हा धोंडू-रामा-सोमा-हेच खरे गिरणीचे मालक ! तुम्ही आमचे नोकर आहांत. गिरणी तुम्हांला चालवायला दिली आहे. तुम्ही ती चालवतां आहांत. चालवायचा मेहनताना वाजवीपेक्षां फाजील घेऊन तुम्ही गबर झालां आहांत. आम्हां मालकांना कंगाल करून ठेवतां आहांत, म्हणून ही भाषा तुम्हांला सुचते आहे.

माधवजी---माझ्यासमोर ? असली भाषा माझ्यासमोर ? माझ्या नोकरानं ? माझ्या घरीं ?

बाबा—हां-हां-हां जरा आवरतं घ्या शेटसाहेब, हें तुमचं घर नव्हे. हें घर माझं आहे. हा बंगला आमचा आहे. शेटसावकारांचा नव्हे, राम्या-सोम्यांचा आहे. कोंबड्यांच्या खुराड्यासारख्या सिमिटाच्या चाळी बांधून सक्तीनं तुम्ही आम्हांला त्यांत राहायला भाग पाडतां आहांत. शेटसाहेब, शंभर माणसं राहातील

अशा या भव्य बंगल्यांत तुम्ही चार माणसं राहातां. बाकीच्या शहाण्णवांना सिमिटाच्या चाळींत डांबून टाकतां ! काय अधिकार तुम्हांला या घरांत राहायचा ? महालक्ष्मी, मलबारहिल यांवरील ओस ठेवलेले हे बंगले, ही समुद्राची मोकळी हवा जबरदस्तीनं वापरण्याचा तुम्हांला काय अधिकार आहे ? किती बंगले रिकामे पडले आहेत इथं ? आम्ही लोक त्या डुकरी उकिरड्यांत खितपत पडलों असतां, चौदा चौकड्यांचं राज्य हाताखालीं घालून बसायला तुम्हांला शरम नाहीं वाटत ?

माधवजी--बस्स झालं. तुमचं भाषण ऐकण्याची आमची इच्छा नाहीं.

हरबा--माफ करा शेटसाहेब, भलतंच कांहींतरी--

बाबा--गप्प राहारे माकडा, तुला कुणी विचारीत नाहीं इथं ! शेटसाहेब, तुम्ही आपल्याला गिरणीचे मालक म्हणवितां, खरं पाहिलं तर तुम्ही नुसते अडते आहांत ! नुसती अडतीच्या नफ्याची चळथ घशाखालीं उतरवून खऱ्या मालकांना-शेअर-होल्डर्सना तुम्ही कोकलत ठेवतां आहांत, म्हणूनच आमचं गिरणीचं कापड विलायतच्या कापडापेक्षां महाग होऊन बसलं आहे. ही अडत बंद करा. गिरण्या खऱ्या मालकांच्या हवालीं करा. आम्ही नोकर आहोंत, तसेच तुम्हीहि नोकर आहांत, याची जाणीव द्या. हवा तर भला लठ्ठ पगार द्या. एजंटाची अडत नव्हे-नोकरीचा पगार द्या. पण आधीं ही अडतेगिरी बंद करा, मग आमची तक्रार कांहींच नाहीं.

हरबा--याचं कांहीं ऐकूं नका शेटसाहेब. हल्लीं आमचा खरा पुढारी विठू कृष्ण आहे. त्याच्या हजेरीशिवाय या म्हाताऱ्याला काडीचीहि किंमत नाहीं.

बाबा—हरबा, वेड्या, विठू कृष्णा कुणाचा कोण आहे, हें तूं विसरतोस ! तो झाला तरी माझाच बच्चा आहे.

हरबा—पण तो तुमच्यासारखा बेफाम नाहीं. थोडा विचारी आहे. अगदीं एकदम असा घाईवर यायचा नाहीं.

माधवजी—कोण हा विठू कृष्णा ?

बाबा—कुणी असला तरी तुमचा वैरीच. एवढं मात्र ध्यानांत ठेवा. तुम्हांला विठू कृष्णा पाहिजे असेल तर चार दिवस थांबा. तो गांवीं गेला आहे, चार दिवशीं येईल. पण शेटसाहेब, या बाबा शिगवणाच्या हातचा घास घेतलेलं मूल, मी आतां बोललों यापेक्षां निराळं बोलेल, असं मात्र मुळींच समजूं नका.

माधवजी—आतां सांगितलं यापेक्षां आणखी कांहीं आहे ?

बाबा—आहे, पुष्कळच आहे. पण तुमची ऐकून घ्यायची तयारी हवी शेटसाहेब. आमच्या पोराबाळांच्या शिक्षणाची व्यवस्था आपण काय केली आहे ? आमच्या राहायच्या जागा सुधारायला हव्यात, असं नाहीं का तुम्हांला वाटत ?

शिवबा—बाबा ऐकलंस ? बाबा, आम्हाला राहायला इथंच जागा द्या म्हणावं ? भली मोठी जागा आहे. माणसंहि नाहींत कुणी घरांत. हवापाणी बरं आहे. समुद्राची झुळूक आहे. कोकणांत गेल्यासारखं वाटतं—

बाबा—उगी रहा रे ! आणखी असं पाहा, हे आमचे कामाचे तास आपण केव्हां कमी करणार ?

शिवबा—हो, तें आधीं पाहिजे बुवा. इतका वेळ या गिरणींत डांबून राहावं लागतं कीं कधीं नाटकाला सुद्धां जातां येत नाहीं हो. तेव्हां आठ तासांचा दिवस हा हवाच.

वसनजी--आणि घरीं बसून पगार नको का ?

बाबा—आठ तासांच्या दिवसाला कुणाचाच वांधा नाहीं. आमचं आणखी म्हणणं एवढंच, कीं गिरण्यांचे शेअर आम्हांला घेतां येण्याजोगी कांहीं तजवीज झाली पाहिजे. गिरण्या सार्वजनिक झाल्या पाहिजेत. आजच्यासारखी एकहातीं सत्ता ठेवून कसें जमेल शेटसाहेब ? आम्हाला जास्त सवलती नको आहेत. मँचेस्टरच्या मजुरांना जितक्या सवलती आहेत तितक्या तरी आम्हांला द्या. शेटसाहेब, कपडा निर्माण करतांना ज्यांचं रक्त खर्ची पडत आहे, तेच या गिरणीचे खरे मालक आहेत. आमचा अधिकार आमच्या हातीं द्या. हळूहळू तुमचं मूळ मुद्दल आम्ही फेडून टाकूं. आम्ही गिरण्या चालवूं, आमची व्यवस्था आमची आम्हीच पाहूं, आम्ही तिथं खपतों आहोंत—आमचीं सुखं-दुःखं आम्हांलांच माहीत आहेत. आमचे तंटे आम्ही मिटवूं. तुम्हांला ते मिटावितां यायचे नाहींत. आम्ही कापड तयार करूं. तुम्ही आमच्या बाजूला येऊं नका. आम्हीं तयार केलेलं कापड मंगळदास मार्केटांत नेऊन विका वाटेल तर. कोटांत व्हाइटअवे, इव्हॅन्स फ्रेझर सारखीं जंगी दुकानं उघडा, पण परळवर येऊं नका. परळचं राज्य आमचं आहे. तिथला कारभार आम्ही चालवणार शेटसाहेब, आमची गिरणीची मालकी आमच्या हवालीं करा आणि खुशाल दुकानदारी करून तुम्ही गबर व्हा.

माधवजी--झालं ? चला-निघा-चालते व्हा सारेजण ! चोर ! हरामखोर !

बाबा--हंसाबेन, तुझा काय निकाल आहे ? हाच ?

हंसा-- खरं बोललें, तर मला घराला मुकावं लागेल !

बाबा—तसं झालं तर परळवर ये. पोटापुरतं सहज मिळेल तुला तिथं. परळवर येणाऱ्या प्रामाणिक माणसाला उपाशीं मरायंच भय नाहीं.

माधवजी—बस्स कर पाजीपणा! एवढा वेळ ऐकूत घेतलं तें पुरें झालं. यापुढं एकहि शब्द ऐकण्याची माझी इच्छा नाहीं.

बाबा—अस्सं? ठीक. हंसाबेन, रामराम. मंडळी रामराम. चलारे सारेजण. (सर्व जाऊं लागतात. हरबा मागें राहण्याचा प्रयत्न करूं लागतो, त्याच्या बखोटीला धरून बाबा बाहेर नेतो.)

वसनजी—हा नुसता फाजीलपणा झाला! हें कांहीं तडजोडीचं बोलणं नव्हे.

माधवजी—आतां हरबाच्याच कर्तबगारीवर आपणाला अवलंबून राहिलं पाहिजे. बाकी हा सर्व फार्स आपण समजून उमजूनच केला होता म्हणा. बाबा शिगवण कधीं सरळ बोलला आहे? बस्स! आतां आपला मार्ग मोकळा झाला. मजुरांचं डेप्युटेशन आलं पण त्यांचे मुद्दे अव्यवहार्य असल्यामुळें तडजोड झाली नाहीं, असं प्रसिद्ध केलं म्हणजे झालं. आतां पुढं काय करायचं तें उद्यां कोटांतल्या सभेवरच ठरवूं चला. (हंसा व वसनजीखेरीज सर्व जातात.)

वसनजी—हंसा, पाहिलंस? तुला कुणीं विचारलं नाहीं!

हंसा—बरं नाहीं विचारलं! त्या बाबानं तर विचारलं?

वसनजी—बाबानं विचारलं म्हणे! बाबा शिगवण म्हणजे कांहीं हिंदुस्थानचा बादशहा नव्हे.

हंसा—नसेल. तुम्हांला त्याची कांहीं किंमत वाटत नसेल; पण मला वाटते. वसनजी, तुमचं आतां इथं काय काम आहे? चालते व्हा पाहूं इथून. जा, बाकीच्या कटवाल्यांत सामील व्हा; निघा!

वसनजी—बरं. पण ध्यानांत ठेव. गांठ माझ्याशीं आहे. (जातो.)

हंसा—वसनजीनं म्हटलं तें खोटं नाहीं. कुणीच मला विचारलं नाहीं! पैशाच्या व्यवहारापुढं पोटचा गोळाहि पारखा होतो का? ······बाबा शिगवणानं मला कां बोलावलं? बापूजींना तें वाईट वाटलं असेल का? मी त्यांच्याशीं संगनमत करून बापाच्या विरुद्ध जातें आहें असें त्यांना वाटणार नाहीं का?

—भार्गवराम विठ्ठल वरेरकर.

प्रश्नः—माधवजी, करसनजी आणि वसनजी ह्यांचें आपापसांत कोणतें खलबत चाललें होतें? बाबा शिगवण ह्यानें मजुरांच्या तर्फे त्यांच्याजवळ कोणत्या मागण्या केल्या? आपण व आपले इतर मजूरबंधु हेच खरे गिरणीचे मालक आहोंत, ह्या त्यांच्या उद्गारांत कितपत खरेपणा होता? बाबा शिगवणानें माधवजीला, त्यांच्या मुलीला बैठकींत घेण्यास कां सांगितलें?

अभ्यासः—१ बाबा शिगवण आणि वसनजी, ह्यांच्या संभाषणावरून त्यांचा जो स्वभाव उघड होतो, त्याचें तुमच्या शब्दांत वर्णन करा.

२ माधवजीची मुलगी हंसा, हिचें या प्रवेशांत विशेष काय कार्य होतें? तिच्या मनःस्थितीचें चित्र रेखाटा.

पुरवणीवाचनः—श्री. भा. वि. वरेरकर यांनीं लिहिलेलें 'सोन्याचा कळस' हें नाटक व 'धावता धोटा' ही कादंबरी वाचा.

---

# ३०. तेथें कर माझे जुळती.

ओळखः—श्री. बाळकृष्ण भगवंत बोरकर हे गोमान्तकांतील एक प्रसिद्ध कवि आहेत. 'जीवनसंगीत' या नवीनच प्रकाशित झालेल्या काव्यसंग्रहांतून त्यांची पुढील कविता घेतली आहे. भाषेचा साधेपणा आणि भावनेचें उत्कटत्व हे गुण त्यांच्या कवितांत दिसून येतात.

विषयः—सामान्य व्यक्तीला आपल्या आयुष्यांत पुष्कळ खडतर कर्तव्यें करावीं लागतात. अशा वेळीं जी व्यक्ति आनंदानें तीं पार पाडिते तिचें महत्त्व मोठें आहे. जग ज्यांची पर्वा करीत नाहीं, अशा सामान्य व्यक्तींतूनच मोठीं माणसें उदयास येतात. त्यांचा गौरव कवींनीं या कवितेंत केला आहे. 'मानवतेचें मंदिर' उभारण्याच्या कामीं ज्यांनीं ज्यांनीं हातभार लाविला —मग ते अज्ञात असले तरी—कवींनीं त्यांच्यावर येथें स्तुतिसुमनें उधळलीं आहेत. कवितेचा आशय किती उदात्त आणि रचना किती आकर्षक आहे !

तेथें कर माझे जुळती । दिव्यत्वाची जेथ प्रतीति
हृन्मंदिरिं संसृतिशर–स्वागत
हंसताचि करितां कुटुंब–हितरत–
गृहस्थ जे हरि उरांत रिझवित
सदनीं फुलबागा रचिती । तेथें कर माझे जुळती. १
ज्या प्रबला निज भावबलानें–
करिती सदनें हरिहरभुवनें,
देव-पतींना वाहुनि सुमनें,
पाजुनि केशव वाढविती । तेथें कर माझे जुळती. २

गाळुनिया भाळीचें मोतीं–
हरीकृपेचे मळे उगविती,
जलदांपरि येउनिया जाती,
जग ज्यांची न करी गणती । तेथें कर माझे जुळती. ३

शिरीं कुणाच्या कुवचनवृष्टी,
वरिती कुणि अव्याहत यष्टी
धरिती कुणि घाणीची पाटी
जे नरवर इतरांसाठीं । तेथें कर माझे जुळती. ४

यज्ञीं ज्यांनीं देउनि निजशिर–
घडिलें मानवतेचें मंदिर,
परी जयांच्या दहनभूमिवर
नाहिं चिरा, नाहीं पणती । तेथें कर माझे जुळती. ५

स्मितें जयांचीं चैतन्य-फुलें
शब्द जयांचे नवे दीपकळे
कृतींत ज्यांच्या भविष्य उजळे
प्रेमविवेकीं जे खुलती । तेथें कर माझे जुळती. ६

मध्यरात्रिं नभघुमटाखालीं
शांतिशिरीं तम चवऱ्या ढाळी
त्यक्त, बहिष्कृत मी ज्या काळीं,
एकांतीं डोळे भरती । तेथें कर माझे जुळती. ७

—बा. भ. बोरकर.

प्रश्नः—कोणतीं दृश्यें पाहून कवीच्या मनांत आदरभाव उत्पन्न होतो ? हरीकृपेचे मळे उगविणें म्हणजे काय ? हें कार्य कोण करतें ? कवींचे डोळे केव्हां आणि कशाकरितां भरून येतात ?

अभ्यासः—‘ मजूर ’ किंवा ‘ शेतकरी ’ यांच्या कष्टप्रद आयुष्याचें शब्दचित्र सहृदयतेनें लिहा.

पुरवणीवाचनः—श्री. कुमार रघुवीर यांचें ‘ हृदय ’ हें पुस्तक वाचा.

---

## ३१. समाजांतील गुन्हे.

ओळखः—बनारस हिंदु युनिव्हर्सिटींतील प्रोफेसर श्रीकृष्ण व्यंकटेश पुणतांबेकर यांनीं ‘ नागरीकनीति ’ या नांवाचें पुस्तक लिहिलें आहे. नवभारत ग्रंथमालेतर्फें तें प्रकाशित झालें आहे. समाजांतील अगदीं खालच्या थरांचें निरीक्षण करून, समाजांतील नीति बिघडणें आणि ती सुधारणें म्हणजे काय, या गोष्टींचा नियमबद्ध विचार त्यांनीं वरील पुस्तकांत केला आहे.

विषयः—सोबतच्या उताऱ्यांत, समाजांत जे गुन्हे होतात त्यांना समाजच कसा जबाबदार आहे, हा मुद्दा आला आहे. जे कोणी असे गुन्हे करण्यास प्रवृत्त होतात, त्यांच्या शिक्षणाची व त्यांना सुधारून सरळ मार्गाला लावण्याची सोय समाजानें आपल्या हातांत घेतली पाहिजे. या प्रकारचें विवेचन तुम्हांस त्यांत आढळेल.

प्रत्येक समाजामध्यें, तो स्थानिक असो वा राष्ट्रीय असो, कांहीं मनुष्यें शरिरानें, मनानें व नीतीनें दुर्बल, पंगु व पतित असतात. कांहीं समाजद्रोही असतात. त्यांच्या अस्तित्वामुळें व संपर्कामुळें इतर सामान्य व बहुजनसमाजाला एकप्रकारचा धोका असतो; म्हणून समाजसेवकांवर त्यांच्याबद्दलची एकप्रकारची जबाबदारी असते. त्यांचें पालनपोषण करणें, त्यांना शक्य तितकें सुधारणें आणि त्यांच्या दुर्गुणांपासून बहुजनसमाजावर दुष्परिणाम होऊं नये म्हणून त्यांना बहिष्कृत किंवा बंदीकृत, स्थलबद्ध किंवा नियमबद्ध करणें, आवश्यक आहे. पण त्याबरोबरच त्यांची योग्य काळजी घेणें हें समाजाचें कर्तव्य आहे. त्यांच्या सुधारणेकरतां संस्था स्थापणें, आलयें काढणें, नियम करणें इत्यादि गोष्टीं झाल्यापाहिजेत. मानसशास्त्र, समाजशास्त्र, औषधशास्त्र, दंडनीति इत्यादींचा उपयोग त्यांच्या व्यवस्थेसाठीं केला पाहिजे. त्यायोगें त्यांच्या पंगुपणाचीं मूळ कारणें समजून त्यांच्या अवगुणांस प्रतिबंध करतां येईल. भ्रष्ट, भ्रमिष्ट, भिकारी, वेडे, दारुडे इत्यादि सर्वांचें याप्रमाणें नियमन, पालन व पोषण, त्यांना आलयांत ठेवून केलें पाहिजे. तद्वतच आंधळे, बहिरे, मुके, थोटे इत्यादींना शिक्षणाचीं साधनें व आर्थिक साहाय्य दिलें पाहिजे. त्यांच्याकडून शक्य असतील तेवढे श्रम करून घेतले पाहिजेत. सध्यां अशा लोकांना स्वावलंबी करण्याच्या शाळा निघाल्या असून, त्यांमध्यें शिक्षण व साहाय्य दिलें जात आहे. ज्यांना काम मिळत नाहीं किंवा काम करतां येत नाहीं, त्यांनासुद्धां समाजानें काम मिळण्याची किंवा त्यांच्या पोषणाची सोय करून दिली पाहिजे. समाजांतील प्रत्येक मुलाची व मनुष्याची जबाबदारी त्यांतील जनतेवर व सत्तेवर आहे.

जगांत कांहीं गुन्हे मनुष्याच्या दुष्ट प्रवृत्तीमुळें घडतात आणि

कांहीं समाजाच्या गैरव्यवस्थेमुळें घडतात. तेव्हां जे अपराध दुष्ट प्रवृत्तीचे आहेत, त्यांचें नियमन व शासन हीं, जे अपराध समाजाच्या विशिष्ट प्रकारच्या व्यवस्थेमुळें व समजुतीमुळें होतात, त्यांच्या नियमांहून व शासनाहून भिन्न पाहिजेत.

सध्यांच्या प्रौढ समाजाचे प्रकार व व्यवहार फार गुंतागुंतीचे, वाढते, व्यापक व अन्योन्यावलंबी असल्यामुळें प्रामाणिक माणसाचें जीवितसुद्धां, जर त्याच्याजवळ भांडवल, वशिला, विद्या, कला, वडिलोपार्जित मान व धन नसतील तर, फार कठीण झालें आहे. आणि पूर्वींच्या काळीं कौटुंबिक सुख व आर्थिक साधन यांची जी निश्चितता असे ती आज गेली आहे. त्यामुळें त्यांच्या कामिक व आर्थिक गरजा सन्मान्य रीतीनें व सततपणें पूर्ण होऊं शकत नाहींत. तेव्हां ते एखादे वेळेस अशा परिस्थितीच्या अडचणीमुळें गुन्हा करण्यास प्रवृत्त होतात. त्यांची परिस्थिति व समाजव्यवस्था ह्या मुख्यत: त्यांच्या अधोगतीला कारण होतात. समाजांत थोड्या लोकांच्या हातांत संपत्तीचीं साधनें व त्यांची मालकी असल्यामुळें अनेक गुन्हे मनुष्याच्या हातून घडतात. अशा सामाजिक व आर्थिक व्यवस्थेच्या व त्याला पाठिंबा देणाऱ्या राज्यव्यवस्थेच्या विरुद्ध बोलणारे, लिहिणारे व वागणारे जे लोक त्यांना कांहीं देशांत अपराधी म्हणून शासन केलें जातें. तें शासन त्यांच्या दुष्टवृत्तीला नव्हे, तर त्यांच्या भिन्न समाजद्रोही मताला म्हणून आहे. नैतिकदृष्ट्या ते अपराधी मुळींच नव्हेत. मतदृष्ट्या ते तसे आहेत, कारण सत्ताधारी व शासन ह्यांनीं केलेल्या निर्बंधांच्या विरुद्ध त्यांची वागणूक असते.

दुष्टांना दंड व प्रतिबंध पाहिजेत. शक्य असल्यास त्यांना शिकविलें व सुधारलें पाहिजे. पण भिन्न अथवा विरोधी मत

वाल्यांना कोणच्या नैतिक तत्त्वानुसार अथवा न्यायानुसार आपण शिक्षा करणार ? ते आहे ती परिस्थिति बिघडवितात म्हणून, का आहेत ते निर्बंध पाळीत नाहींत म्हणून ? जर ती स्थिति व ते निर्बंध गर्ह्य व त्याज्य असतील आणि ते सुलभ व समाजाच्या मार्गानें बदलणें शक्य नसेल, तर त्यांना विरोध करणाऱ्यांना कोणत्याच, खऱ्या नीतितत्त्वानुसार शासन अथवा प्रतिबंध करतां येणार नाहीं. तसें केलेंच तर 'बळी तो कान पिळी' अथवा 'आमचें तें खरें तुमचें तें खोटें' अथवा 'राजा करील तो न्याय' या समजुतीनुसार होईल. मग तो प्रश्न विवेकाच्या व न्याय्य समजुतीच्या क्षेत्रांतून जाऊन रणक्षेत्राचा व युद्धाचा होईल आणि 'जेथें जय तेथें धर्म' हें तत्त्व अनुसरलें जाईल, अर्थात् तो प्रश्न विचाराच्या, नीतीच्या व न्यायाच्या कक्षेंतून बाहेर गेला, असें होईल.

मनुष्यावर यथापराध दंड पाहिजे. पण खून, चोरी, मारामारी लांचलुचपत, दरोडेखोरी इत्यादि महान् अपराधांच्या मानानें राज्यपद्धतीविरुद्ध व समाजव्यवस्थेविरुद्ध बोलणाऱ्या व लिहिणाऱ्या लोकांना अतिशय कठोर व कडक शिक्षा दिल्या जातात. कारण, प्रचलित राज्यव्यवस्था अथवा समाजव्यवस्था बिघडली तर अनेक वर्गांचे व व्यक्तींचे मानापमान, अधिकार, हक्क व आर्थिक हितसंबंध कोलमडून पडतील व त्यामुळें त्यांचें बरेंच नुकसान होईल.

सध्यांच्या दंडपद्धतींत प्रथमच गुन्हा करणाऱ्यांना व तरुण अपराध्यांना कांहीं सवलती दिल्या जातात. त्यांचा उद्देश त्यांनीं सुधारावें व शिक्षेच्या कठोरपणानें व कारागृहाच्या दुष्ट संगतीनें अधिक बिघडूं नये असा असतो. त्यांचा हेतु शिक्षा व शासन यांपेक्षां शिक्षण व सुधारणा हा असतो. दंडनीतीच्या नव्या कल्पना

प्रमाणें शिक्षेचा हेतु सूड व शासन हा नसून शिक्षण व सुधारणा हा आहे. अपराधी जरी दुष्ट वृत्तीचा असला तरी त्याला शिक्षणानें सुधारला पाहिजे. कठोर शिक्षेनें तो बिघडतो. त्याला पुन्हा समाजाचा उपयोगी घटक करणें हें अधिक योग्य व हितावह आहे. अपराध व अपराधी यांच्या नियमाचें व निर्मूलनाचें मोठें शास्त्र आहे, व शास्त्र म्हटले अपराधाचीं कारणें शोधून काढणें व तीं नाहींशीं करणें हें आलेंच. अपराध्याची वृत्ति वाईट असली तर ती बदलणें चांगलें; नीतीचें शिक्षण, कौटुंबिक सुख, आर्थिक सुस्थिति आणि धार्मिक व सांस्कृतिक जाणीव ह्यांच्याकडे विशेष लक्ष देणें ह्या योगानेंच अपराध कमी होतील. जे मनानें व शरिरानें दुर्बल असतील त्यांना वैद्यांच्या संमतीनें औषध व पथ्य देऊन सुधारलें पाहिजे. इतरांना धर्म, नीति, समाज व व्यवसाय यांचें शिक्षण देऊन सुसंस्कृत केलें पाहिजे. कांहीं लोकांना करमणुकी, मनोरंजन व श्रमपरिहार यांचीं साधनें वाढवून चांगल्या वृत्तींत ठेविलें पाहिजे. इतरांना काम, उद्योग व व्यवसाय देऊन गुंतविलें पाहिजे. त्यायोगें त्यांच्यामध्यें समाजवृत्तीची आवड व वाढ होईल, समाजाबद्दल आदर राहील व खऱ्या प्रपंचाची महती टिकेल.

—श्री. व्यं. पुणतांबेकर.

प्रश्न—समाजांत गुन्हे कां घडून येतात? त्यांना जबाबदार कोण? चालू समाजव्यवस्थेविरुद्ध तक्रार करणारे गुन्हेगार होतात काय? समाजांत शांतता राखण्याकरितां कोणते उपाय योजावे लागतात?

अभ्यास व पुरवणीवाचन—ह्याच लेखकाचें ‘ सामाजिक नीति ’ हें पुस्तक वाचून त्यावरून, ‘ गुन्हेगारांसंबंधीं तुम्हांस काय वाटतें ’ यावर एक निबंध लिहा.

---

# ३२. ब्राह्मण किंवा महार.

ओळखः— रे. नारायण वामन टिळक ( जन्म इ. स. १८६२, मृत्यु इ. स. १९१९ ). हे आधुनिक कवींत सुप्रसिद्ध कवि होऊन गेले. यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यांत करंजगांवीं झाला. वरील गांव महाबळेश्वराच्या



डोंगराच्या पायथ्याशीं आहे. कवीचें बाळपण तेथेंच गेलें. तेथील निसर्ग-सौंदर्याचा ठसा त्यांच्या काव्यांत ठिक-ठिकाणीं उमटलेला दिसतो. संस्कृत व इंग्रजी शिक्षणाचा लाभ त्यांना नाशिक येथें झाला. १८८०–१८९१ या कालांत त्यांनीं पुराण सांगणें, कीर्तन करणें, शिकविणें इ० अनेक व्यवसाय केले. १८९६–१९१७ या कालांत ते अहमदनगरास व शेवटीं साताऱ्यास राहात होते. त्यांच्या आयुष्याच्या रम्य आठवणी त्यांच्या पत्नी कै. लक्ष्मीबाई टिळक यांनीं आपल्या स्मृतिचित्रांत रंगविल्या आहेत.

प्रतिभा, प्रसाद आणि प्रेमळता हीं त्यांच्या काव्याचीं मुख्य लक्षणें होत. विषय कोणता का असेना, रे. टिळकांच्या हातांत तो गेला, कीं त्याला काव्याची कळा चढलीच म्हणून समजावें. त्यांच्या अनेक कविता प्रसिद्ध आहेत. विशेषतः ‘ वनवासी फूल,’ ‘ सुशीला,’ ‘ माझी भार्या ’ हीं कथनपर काव्यें, आणि ‘ कुणी सांगा बघू नांव,’ ‘ माझी ताई,’ ‘पांखरा येशिल कधिं परतुन’ वगैरे त्यांचीं स्फुट काव्यें चित्ताकर्षक आहेत.

आधुनिक मराठी कवितेचा दर्जा ज्यांनीं वाढविला व तिला स्पृहणीय स्वरूप प्राप्त करून दिलें, अशा प्रकारच्या श्रेष्ठ कवींत रे. टिळक यांची गणना होते.

**विषयः**—खरा राष्ट्रसेवक, 'ब्राह्मण' किंवा 'महार,' यांना उच्च-नीच न लेखतां सर्वांना सारख्याच रीतीनें वागवितो, ही मध्यवर्ती कल्पना सोबतच्या कवितेचा विषय आहे. मनुजपण ही एक मांगल्याची ठेव आहे, आणि म्हणूनच, अवघ्यांच्या लाथा खाऊन मी माझा माथा त्यांच्या सेवेला सादर करीन, ही कविकल्पना केवढी उदात्त आहे !

मी ब्राह्मण वा महार मी, गणीं न कवणालाच कर्मी,
या सृष्टींतिल दिव्यपण: तेंच तेंच हें मनुजपण;
मांगल्याची ही ठेव, हीस्तव देइन मी जीव;

हिच्याहि मोला
गणीं न त्याला,
महाखलाला

नीच, नीचतर गणीन मी जन्मभूमिसेवाधर्मी.
हिंदभूमि माझी जननी, आले हीच्या कुशींतुनी
हिरेच अवघे माझे ते मन्मन त्यां मोहुन जातें;

मलांत पडले,
खनींत दडले,
मुकुटीं जडले;

अवघे उचलुन घेइन मी जन्मभूमि-सेवाधर्मी.
विपन्नता ज्यांच्या पाठी जीव कळवळे त्यांसाठीं;
अज्ञपणा ग्रासी ज्यातें प्रियतर दुर्बल मज ते ते !

त्यजुनी सकलां,
रुग्ण दुर्बला
उचली बाला

जननी, तीसम वेडा मी जन्मभूमिसेवाधर्मी.
मानामानाचें गोवें कसें असें कवणा ठावें ।
खाइन अवघ्यांच्या लाथा, देइन सेवेला माथा;
निजभूचें ऋण,
अवघें फेडिन,
मरून जाइन !
रक्षिन गुरुपद माझें मी जन्मभूमिसेवाधर्मी.
होइन नीचाहुन नीच करीन अवघ्यांना उंच;
ते ब्राह्मण मग महार-मी कोण गाणीं मग मला कमी
कमी गणीना
कांहिं म्हणेना
कुणी तयांना
विचारितों मग कसला मी जन्मभूमिसेवाधर्मी.
पांच कशाचे, हे जितुके हिंदभूमिबालक तितुके
मम देहाचे प्राण खरे कसेहि असले तरि सारे !
जें वाटे तें
सांगायातें
शब्द न पुरते
धरितों मौना यास्तव मी जन्मभूमिसेवाधर्मी.

— रे. टिळक.

प्रश्न:—‘ मनुजपणाचें ’ कोणते महत्त्व कवीनें सिद्ध केलें आहे ? कवीनें हिरे कोणास म्हटलें आहे ? कां ? ‘ विचारितों मग कसला मी ! ’ असे उद्गार, कवीनें केव्हां काढले ? शेवटीं कवीनें मौन धरण्याचें ठरविलें, त्यांतील स्वारस्य काय ?

**अभ्यासः**—खालील काव्यचरणांतील कल्पना स्पष्ट करा.

( १ ) रक्षिन गुरुपद माझें मी । जन्मभूमिसेवाधर्मी ॥

( २ ) होइन नीचाहुन नीच । करीन अवध्यांना उंच ॥

**पुरवणीवाचनः**—( १ ) याच कवीची 'माझी जन्मभूमि' ही कविता वाचा. त्याचप्रमाणें केशवसुतांनीं 'अंत्यजास' उद्देशून जी कविता लिहिली, तिची वरील कवितेशीं तुलना करा.

( २ ) प्रो. माटे व श्री. शिंदे यांनीं हरिजनांच्या परिस्थितीवर जीं पुस्तकें लिहिलीं आहेत तीं वाचा.

---

## ३३. पाहुणे

**ओळखः**—आधुनिक मराठींतील, विनोद आणि नाट्य—वाङ्मयाला, स्पृहणीय स्वरूप प्राप्त करून देण्याचे कामीं ज्यांचे प्रयत्न कारणीभूत होत आहेत, त्यांमध्येंच श्री. प्रल्हाद केशव अत्रे, (जन्म इ. स. १८९९) यांचें नांव प्रामुख्यानें झळकतें. भावनोत्कट कवि म्हणून प्रथम त्यांनीं वाङ्मयांत प्रवेश केला; त्यानंतर त्यांनीं 'झेंडूचीं फुलें' प्रसिद्ध करून विडंबनपर काव्याची एक विशिष्ट प्रथा मराठींत सुरू केली. गेल्या



पांच सात वर्षांत ‘ साष्टांग नमस्कार ’, ‘ घराबाहेर ’, ‘ लग्नाची बेडी ’, ‘ भ्रमाचा भोपळा’, ‘ वंदे भारतम्’, ‘ पराचा कावळा ’ वगैरे विनोदप्रचुर नाटकें लिहून, रंगभूमीच्या आजच्या पडत्या काळांत तिची त्यांनीं बहुमोल सेवा बजाविली आहे. याखेरीज अलीकडे ते बोलपटांतील संवाद-लेखक, या नात्यानेंहि पुढें आले आहेत. विनोदी वाङ्मयाच्या द्वारें, मनोरंजन आणि मतप्रचार, यांचा मेळ घालणाऱ्या श्रेष्ठ लेखकांत त्यांची गणना होते.

विषयः—कै. केशवसुत यांनीं दंवाचे थेंब या नांवाची एक कविता लिहिली. एक मुलगा आपल्या आईला आपण सकाळीं पाहिलेले दंवाचे थेंब आपल्याला संध्याकाळीं कां दिसत नाहींत व ते येतात कोठून व जातात कोठें, म्हणून विचारतो. त्यामुळें आईला एकदम आपल्या मृत-बालकांची आठवण होते आणि तिचे डोळे अश्रूंनीं भरून येतात. ‘ एवढा तरी लाभूं दे ’ असें स्फुंदत म्हणून ती आपल्या लहान बालकास अधिकच कवटाळून धरते. त्याच कवितेचें विडंबन पाहुणे या कवितेंत आलेलें आहे. मात्र या ठिकाणीं विषय अगदीं निराळा योजिला आहे. घरांत पाहुण्यांची गर्दी झाली म्हणजे अर्थातच लहान मुलांना त्यांच्याबद्दल एक प्रकारचें कौतुक वाटतें. कवीनें या प्रसंगाला मूळच्या कवितेच्या आधारानें कशी विनोदी कलाटणी दिली आहे पाहा ! पाहुणे आले कोठून तर खोकला ताप हीं दुखणीं जिथून ( ज्यांच्यामुळें ! ) येतात तिथून ! आणि ते राहाणार यजमानाला भीड आहे तोंपर्यंत ! शेवटीं पाहुण्यांची एक एक लीला आठवून आई गहिंवरून म्हणते, ‘ देवा, एवढा तरी जाऊं दे ! ’ किती गंमत आहे या कवितेंत !

(केशवसुतांची 'दंवाचे थेंब' ही कविता वाचल्यानंतरच पुढील विनोदी कवितेचें रहस्य लक्षांत येईल.)

" कोठुनि हे आले येथें
काल संध्याकाळीं नव्हते ! !"

पाहुणे पसरले ओटी–
वरि बघुनी आज प्रभातीं

आईला बाळ्या वदला
कुतुकानें उत्सुकलेला.

" दिसती हे कोणी आले
आपुल्याच नात्यामधले !

आई ग तर वद मातें
कोठुनि हे आले येथें ?

तंबाखू पानें खात
कसे पहा बडबडतात

उघडुनी डबा ग अपुला
राजरोस करिती हल्ला !

बाबांच्या पेटींतुन गे
पळविती विड्यांचे जुडगे !

मौज मला यांची वाटे
होते हे तर वद कोठें ?"

" हं हळू बोल " तनयातें
" वर करुनी बोट वदे ते–

" कावळे गिधाडें घारी
   येतीं ही जेथुनि सारीं
डोंगळे, डांस, घुंगुरटीं
   बाळा रे जेथुनि येती,
खोकला ताप हीं दुखणीं
आपणांस येतीं जिथुनी
   तेथुनीच आले येथें
   हे छळावया आम्हांतें. "

" राहतील येथें का ते
   अडवितील का ओटीतें ?
करतिल का भिंतीवरतीं
   ही अशी लाल रंगोटी
जातील कधीं हे आई
   घरदार न यांना कांहीं ? "

" नाहीं रे ते इतुक्यांत
   जाणार गड्या नाहींत !
जोंवरी भीड आम्हांतें
   तोंवरी लाज ना यांतें,
तोंवरी असा बाजार
   सारखा इथें टिकणार !
चडफडणें बघुनी त्यांतें
   असती ते जोंवरि येथें !

टोळधाड कधिं ही इथुनी
  जाणार न लौकर सदनीं !"
"जाणार न लौकर सदनीं !"
  वदतां गहिंवरली जननी
पाहुणे मागले स्मरले
  डोळ्यांतुन पाणी आलें
बहुतेक तयांतिल आतां
  जाहले कुठें बेपत्ता !
निगरगट्ट परि त्यांमधला
  एक मात्र अजुनी उरला !
सरले जरि बारा महिने
  तरि वसे देउनी ठाणें
"देवा रे" मग ती स्फुंदे
  "एवढा तरी जाऊं दे !"
म्हणुनि तिनें त्या बाळाला
  तो महापुरुष दाखविला !
एकेक बघुनि त्या मूर्ती
  गोठली कवीची स्फूर्ती !
वेडावुन तयाच नादें
  "खरेंच" तो पुसतो खेदें
"येती हे रोज सकाळीं
  परि जाती कवण्याकाळीं ?"

—केशवकुमार.

प्रश्नः—बाळानें आपल्या आईला कोणते प्रश्न विचारले ? आईनें त्याला काय उत्तरें दिलीं ? आईनें बाळास हळू बोल म्हणून कां म्हटलें ? आईला कां गहिंवर आला ? शेवटीं कोणतें गूढ कवीस पडलें आहे ?

अभ्यासः—तुम्हांस आवडणाऱ्या एखाद्या कवितेचें निराळ्या स्वरूपांत विडंबन करा.

पुरवणीवाचनः—श्री. अत्रे यांचा 'झेंडूचीं फुलें' आणि श्री. देव यांनीं प्रकाशित केलेला 'उपहासिनी' हे काव्यसंग्रह वाचा.

---

## ३४. हास्यविनोदाचे उपयोग.

ओळखः—आधुनिक मराठी वाङ्मयाला आंतरराष्ट्रीय महत्त्व मिळवून देण्याचें सामर्थ्य ज्यांच्या लेखणीमुळें येत आहे, अशा श्रेष्ठ परंतु दुर्मिळ ग्रंथकारांत, श्री. नरसिंह चिंतामण केळकर (जन्म इ. स. १८७२) यांचा समावेश होतो. 'साहित्याचार्य' ही पदवी त्यांना कशी यथार्थ लाभली आहे याचा प्रत्यय त्यांच्या बहुविध शाखेंतील वाङ्मयनिर्मितीवरून येतो. 'मराठे आणि इंग्रज,' 'आयर्लंडचा इतिहास' 'गॅरिबाल्डीचें चरित्र' अशासारख्या ऐतिहासिक ग्रंथांत ते जितके तन्मय होतात, तितक्याच सहज लीलेनें ते 'तोतयाचें बंड' 'कृष्णार्जुनयुद्ध' यांसारखीं नाटकें लिहूं शकतात. संस्कृत विद्येच्या पुनरुज्जीवनासारखा विषय असो किंवा हास्यविनोदावरील मीमांसा असो, त्यांची पांडित्यपूर्ण लेखणी

दोन्ही ठिकाणीं सारखीच सरसावते. वर्तमानपत्रांतील अनेक प्रासंगिक लेखांखेरीज, अलीकडे त्यांनीं प्रसिद्ध केलेल्या, 'नवलपूरचा संस्थानिक' व 'बलिदान,' या कादंबऱ्या, 'सिमला आणि 'म्हैसूर' यांचीं प्रवासवर्णनें, कथासप्तकांतील कांहीं गोष्टी, स्फुटकाव्यें व टीकात्मक लेख, यांवरून लेखनाचा छंद त्यांना किती लागून राहिला आहे, याची साक्ष पटते.



वरील सर्व पुस्तकांतून त्यांच्या सहजमनोहर लेखन-शैलीचा अनुभव येतोच, पण त्यांतल्या त्यांत लो. टिळकांच्या चरित्रावरून तर तो कांकणभर अधिकच खरा ठरतो. साधी, सोपी पण मनमोकळी भाषा आणि तिच्यांतील यथोचित स्वाभाविक विनोद आणि उपमा, ह्यामुळें त्यांचें वाङ्मय चित्ताकर्षक वाटतें.

केसरी–मराठा या संस्थेंतून सेवानिवृत्त होऊन हल्लीं ते पूर्वींप्रमाणेंच 'मायभूमि' आणि 'मायभाषा' ह्यांच्या सेवेंत अहर्निश झटत आहेत.

**विषय:**—सोबतच्या उताऱ्यांत हास्यविनोदापासून काय फायदे होतात, याचीं घरगुती उदाहरणें घेऊन त्यांवरून विनोदाचें आपल्या आयुष्यांत काय स्थान आहे, याची लेखकांनीं मनोहर चर्चा केली आहे. हास्यविनोदासारख्या साध्या विषयांतही, किती मजेदार अर्थ भरून राहिला आहे पाहा !

एखादे वेळीं गर्दीगर्दीनें गांवाला जावयास निघावें तों आगगाडी चुकावी, असे प्रसंग मनुष्यमात्रास केव्हां ना केव्हां तरी येतातच. समजा, अशा वेळीं गाडी चुकली म्हणून खिन्न होऊन चार लोकांदेखत गुडघ्यांत मान घालून बसणारा मनुष्य घ्या, व दुसरा असा घ्या, कीं आपल्या देखत गाडी सुटलेली पाहून न त्रासतां विनोदानें एवढेंच म्हणतो कीं, " अहो बाई, तुमच्याकरितां आम्ही इतके लांबून धडपडत व धापा टाकीत आलों, असें असतां आमची एका क्षणाची सुद्धां मुर्वत तुम्हीं धरूं नये हें चांगलें दिसतें का ? " असें बोलून हसत परत फिरतो. या दोन मनुष्यांच्या स्थितींची तुलना करून पाहा व सांगा कीं, दोघांचेंहि नुकसान व अडचण सारखीच असतां, त्यांपैकीं सुखी कोण व दुःखी कोण ?

समजा आपण पायगाडीवर बसून जोरांत चाललों आहों. असें असतां एखादे वेळीं एखादें खेळकर व खोडकर मूल मुद्दाम होऊन पुढें तरी येतें किंवा जागचें हालत तरी नाहीं. किंवा आपण त्यास चुकविण्याकरितां डावे उजवे हाताला वळावें तों तेंहि उजवी डावी बाजू घेऊन नेमकें पुढेंच येतें. अशा वेळीं प्रथम चटकन् रागाचा व त्रासाचा झटका येतो. परंतु त्रासिक मनुष्य त्याजवर व आपल्यावर रागावून त्याला चार शिव्या देत व आपणासहि चार शिव्या घेत निघून जाईल, किंवा त्या मुलाचे वतीनें कोणी बोलूं लागल्यास वर्दळीवरहि येईल. आणि एकदां रागाच्या शब्दांची किंवा शिव्यांची सलामी दोहों पक्षांकडून झाली म्हणजे मग तो तंटा किती विकोपास जाईल किंवा अखेर काय परिणाम होईल हें देव जाणे ! विनोदी मनुष्याची तऱ्हा याहून वेगळी असते. अशा प्रसंगीं तो हें चटकन लक्षांत आणील, कीं रस्त्यावर खेळण्याचा

लहान मुलांचा हक्क निसर्गसिद्धच आहे व येणाराजाणाराशीं गमतीनें वागणें हें त्यांच्या खेळांपैकींच एक अंग आहे. अशा वेळीं समजा कीं, गाडी पडून मोडली तरीहि अपघात विशेषच मोठा नसेल तर तो " आतां या गाडीला तिच्या डॉक्टरकडे नेलें पाहिजे " एवढेंच म्हणून हांसून भागवून नेईल. किंवा अपघात न होतां मुलास चुकवून जातां आलें तर मागें वळून तो एवढेंच म्हणेल कीं, " का कशी झाली फजीती ? दिली कीं नाहीं झुकांडी ? " असें झालें असतां तो स्वतः, तें मूल व आसपासचे लोकहि सर्व जण मिळून हसून जो तो आपल्या कामास निघून जाईल.

एकादे वेळीं गाडींतून उतरतांना नकळत दारांत आपलें धोतर सांपडलेलें असावें व आपणांस जलदीनें उतरतां येऊं नये, अशा वेळीं कोचमनला व्यर्थ शिव्या हासडणारे व रागावून अकांडतांडव करणारे लोक ज्याप्रमाणें जगांत असतात, त्याचप्रमाणें दुसरेहि असे कित्येक असतात कीं, ते अशा वेळीं एकादी कोटी करून किंवा विनोदाचें भाषण करून तो अडचणीचा क्षण हास्यालाच कारणीभूत करितील.

अंधाऱ्या रात्रीं रस्त्यानें जातांना आपण अडखळून पडलों असतां म्युनिसिपालिटीला शिव्याशाप देऊन आपल्या जीवाला त्रास करून घेणें ही एक गोष्ट घ्या, आणि " आतांशा आमच्या कमिटीच्या रोषणाईची व्यवस्था इतकी चांगली आहे कीं, तिचे कंदील पाहण्यास घरचे कंदील न्यावे लागतात " एवढेंच म्हणून व उठून आपल्या मार्गानें जाणें ही दुसरी गोष्ट घ्या. यांपैकीं शहाण्या माणसानें कोणती पत्करावी याबद्दल बहुधा वाद होणार नाहीं.

समजा, आपण नाटक पाहावयास गेलों आहों व आपल्या

समोरच्या खुर्चीवर बसलेल्या गृहस्थाचें पागोटें भलें मोठें असल्या-कारणानें मौज पाहाण्यास आपल्यास व्यत्यय येत आहे. अशा वेळीं "अहो, नाटक पाहावयास यावयाचें तर असलीं चाकासारखीं पागोटीं घरीं ठेवून यावीं, समजलांत का? आम्ही मागच्या खुर्चीवर बसलों असलों तरी तुमच्यासारखेच आम्हांलाहि पैसे मोजावे लागले आहेत. काढा तें पागोटें अगोदर, नाहींतर म्यानेजरास कळवीन." असें बोलून त्याचें प्रत्युत्तर ऐकून घेणें व शेवटीं भांडाभांडी करून स्वतःच्या व लोकांच्या करमणुकीस व्यत्यय आणून पोलिसापर्यंत मजल नेणें हा एक मार्ग आणि समोरच्या गृहस्थास, "काय हो, स्टेजवर काय चाललें आहे तेवढें सांगाल का?" असें विचारून व्यंग्यार्थानें पागोट्याची अडचण त्याच्या नजरेस आणून देणें, किंवा थट्टेनें "रावसाहेब, आज फार उकडतें आहे? नाहीं" असें म्हणणें व अर्थातच "कां हवेची चौकशी चाललेली आहे? पागोटेंबिगोटें तुमच्या दृष्टीआड येतें कीं काय?" असें विनोदी उत्तर त्याजकडून घेऊन आपला हेतु साधणें हा दुसरा मार्ग. यांपैकीं चांगला कोणता हें आम्हीं सांगावयास नकोच. एखादा भिक्षुक येऊन खनपटीस बसून त्रास देत आहे, अशा वेळीं त्याजवर रागवून "काय हो, शंभर वेळां सांगितलें तरी तुम्हांला कळत नाहीं का? उठतां कीं हाताला धरून घालवूं?" असें म्हणणें बरें? कीं "भटजीमहाराज, ऊन तर होत चाललें, आपल्याला आणखी चार ठिकाणीं जायचें असेल; दुसरे चार लोक हातांत दक्षिणा घेऊन आपली वाट पाहात बसले असतील, त्यांची आपण निराशा करणार कीं काय?" असें म्हणणें बरें?

एखादे वेळीं कुलूप काढायला जावें तों तें गंजून गेल्यामुळें

निघूंच नये असें होतें. अशा वेळीं कोणीतरी कुलूप बिघडविलें खास, अशा समजुतीनें कारण नसतांहि घरच्या पोरांबाळांस अथवा चाकरनोकरांस शिव्या हासडणारीं, किंवा आपल्या गैरमर्जीची मजल कुलपांच्या कारखानदारापर्यंत नेऊन "कुलुपें गंजतात म्हणजे काय? अलीकडे सर्वच कारखाने चोरांचे बाजार झाले आहेत. याबद्दलचा वर्तमानपत्रांतून गवगवा केलाच पाहिजे" वगैरे म्हणणारीं माणसें वेगळीं. आणि अचेतन कुलपासच उद्देशून "का, स्वारी आज रुसली आहे वाटतें? तेल पाहिजे का थोडेसें प्यायला?" इतकेंच म्हणून जाणारीं माणसें वेगळीं.

कथा ऐन रंगांत आली असतां एखादें मूल रडूं लागावें व तसें झालें असतां हरदास मूर्ख असेल तर तो "अहो बाई, त्या मुलाला गप्प कराल किंवा नाहीं? लोकांनीं माझी कथा ऐकायला यायचें कीं तुमच्या मुलाचें रडणें ऐकायला यायचें?" असें बोलून आपल्या स्वतःस त्रागा करून घेईल व त्या बिचाऱ्या माउलीस आपला जीव नकोसा करून टाकील. परंतु त्याचे जागीं एखादा विनोदी हरदास असेल तर "लहान बालकें हीं राजेलोकांप्रमाणेंच शीघ्रकोपी असतात; त्यांचें समाधान करण्याचे श्रम काय असतात हें गोकुळच्या यशोदेला जाऊन विचारावें म्हणजे कळेल" असें म्हणेल व लहान मुलांवर एखादी गोष्ट सांगून सर्वांस क्षणभर हास्यसुखाचा लाभ करून देईल.

अशा प्रकारचीं उदाहरणें जितकीं द्यावीं तितकीं थोडींच; परंतु त्या सर्वांचें तात्पर्य हेंच कीं संसारांतील लहान सहान अडचणींचा किंवा संकटांचाहि परिहार विनोदानें जितका होतो तितका रागावून किंवा त्रास करून होत नाहीं. कित्येक गोष्टी हलक्या हातानें केल्या तरच त्या साधतात हें आपण नेहमीं पाहातों. विनोद दृष्टीनें

अडचणींकडे पाहाणें म्हणजे त्यांच्या परिहारास जो एक प्रकारचा सफाईचा हात लागतो त्याचा उपयोग करण्यासारखें आहे. अशा प्रसंगीं साधु लोक परमार्थदृष्टीनें जें समाधान स्वतःस प्राप्त करून घेतात, तेंच संसारी लोक विनोदानें करून घेतात. आपल्या रागीट बायकोनें प्रथम शिव्या देऊन नंतर डोक्यावर घाण पाणी टाकिलें हें पाहून "विजेच्या कडकडाटानंतर व मेघगर्जनेनंतर पर्जन्यवृष्टि झालीच पाहिजे," असें म्हणणाऱ्या सॉक्रेटिसाच्या अंगचा विनोद जरी आपणां सर्वांमध्यें नसला, तरी पण प्रत्येकास बऱ्याचशा सांसारिक अडचणी व संकटें यांचा परामर्ष विनोदी मनानें घेतां येईल यांत संशय नाहीं. यदृच्छा किंवा इंग्रजींत जिला "circumstances" असें म्हणतात, तिचा व मनुष्यमात्राचा सामना विषम आहे; म्हणजे एका बाजूस सर्व शक्तिमान् यदृच्छा व दुसरे बाजूस अल्पशक्तिमान् असे आपण मानवी प्राणी आहोंत. आणि असें हें विषमद्वंद्व, जोंपर्यंत आपणास जगावयाचें आहे तोंपर्यंत चालणारच. ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे मग इतरांनीं हातघाईवर किंवा उपायीं न येतां, विनोदरूपी मायावी शक्तीची अराधना करून, तिच्या सामर्थ्याची मदत आपणांस घेतल्याशिवाय या द्वंद्वांत यश मिळणार नाहीं, अशी खात्री पटते.

कोणत्याहि अडचणीचा प्रत्यक्ष परिणाम म्हणजे पदार्थसृष्टीवर घडणारा व दुसरा अप्रत्यक्ष म्हणजे आपल्या मनावर होणारा, असे दोन प्रकारचे असतात. पैकीं विनोदानें प्रत्यक्ष परिणाम होऊं शकणार नाहीं हें उघडच आहे. त्याला योग्य अशी परिहारकारक कांहीं तरी क्रियाच केली पाहिजे. परंतु अप्रत्यक्ष म्हणजे मनुष्याच्या मनावर होणारा परिणाम विनोदानें बराच कमी करतां येतो. विनोददृष्टीमुळें संकटाच्या अगर अडचणीच्या प्रत्यक्ष

परिणामाचें भय वाटणार नाहीं. त्याचें स्वरूप आहे त्याहून थोडेंसें कमी असेंच वाटेल. अप्रत्यक्ष परिणामासंबंधानें पाहातां एरव्हीं संकटमय अशी वस्तुस्थितीची जी बाजू आपणांस दिसत नाहीं, ती दृष्टि विनोदी झाली असतां आपणांस दिसूं लागते.

संकटें जितकीं मोठीं तितका त्यांचा परिहार केवळ विनोद-बुद्धीनें होणें कठीण आहे हें उघड दिसतें. तथापि, तन्निवारणार्थ अवश्य असे उपाय मनुष्यमात्र करीत असतां, त्यास विनोदानें मार्गांत एक प्रकारचा आराम मिळतो. दीर्घनिश्चयी व विचारी माणसें धैर्यानें व नेटानें संकटाशीं हळूहळू झुंजत असतां, त्यांची करमणूक न होईल तर त्यांस मनावर पडणारा ताण फार काळ-पर्यंत सोसतां येणार नाहीं. त्यामुळें इतिहासांत जे दीर्घोद्योगी पुरुष म्हणून नांवाजले गेले ते विनोदीहि होते, असें दिसून येईल.

हास्यविनोद ही देणगी दैविक आहे. तिचा उपयोग आध्यात्मिक किंवा पारमार्थिक रीतीनेंहि करतां येणें शक्य आहे. विनोद ही वस्तुस्थितीवर टीका करण्याची एक रीति आहे व विनोद कर-णारा मनुष्य तात्त्विक विचारांत जितका मुरलेला असेल, तितकी त्याच्या विनोदाला म्हणजे टीकेला अधिक किंमत येईल. विनोद-शीलता अंगीं येण्यास मन विकसित असावें लागतें. परंतु केवळ सांसारिक मनुष्याचा विनोद व तत्त्वज्ञान्याचा विनोद यांमध्यें अर्थी-तच पुष्कळ फरक पडेल. एकंदर जीविताविषयीं आपली कल्पना काय आहे हें ठरलें, म्हणजे विनोदाला जीवितक्रमामध्यें कोणतें स्थान देतां येईल, हें आपणांस ठरवितां येतें. तत्त्वज्ञानानें मनु-ष्याला वस्तुमात्रांतील अविनाशीं कोणचें हें कळून येतें. वस्तु-स्थितीचें स्वरूप व तिचा खरा अर्थ यांचा विवेक करतां येतो. याच कामांत हास्यविनोदाची मदत होऊं शकते. तत्त्वज्ञानी

मनुष्य आपल्या तत्त्वज्ञानरूपी पंखांच्या साहाय्यानें भरारी मारून वर गेला म्हणजे मग लोकसमाजाचीं मतें व त्याचीं मतें यांमध्यें फरक पडतो. जग असावें कसें व असतें कसें, या दोन कल्पनांमधील अंतर त्याचे दृष्टीनें लोकदृष्टीपेक्षां अधिकाधिक होत जातें. मोठया अशा मानलेल्या गोष्टीं लहान दिसूं लागतात. कित्येक लहान अशा दिसणाऱ्या गोष्टींचें महत्त्व लोक मानतात त्यापेक्षां तें अधिक आहे असें वाटूं लागतें. अर्थात् जनसमूहाची दृष्टि व तत्त्वज्ञानाची दृष्टि यांमध्यें फरक पडतो. विषमता दाखविणारें हें तत्त्वज्ञान हास्यप्रवण असावें असें सकृद्दर्शनीं म्हणावेंच लागतें व तें खरेंहि आहे. आतां कांहीं कांहीं प्रकारच्या तत्त्वज्ञानपद्धतींत हास्यविनोदाला फाटा दिलेला असतो व कांहीं तत्त्ववेत्ते मुळींच विनोदी नव्हते असेंहि आपणांस आढळून येतें. याचें कारण मात्र असें कीं, तत्त्वज्ञानी बनल्यावरहि मनुष्यमात्रा-संबंधानें जितकें प्रेम ठेवावयास पाहिजे, तितकें त्या पद्धतींत व त्या तत्त्ववेत्त्यांमध्यें राहिलेलें नसतें आणि मनुष्यजातिविषयक प्रेम मनांत असल्याशिवाय विनोद होणें शक्य नाहीं, इतकेंच काय तें. परंतु तत्त्वज्ञान मनांत एका बाजूनें शिरलें म्हणजे लगेच दुसऱ्या बाजूनें हास्यविनोदानें निघून गेलेंच पाहिजे असें नाहीं.

विनोद हें गंभीर व खेळकर अशा दोन परस्परविरुद्ध वृत्तींचें मिश्रण आहे. संसाराची कोणतीहि उपपत्ति घेतली तरी ती समर्पक रीतीनें सर्वांशीं लागू पडत नाहीं. या गोष्टीमुळेंच तत्त्वज्ञानी हा विनोदी बनण्याचा संभव उत्पन्न होतो. आनंदवाद किंवा सदाशा-वाद घेतला तर त्याच्याशीं संसारांत प्रत्यक्ष अनुभवास येणाऱ्या दुःखाचा मेळ चांगलासा घालतां येत नाहीं; म्हणजे ज्याला मनुष्य-मात्राबद्दल खरी कळकळ व सहानुभूति आहे अशा मनुष्यास अद

सांगितलें कीं, सकृद्दर्शनीं जीं दुःखें म्हणून दिसतात तीं दुःखें नसून जीविताच्या किंवा जगाच्या आनंदरूपी होणाऱ्या पर्यवसानाचीं साधनें आहेत,तर तें त्यास फारसें पटावयाचें नाहीं. परंतु अशा रीतीनें आनंदवाद किंवा सदाशावाद ज्यास सर्वांशीं संमत नाहीं असा मनुष्य जर विनोदी असेल तर तो निराशावादी किंवा दुःखवादी बनणार नाहीं. फक्त संसार हा दैवाचा मनुष्याशीं एकप्रकारचा खेळ आहे असा विचार त्याचे मनांत येईल. तसें झालें म्हणजे अर्थातच गंभीर व गमतीचा अशा विचाराचें मिश्रण होऊन त्यास विनोदप्रचीति होईल व हंसू येईल. त्याला स्वस्वरूपाच्या अज्ञेयत्वाबद्दल निव्वळ खेद न वाटतां तो आपल्याशीं बहुधा असें म्हणेल कीं, " हें सर्व गौडबंगाल दिसतें. कोणचीहि उपपत्ति घेतली तरी ती पुरत नाहीं व सर्वांशीं लागू पडत नाहीं. तेव्हां जाईना का ? उगाच उपपत्ति रचित बसण्याचे श्रम कशाला घ्या ? आहे ह्या स्थितीचें मनन केलें म्हणजे गंमत व हास्यानंद होतो तेवढाच आपला खरा. "

आध्यात्मिक किंवा पारमार्थिक विचार व विनोद यांचा वरील-प्रमाणें संबंध आला आहे. परंतु तोहि बाजूस ठेवून आपण विचार करूं लागलों तरी जगांतील नीति वाढविण्यास विनोदाचा अप्रत्यक्षरीत्या उपयोग होतो हें सूक्ष्म दृष्टीनें पाहाणारास कळून येईल. अनीतीचें आविष्करण करण्यास विनोदासारखें दुसरें कोणचेंच साधन नाहीं. अनीतीची निंदा केवळ रागानें केली असतां ती उलटून एखाद्या बेफाम घोड्याप्रमाणें उपायी येण्याचा संभव असतो. परंतु विनोदाच्या मऊ अशा शलाकेनें अनीतीच्या सदोष दृष्टींत अंजन फिरलें असतां ती हळूहळू निवळूं लागते. खुद्द विनोदी स्वभावाला तुम्ही सद्गुणांच्या यादींत घाला

किंवा न घाला, परंतु त्याच्या हातून जो नैतिक उपयोग होतो त्याबद्दल तरी वाद नाही.

पण विनोदालाच सद्गुण म्हणण्यासहि कांहीं हरकत आहे असें आम्हांस वाटत नाहीं. ज्याच्यापासून मनुष्याला स्वतः इतकें सुख होण्याचा संभव आहे व ज्याचे हातून दुसऱ्याची इतकी सुधारणा होणें शक्य आहे, त्यास सद्गुण कां म्हणूं नये हें आम्हांस कळत नाहीं. मनुष्याचे मनांत पापबुद्धि किंवा कित्येक दुष्ट व निंद्य विचार असूनहि त्याला एकप्रकारचें हसूं येईल. परंतु अशा प्रकारचें दोषी हास्य वगळलें असतां, इतर प्रकारचे म्हणचे निर्दोष हास्य ज्यास येतें ते खरोखर धन्य होत. प्रसिद्ध तत्त्ववेत्ता कार्लाइल यानें एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, ज्या मनुष्यास आयुष्यांत एकदां तरी खळखळून व मनसोक्त हसूं आलें असेल तो मनुष्य अगदीं टाकाऊ असणें कधींहि शक्य नाहीं. "No man who has onco wholly and heartily laughed can be altogether irreclaimmably bad. In cheerful hearts there is no evil." त्याच्यांत कांहींना कांहीं तरी चांगले गुण असणें शक्य आहे. निदान इतकें तरी कबूल करावें लागेल कीं, तो असल्याशिवाय कोणताहि मनुष्य, मग तो इतर रीतीनें कितीहि सद्गुणी असो, पूर्णतेस पोंचला असें म्हणतां यावयाचे नाहीं. सद्गुणास सुस्वभावाची जोड असल्यावाचून चालावयाचें नाहीं. विनोदशीलता हा सुस्वभावाचा सर्वांत मुख्य घटक आहे. कारणाशिवाय दुसऱ्यास न दुखविणें, त्यास खूष ठेवण्याचा योग्य प्रयत्न करणें व त्याजविषयीं एकतऱ्हेचा कृपाळूपणा मनांत वागविणें, या आपल्या स्वभावगुणांनीं विनोदी मनुष्य स्वतःच्या व दुसऱ्याच्या सुखास व आनंदास कारणीभूत होतो.

मनुष्यकृत दुःखांधकार घालविण्यास मनुष्यकृत विनोदासारखें दुसरें कोणतेंहि तेज प्रभावी होऊं शकत नाहीं. कोट्या करणारा मनुष्य हा मनुष्यजातीचा एक श्रेष्ठ उपकारकर्ता आहे असें मानावें लागतें. शुद्ध भावानें केलेला विनोद हा एकप्रकारचा स्निग्ध असा गिलावा आहे. त्याचे योगानें स्नेह्यांतील स्नेह आणि मानवी कुटुंबांतील मनुष्यांचें परस्पर प्रेम हें बळकट होतें. केवळ एकमेकांबद्दल आदर बाळगणाऱ्या स्नेह्यांचा स्नेह, आदर असूनहि ज्यामध्यें विनोदशीलता आहे अशा स्नेह्यांतील स्नेहापेक्षां, कमी रम्य, कमी सुखकर व कमी टिकाऊ असतो. त्याचप्रमाणें असें एखादें कुटुंब घ्या कीं, ज्यांतील माणसें फक्त आपापल्या नात्याचे संबंध जाणून परस्परांशीं वागतात; व दुसरें एक कुटुंब असें घ्या कीं, त्यांतील मनुष्यें हा नात्याचा संबंध न विसरतां मित्रत्वाचे नात्यानें हंसून खेळून व्यवहार करितात. या कुटुंबांपैकीं अधिक सुखप्राप्ति कोणाला बरें होईल? कित्येक कुटुंबांत मुलास मुलें झालीं तरी तो आपल्या बापापुढें उभाहि राहत नाहीं, किंवा वानप्रस्थाश्रमास योग्य झालेल्या नवराबायकोचें मनोगत दिवसा परस्परांस कळवावयाचें झालें तर त्यांना कोर्टांतल्याप्रमाणें दुभाषा लागतो. यांतच कायतें खरें बाळबोध वळण आहे अशा समजुतीनें आपल्या घरच्या या फाजील मर्यादेचा अभिमान बाळगणारीं व विनोदशत्रु अशीं कित्येक कुटुंबें अद्यापीहि आढळुन येतात. याच्या उलट समजा कीं, एखाद्या कुटुंबांत भाऊभाऊ, नवराबायको, आईबाप व मुलेंमुलें, हीं सर्व परस्पर मिळूनमिसळून नेहमीं बोलतात, चालतात, बसतात, उठतात, जो तो आपापल्या बुद्धिशक्तीप्रमाणें युक्तिवाद, कोटया व विनोद करितो, दुसरा—मग तो लहान असो किंवा वडीलधारा असो—आपल्या बुद्धिशक्ति-

प्रमाणें त्या युक्तिवादास, त्या कोट्यांस व त्या विनोदास संवादी असें प्रत्युत्तर देतो व सर्वजण मिळून सर्वजणांची हास्यविनोदाद्वारें करमणूक करितात. अशी स्थिति असेल तर त्या कुटुंबास पृथ्वीवरच स्वर्गसुखाचा अवतार झाला आहे, असें मानण्यास काय हरकत आहे ? " A good laugh is a sunrise in a house " असें आंग्लकवि टेनिसन ह्यानें म्हटलें आहे, व तें अगदीं यथार्थ आहे. शिक्षणशाळांचीहि अशीच गोष्ट आहे. शिक्षक व छात्रगण यांनीं मिळून विनोद केला म्हणजे गुरुशिष्यांच्या नात्यास रजाच मिळाली असें मानण्याचें कारण नाहीं. एवढेंच नव्हे तर जो गुरु विद्वान् असून विनोदीहि असतो, तोच शिष्यवर्गास विशेष प्रिय व मान्य होतो.

—न. चिं. केळकर

प्रश्न:—विनोदानें अप्रिय गोष्टीहि सुखावह करून घेतां येतात, त्या कशा ? हास्यविनोद ही देणगी दैविक आहे असें कां म्हटलें आहे ? तत्त्वज्ञानी हा विनोदी केव्हां बनतो ? जगांतील नीतीचा, सद्गुणाचा आणि विनोदाचा संबंध काय ? दररोजच्या व्यवहारांतील विनोदाचें स्थान काय ?

अभ्यासः—( अ ) खालील वाक्यांतील कल्पना अधिक स्पष्ट करा.

( १ ) संकटें जितकीं मोठीं तितका त्यांचा परिहार केवळ विनोदबुद्धीनें होणें कठीण आहे हें उघड दिसतें.

( २ ) विनोद हें गंभीर व खेळकर अशा दोन परस्परविरुद्ध वृत्तींचें मिश्रण आहे.

( ३ ) विनोदाला सद्गुण मानण्यासहि कांहीं हरकत आहे असें आम्हांस वाटत नाहीं.

( ४ ) विनोदाच्या मऊ अशा शलाकेनें अनीतीच्या सदोष दृष्टींत अंजन फिरलें असतां ती हळूहळू निवळूं लागते.

(ब) तुम्हांला परीक्षेत अपयश मिळालें, तुमच्या क्रिकेटच्या संघाचा पराजय झाला, पोस्टांत तुम्हीं टाकलेलीं महत्त्वाचीं पत्रें मध्येंच गहाळ झालीं, अशा वेळीं विनोदबुद्धीनें तुम्ही त्यांचें परिमार्जन कसें कराल, तें लिहा.

**पुरवणीवाचनः**—श्री. न. चिं. केळकर यांनीं लिहिलेली, 'माझी आगगाडी कशी चुकली' ही गोष्ट आणि श्री. पण्डित सप्रे यांचा 'अर्धचंद्र' हा कवितासंग्रह वाचा.

---

# ३५. कलहांतील आनंद

**ओळखः**—श्री. भास्कर कवीश्वर व्यास हे ज्ञानेश्वरांच्या अगोदर प्रसिद्धीस आलेले महानुभाव पंथांतील श्रेष्ठ कवि होत. ह्यांनीं शके ११९५ त 'शिशुपालवध' या नांवाचा काव्यग्रंथ लिहिला. मराठी भाषेंतील पहिलेंच महत्त्वाचें ललित काव्य म्हणून त्याचा लौकिक आहे. भास्करभट्ट यांचा जन्म निजामचे राज्यांतील कासारबोरी येथें झाला. त्यांचें शिक्षण पैठण व काशी या ठिकाणीं झालें. तीव्र बुद्धि, पांडित्य, आणि शीघ्र कवित्व यांमुळें हे तत्कालीन रसिकवर्गास प्रिय झाले.

**विषयः**—प्रस्तुतचा उतारा शिशुपालवध या काव्यांतून घेतला आहे. श्रीकृष्णाच्या भेटीस द्वारकेस नारद आल्यावर, उद्धवदेवानें त्याच्या स्वभावावर विनोदपूर्ण टीका केली. नारदाचें आगमन म्हणजे कलीला पाचारण, असा सर्वांस अनुभव होता. परंतु श्रीकृष्ण हा शांत स्वभावाचा असल्यामुळें, नारदाला आपल्या आंगांतील कला दाखविण्यास संधि मिळणार नाहीं असें उद्धवानें विनोदानें म्हटलें. त्यावर नारदानें आपल्या स्वतःच्या साळसूद स्वभावाचें वर्णन केलें. 'कलीचा नारद' असा आपला लौकिक उगाचच झाला आहे असें त्याचें म्हणणें होतें. शेवटीं मणिकर्णिकेस जाऊन हरिहरि करीत आपण स्वस्थ राहाणार हे नारदाचे उद्गार किती विनोदपूर्ण आहेत.

ज्ञानेश्वराच्या पूर्वीच्या भाषेचा एक नमुना आणि जुन्या काव्यांतील एक विनोद स्थल या दृष्टीनें या उताऱ्यांत तुम्हांस काय विशेष आढळून येतें तें पहा.

तंव भणे उद्धवदेवो । तुमची नीका भक्ति-भावो ॥
गोसावी एतखेवो । जाणीतिला ॥
आताचीं भणतु होतें । सापें नारद न एती एउतें ॥
कांई लावकैआं केउतें । आराती चि ना ? ॥
तंव मेयां भणितलें । ना जी अधुनां तेहीं तें सांडिलें ॥
हळूं हळूंची धरिलें । पदस्थ-पण ॥
तेंवी ची तुम्हीं केलें बीजे । तरी आलें ती कह्वणें कांजे ॥
तें स-विशेषें विणाविजे । झडकरी ॥
देशकाळें निऱ्हा रोडिकें । कांई कळींचा कामठा न पिकें ॥
कीं बाधिलेती आरोचकें । झोंबिआं विणूं ॥
न होअेंची झुंज भांडण । तऱ्हीं तुम्हां नाहीं खाजें जेवण ॥
कांई पुसो रोडकेंपण । जिआं हांचि लाभू ॥
नाहीं केउतां झोंटधरणी धडाडा । तरी काइसा वेळुं फुडा ॥
काळु जातुसे खडाडा । कळीं वीणा ॥
जादवांचिअें राणिवें । कव्हणा ही जुंझ नोवे ॥
श्रीकृष्णाचेनि नांवें । तंवं रांगूचि नाहीं ॥
भणौनि तुम्हां आयास । पडिताती उपवास ॥
आतां गमाल दीस । कव्हनीं परी ॥
देशी कांई वळें वर्ते । हें सांगा पां निरुतें ॥
लावाल कलहो नव्हतें । हें फुडें कीरूं ॥
तुमतें एतां देखिलें । तैंची माझा जीवें धुस गेलें ॥

कांई सांघाल उदैलें । तें जाणवें ना ॥
तंवं कें नारदु भणें । धुरांचा ठाईं एसनें बोलणें ॥
हें तुम्हां साजें मंत्रिपणें । एरां बोलों न अे ॥
आमुतें भणतीं काळि-लावें । तरी आम्ही काइसें आ बोलावें ॥
कां निवांतू ची नसावें । आपुलां ठाईं ॥
फुन तुमचेनि रागें । जरी असों ची उगें ।
तरी आमुचें पोटु फुगें । न बोलतां ॥
आपुलेंनि रागीटपणें । जरी होती भांडणें ॥
कीं मातें भणती नारदें एनें । लावकै केली ॥
एनें चि कारणें । मिया सांडिलें कैलासा जाणें ॥
भणती शंभू सी विघडणें । एणें ची केलें ॥



एकवळु मी कैलासां गेलां । तंव भणतीं हा काळि-लावा आला ॥
टाटावोनि बांधा वहिला । एऱ्हवीं जाइलु हा ॥

ते व्हेळीं घेवोनि विवसी । मीं जालां तापसीं ॥
जपतुसें वारानशी । तिअे दीवोनी ॥
एऱ्हवीं चाहाडा चाहाडी ची गोडी । ब्रह्म—विद्ये नाहीं फुडी ॥
स्वर्गे न लहाअे एकु कवडी । तें पावोनी ॥
आनंद होअे गोडु । फुन तो ही नावेकू रांकडू ।
भणौनी करौ न अे पाडूं । लावकें ऐसीं ॥
याचीं गोडियां सांडौ न शके । एऱ्हवीं हें काई नीकें ॥
जें लिपीजें पातकें । वायां वीण ॥
आतां सांडिलें उटें–रेटें । मज कोन्हाचे कांहीं न वटे ॥
पुण्य जोडावें गोमटें । हा ची लाभु ॥
तनु झाली म्हातारी । जिआवें दीसु दोनि च्यारी ॥
तंवं भणावें हरि हरि । मणिकर्णिकें सी ॥

टीपाः—भणे–म्हणें. नीका–खरा. एतखेओ–येताक्षणींच. सांपे–सांप्रत. एउतें–इकडे. लावकैआ–लावावी. आराति–उत्पन्न होती. पदस्थपण–गंभीरपण, मोठेपण. बीजें केलें–येणें केलें. निन्हां–अगदीं. कामठा–कामधंदा. झोंबिआ–भांडण. अरोचक–चव नसणें, आजार. खाजें–खाद्य. जिआं–जिवंत आहात. झोंटधरणी–केसांची ओढाताण. फुडा–फुकट. खडाडा–भराभर. राणिवें–राज्य. गमाल–गमवाल, घालवाल. नव्हतें–नसतें. धुस गेलें–धस्स झालें. धुरांचा ठाईं–मोठया पदवीस गेलेल्यास. फुन–पुन्हा. लावकै–कलागत. टाटाओनि–करकचून. दिवोनी–दिवसांपासून. नावेकु–क्षणभर. पावोनी–मिळवून. रांकडू–नीरस. उटें रेटें–उठाठेव. जिआवें–जगावें. ममिकर्णिकेसी–काशीच्या मणिकर्णिका घाटावर.

प्रश्नः—उद्धवदेवानें नारदावर कलहप्रिय म्हणून केलेल्या आरोपाचें नारदानें कसें समर्थन केलें ? नारदाची विनोदवृत्ति ज्यांत प्रकट झाली आहे, अशा ओव्यांचा सरळ अर्थ लिहा.

अभ्यासः—( १ ) नारदाच्या स्वभावाचें वर्णन करा. ( २ ) श्रीकृष्ण, उद्धव आणि नारद यांच्या भाषणाच्या आधारें एक नाट्यप्रवेश तयार करा. ( ३ ) तत्कालीन मराठीचे कोणते विशेष तुमच्या लक्षांत येतात तें लिहा.

---

# ३६. आंबट द्राक्षें.

ओळखः—( लेखक-परिचय ) धडा दोन पाहा.

विषयः—सोबतची गुजगोष्ट घरगुती प्रसंगावर उभारलेली आहे. लहान मुलांची अशी तऱ्हा असते कीं, त्यांना आपल्याजवळ असलेल्या वस्तूपेक्षां दुसऱ्याजवळ असलेली वस्तूच अधिक आवडते. यावरून लेखकानें मनुष्यस्वभावाचा कसा ठोकताळा बसविला आहे, तो तुम्हांस खालील गोष्टींत वाचावयास मिळेल. इसापनीतींतील आंबट द्राक्षांच्या गोष्टीचा संबंध या ठिकाणीं कशाकरितां आला आहे, तो तुम्हीच वाचून ठरवा.

**पाहुण्यानें रिक्त हस्तानें जाऊं नये म्हणून त्यांच्या घरीं जातांना मी त्यांच्या दोन मुलांसाठीं खेळणीं घेऊन गेलों. त्या दोन मुलांचीं वयें लक्षांत घेऊनच मीं तीं खेळणीं खरेदी केलीं होतीं. तीं मिळतांच तीं दोन्ही मुलें खूष होतील, अशी माझी कल्पना होती. पण झालें तें निराळेंच.**

त्यांपैकीं थोरला मुलगा प्रथम कांहीं वेळ त्याला मिळालेल्या खेळण्यावर खूष होता. पण नंतर धाकट्या मुलीला मिळालेली बाहुली जेव्हां त्याच्या दृष्टीस पडली, तेव्हां ती आपल्याला पाहिजे म्हणून तो हट्ट धरून बसला, अन् आपल्या हातांतील आगगाडी त्यानें फेकून दिली. मी आणि त्याच्या वडिलांनीं त्याला परोपरीनें सांगून पाहिलें कीं, " मुलीसारखं बाहुलीशीं खेळणं मुलाला शोभत नाहीं; शिवाय ती बाहुली अगदींच कमी किंमतीची होती, अन् ती लवकरच मोडण्यासारखी होती. आगगाडी किती तरी भारी किंमतीची अन् छान. किल्ली देतांच खोलीच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत भरवेगानें धांवणारी; आणि धांवतांनाच तिची शिटी वाजत होती, ती किती हुबेहूब खऱ्या आगगाडीच्या शिटीसारखी. आमचें म्हणणें त्या मुलाच्या मनावर बिंबविण्यासाठीं आम्हीं चार वेळां ती आगगाडी किल्ली देऊन फिरवून सुद्धां दाखवली त्याला ! अन् दर वेळीं चेहरे असे केले अन उद्गार असे काढले कीं, जणूं आम्हांला कुणीं ती दिली असती तर आम्ही स्वतःला कृतकृत्य समजलों असतों !

पण त्या मुलाची समजूत कांहीं केल्या पटेना. त्या आगगाडी-कडे किंवा एखाद्या पटाईत विक्रेत्याप्रमाणें आम्हीं तिचें जें गुण-वर्णन चालवलें होतें, त्याकडे त्याचें लक्ष नव्हतें. रडव्या सुरांत त्याचा एकच मंत्र चालू होता !

" मला ती बाहुली पाहिजे. "

त्याच्या त्या विचित्र हट्टानें चिडून त्याचे वडील अखेर त्याच्या-वर संतापून ओरडूं लागले. आणखी मीं त्यांना आवरलें म्हणून, नाहींतर त्यांनीं त्याला कदाचित् मारलेंहि असतें.

लहान मुलांची ही ठराविक तऱ्हा आहे, नाहीं का ? चार

मुलांना चार वस्तु तुम्ही द्या. आपल्याला मिळालेल्या वस्तूवर ती चारी मुलें संतुष्ट होतील हें कधीं शक्यच नाहीं. स्वतःला जें मिळालें त्यापेक्षां दुसऱ्याच्या हातांतलें अधिक चांगलें, असें प्रत्येक लहान मुलाला वाटत असतें.

आणखी तसेंच पाहिलें तर ही असमाधानाची वृत्ति मोठया माणसांच्या ठिकाणींसुद्धां नसते, असें थोडेंच आहे? किंबहुना माझ्या भोंवतालच्या प्रत्येक माणसाच्या ठिकाणीं ही वृत्ति मला दिसते.

माझे एक स्नेही चांगले सधन आहेत. कौटुंबिक सुखहि त्यांना चांगल्यापैकीं आहे. चारचौघांत नांवहि चांगलें आहे त्यांचें. पण इतकें असून आपल्या सुखाच्या मिजासींत त्यांनीं जसें असावें, तसें ते नसतात. बारीकसारीक दुःखाच्या सबबी सांगून ते नेहमीं तक्रार करीत असतात. घरचा एखादा गडी आजारी पडला, म्हैस वाजवीपेक्षां लवकर आटली, दूर शिकायला असलेल्या मुलाचें पत्र फार दिवसांत आलें नाहीं, सार्वजनिक कामासाठीं फंड जमविणारीं माणसें त्यांच्याकडे वर्गणी मागण्यासाठीं आलीं, अथवा त्यांच्या ड्रायव्हरनें हलगर्जीपणानें मोटार नादुरुस्त होऊं दिली, कीं राईचा पर्वत करून ते माझ्याजवळ आपल्या दुःखाचें गाऱ्हाणें सांगूं लागतात. आणखी दर वेळीं दुसऱ्या कोणाचं तरी उदाहरण देऊन म्हणतात, त्यांचं आमच्यापेक्षां पुष्कळ बरं हो. ते आमच्यापेक्षां पुष्कळ सुखी !"

पण हे जे 'ते' मला भटेल, कीं त्यांचेहि रडगाणें असेंच ठरलेलें कीं, "अमका तो पाहा, माझ्यापेक्षां कितीतरी अधिक सुखी बिचारा !"

एक कॉलेजचे प्रिन्सिपॉल आणि एक कारकून, दोघेहि अगदीं

बालमित्र आहेत. दोघांच्या गांठीभेटी आतां क्वचितच पडतात. पण क्वचित् गांठभेट पडली कीं, कारकून प्रिन्सिपॉलला म्हणतो.

" चैन आहे तुझी. महिन्याकांठीं बाराशें रुपये घ्यायचे. सात-आठशें बँकेंत टाकायचे, अन् चारपांचशेंत मजेचा संसार करायचा." पण प्रिन्सिपॉल त्याला म्हणतो,

" कसली चैन घेऊन बसलास ? माझी दुःखं मला माहीत. कॉलेजांतील पोरं आवरणं दिवसेंदिवस व्हायला लागलंय कठीण. प्रोफेसर मंडळींहि किती छळतात, तुला काय सांगायचं ! शिवाय आमचेवर आमचे यजमान कुणीतरी आहेत. ठरलेले अभ्यास-क्रम पार पाडायचे, रोजचा पत्रव्यवहार सांभाळायचा, परीक्षा घ्यायच्या, स्कॉलरशिपा ठरवायच्या, नोटीसा लावावयाच्या, व्याख्यान, खेळांचे सामने, असले कार्यक्रम भांडण-तंटा होऊं न देतां तडीला लावावयाचे, एक ना दोन हजार व्याधि मागं असतात. लोकांना वाटतं, कॉलेज उन्हाळयांत तीन महिने बंद असतं. मजा असते आमची. पण त्या सुट्टींतसुद्धां कॉलेजसंबंधीच्या हजार विवंचनाचं दडपण माझ्या मनावर असतं. उलट तुझं पहा. एकदां संध्याकाळीं हात झटकून ऑफिसांतनं परत घरीं आलास, कीं होतोस मोकळा, तिकडं कुणीं काडी ओढून ऑफिस पेटवून दिलं तरी तुला कांहीं चिंता आहे त्याची ? मजा आहे बुवा तुझी ! "

ही असलीं बोलणीं ऐकली, अन् असले नमुने पाहिले कीं, मला वाटूं लागतें, माझ्याहि मनांत अशा प्रकारचें विचित्र असमाधान आहे कीं काय ? आणि आत्मसंशोधन करतांना मला आढळून येतें कीं, असल्या असमाधानाला मी जरी फारसें वर डोकें काढूं देत नाहीं, तरी तें मुळींच माझ्या अंतःकरणांत नाहीं, असें नाहीं मला म्हणतां यायचें.

म्हणजे मनुष्यस्वभावांत अहंमन्यता अन् असंतोष यांचें कांहीं एक विचित्रच मिश्रण झालेलें आहे म्हणायचें !

एकीकडे पाहावें तर जें जें आपलें तें तें चांगलें असें समजण्याची वृत्ति दिसून येते. आपलें घर तेवढें चांगलें अन् बाकीच्यांचीं वाईट, आपली गाडी तेवढी चांगली बाकीच्यांच्या रद्दी, आपली वागणूक तेवढी चांगली, आपलीं तत्त्वें अढळ, आपलीं मतें निर्दोष, आपलें लेखन प्रभावी, आपली कला उच्च दर्जाची, असा अहंभाव सगळ्या माणसांत किती खच्चून भरलेला आहे ! " आपला तो बाळ्या, अन् लोकांचं तें कार्टं " ही म्हण कांहींशी ग्राम्य असली तरी मनुष्याच्या अंतःकरणांतला हास्यापद अहंभाव दर्शविण्याच्या दृष्टीनें मोठी मार्मिक नव्हे काय ?

पण माझ्यासारख्या मानसशास्त्राच्या अभ्यासकाला गमतीची वाटणारी गोष्ट अशी कीं, या अहंभावाला, असंतोषाला विचित्र पदर सदा चिकटलेला असतो. एकीकडे मनुष्य अहंभाव दाखवीत असतो खरा, पण दुसरीकडे असंतोष माणसाच्या मनाला सारखा खात असतो. जीविताच्या बाजारांत इतरांचे सौदे चांगले जमले अन् आपला मात्र आपला योग्यतेप्रमाणें जमला नाहीं, असें प्रत्येक माणसाला वाटत असतें. अमक्यानें इस्टेट केली, मला मात्र करतां आली नाहीं; अमक्याला कीर्ति मिळाली, मला मिळाली नाहीं; अमका परदेशाला गेला, मला जातां आलें नाहीं; अमका चांगल्या हवेच्या ठिकाणीं राहातो, मला राहतां येत नाहीं; असल्या खोट्या विषादाच्या लाटा प्रत्येक मानवी अंतःकरणांत कमीअधिक प्रमाणानें आदळत असतात, आणि दुःख निर्माण करीत असतात. स्वतःला जें मिळालें अन् जें करतां आलें त्याची किंमतच माणूस कधीं नीट समजून घेत नाहीं आणि त्यामुळें

दुसऱ्याला जें साधलें अन् मिळालें त्याचीच किंमत त्याला अधिक वाटत असते. प्रारंभीं सांगितलेल्या माझ्या मित्राच्या अजाण हट्टी मुलासारखेच आपण सगळे आहोंत.

इसापनीतींत 'कोल्हा आणि द्राक्षें' नांवाची जी एक गोष्ट आहे ती मला जेव्हां जेव्हां आठवते, तेव्हां तेव्हां ती थोडीशी चुकलेली आहे असें मला वाटतें. त्या गोष्टींत एक कोल्हा द्राक्षांच्या वेलीखालीं जातो, त्याला तीं द्राक्षें खावींशीं वाटतात, तो पुष्कळ धडपड करतो, पण त्याचें तोंड कांहीं त्या फळांपर्यंत पोंचत नाहीं. तेव्हां अखेर "काय करायचीं आहेत तीं आपल्याला द्राक्षें ? आंबटच आहेत तीं !" असें स्वतःच्या मनाचें समाधान करून घेत तो निघून जातो. अशीच आहेना ती गोष्ट ? त्या गोष्टीनें इसापला असें सुचवायचें होतें, कीं सारीं माणसें त्या कोल्ह्यासारखीं आहेत.

मला वाटतें तसें नाहीं. मनुष्यस्वभाव तसा नाहीं. निदान केवळ तसाच नाहीं. आणि त्या स्वभावाला जी दुसरी बाजू आहे ती सूचित करण्यासाठीं "कोल्हा आणि द्राक्षें" या मथळ्याखालींच का होईना, पण दुसरी एक गोष्ट लिहावयास पाहिजे. ती अशी कीं, एक कोल्हा होता. त्याच्याजवळ द्राक्षें होतीं आणि तीं तो खात होता. चांगलीं गोड होतीं तीं. पण तीं खाण्यापेक्षां त्याचें लक्ष सारखें उंच वेलीवर असलेल्या द्राक्षांकडे होतें. तीं सारीं आंबट द्राक्षें होतीं. निदान तो जीं द्राक्षें खात होता त्यांपेक्षां तीं अधिक गोड होतीं, असें कांहीं निश्चयानें सांगतां येण्यासारखें नव्हतें; पण त्या वेड्या कोल्ह्याला मात्र वाटत होतें कीं, आपल्या आवाक्याबाहेरचीं तीं द्राक्षें फार गोड असलीं पाहिजेत. आणि या भ्रमामुळें हातांतलीं गोड द्राक्षें खात असतांना, त्या कोल्ह्याचा चेहरा मात्र आंबट झाला होता !

इसापनीतींतल्या कोल्ह्यापेक्षां या माझ्या नव्या गोष्टींतल्या कोल्ह्यासारखीच साऱ्या माणसांची स्थिति आहे. जीं सुखें वांट्याला आलीं तीं माणसाला गोड वाटत नाहींत. जीं त्याच्या वांट्याला आलीं नाहींत, तीं अधिक गोड असलीं पाहिजेत, अशी तो स्वतःची कल्पना करून घेतो; आणि भ्रमानें तो स्वतःला दुःखीकष्टी करून घेत असतो जीं द्राक्षें हातीं आलीं नाहींत तीं आंबट असलीं पाहिजेत, असें म्हणायला मनुष्य शिकेल तर तो खरोखर किती तरी अधिक सुखी होईल !

—ना. सी. फडके.

प्रश्नः—आपल्याजवळ जें आहे, त्यांपेक्षां जें नाहीं त्याकडे आपलें लक्ष वळतें याला लेखकानें कोणतीं उदाहरणें दाखविलीं आहेत ? लेखकानें आत्मसंशोधन केव्हां व कशाकरितां सुरू केलें ? 'आंबट द्राक्षें' या गोष्टीला लेखकानें कोणतें निराळें वळण दिलें आहे ?

अभ्यासः—'दुरून डोंगर साजरे' ही म्हण जीवरून मनांत ठसेल, अशी एक निबंधवजा गोष्ट लिहा.

पुरवणीवाचनः—कै. शि. म. परांजपे यांचा—'चंद्राचा सोनेरी राजवाडा' हा निबंध वाचा.

---

# ३७. सत्त्वपालन.

**ओळख:**—प्रो. वासुदेव गोविंद मायदेव हे हिंगणें येथील 'अनाथ-बालिकाश्रम' या संस्थेचे आजीवसेवक होत. श्रेष्ठ प्रकारचे रसिक आणि कवि या नात्यानें मराठी भाषेची त्यांनीं स्पृहणीय सेवा केली आहे. इ. स. १९२९ सालीं त्यांनीं 'भावतरंग' या नांवाचा काव्यसंग्रह प्रसिद्ध केला; त्यांत त्यांचें भावनात्मक अंतःकरण आणि व्यक्तिमत्व पूर्णपणें प्रकट झालें आहे. नुकताच त्यांनीं 'भावनिर्झर' या नांवाचा दुसरा काव्यसंग्रह प्रसिद्ध केला आहे. याखेरीच त्यांचे 'शिशुगीतांचे' लहानमोठे संग्रह रसिकप्रिय आहेत. बाललीलांशीं ते जितके तन्मय होतात तितकेच निसर्गांतील दृश्यें आणि मानवी व्यवहार, यांतील सौंदर्याशीं ते एकरूप होतात. काव्यगायनाच्या द्वारें लोकशिक्षणाचेंहि त्यांनीं विशेष कार्य केलें आहे.

**विषय:**—'सत्त्वपालन' ही कविता कवींनीं प्रो. धोंडो केशव कर्वे यांना अनुलक्षून लिहिली आहे. ध्येयवादी व्यक्तीचें जीवन किती खडतर असतें, हें तत्त्व या कवितेंत कावडी ओतणाऱ्या प्रवाशाच्या उदाहरणानें कवींनीं किती सूचकतेनें दाखविलें आहे पाहा. बरें असें करण्यांत कांहीं स्वार्थ असावा तर तोही नाहीं. केवळ व्रतपालन !

दिन ढळला तरिहि घडा अजुनि भरेना ॥ ध्रु० ॥
सूर्य चंडकर टाकित
वाळू किति तप्त होत
पद निवांत एक कुठें चुकुन ठरेना १

तातडिनें किति कावडि
ओतियल्या जरि घडिघडि
तप्त घडा घेइ पिउन तोय पुरेना २

आतुर का तृषित जीव
जलपानीं धरुनि हांव
तृप्त होत येथ म्हणुन सलिल उरेना ? ३

जल वाहुनि अति चालुनि
पद गेले जरि मोडुनि
व्रतपालनिं आतुर हा जीव सरेना ! ४

ऊठ मना ! पाय उचल
मालक बघ राग करिल
सत्त्वपालनाविण जगिं कुणिहि तरेना ! ५

प्रश्नः—कावडी कोण, कशाकरितां आणि कुठें वाहून नेत आहे ? त्यानें घड्यांत ओतलेलें पाणी कां नाहींसें होत होतें ? पाय उचलण्याबद्दल कोण कुणाला सूचना करीत आहे ?

अभ्यासः—( १ ) डोंबाच्या घरचें रांजण पाण्यानें भरणाऱ्या हरिश्चंद्राचें तुमच्या शब्दांत वर्णन करा.

( २ ) सत्त्वपालनावांचून जगांत कुणी तरत नाहीं, याला कांहीं ऐतिहासिक उदाहरणें दाखवा.

पुरवणीवाचनः—प्रो. मायदेव यांची ‘ भावतरंग ’ व ‘ भावनिर्झर ’ हीं पुस्तकें आणि यशवंत कवीची ‘ पाणपोई ’ ही कविता वाचा.

---

# ३८. वजिरातीचा मरातब.

**ओळख:**—कै. रावबहादूर काशीनाथ नारायण साने ( जन्म इ. स. १८५१, मृत्यू इ. स. १९२७ ) हे आपल्या मराठीभाषेंतील श्रेष्ठ प्रतीचे इतिहाससंशोधक आणि रसिक होऊन गेले. ह्यांनीं अनेक ऐतिहासिक ग्रंथ प्रकाशित आणि संपादित केले. 'पेशव्यांची बखर', 'भाऊसाहेबांची बखर' 'पानिपतची बखर' इ० बखरी चिकित्सक पद्धतीनें संपादित करून त्यांनीं आपल्या मायभाषेची उत्कृष्ट सेवा केली. 'मराठी इतिहास आणि मराठी काव्याच्या कामीं परिश्रम करणारे' अशा प्रकारचा स्पृहणीय उल्लेख ब्रिटिश म्यूझियमचे कॅटलॉगांत त्यांच्यासंबंधानें आला आहे.

मराठी वाङ्मयांत प्राचीन पद्य ज्याप्रमाणें संत आणि पण्डित—कवि यांच्या काव्यलेखनांत आढळतें, त्याचप्रमाणें प्राचीन गद्यवाङ्मय 'बखरी' आणि 'पत्रें' या स्वरूपांत आढळतें. श्रीशिवाजीमहाराज, श्रीमंत पहिले बाजीराव पेशवे, चिमाजीआप्पा व राघोभरारी यांच्या स्वराज्य-संस्थापनेच्या व स्वराज्यसंवर्धनाच्या प्रयत्नांबरोबरच मराठी भाषेचें 'क्षेत्र' व्यापक आणि विस्तृत झालें. अर्थातच मराठी भाषेला राजाश्रय मिळाल्यामुळें तिचें वैभव अनेक रीतीनें वाढलें. त्याचमुळें बखरींतील मराठीचें स्वरूप जितकें कणखर तितकेंच नैसर्गिक वाटतें. इंग्रजी अंम-लाच्या अगोदरचें तेजस्वी मराठी गद्य म्हणून प्राचीन बखरी व ऐति-हासिक पत्रें यांच्याकडे पाहावें लागतें. कै. कृष्णाजी विनायक सोहनी ( सुमारें १७८५–१८५५ ) यांनीं रचिलेल्या 'पेशव्यांची बखर' या पुस्तकांतून खालील उतारा उद्धृत केला आहे. तो वाचला म्हणजे तुम्हांस पेशवेकालीन मराठी गद्याची थोडीशी ओळख होईल.

विषयः—पानिपतच्या लढाईत मराठयांची जी आर्थिक हानि झाली व जें मनुष्यबल खर्ची पडलें, त्यांची रुखरुख उत्तरहिंदुस्थानांतील पेशव्यांचे पराक्रमी सरदार शिंदे आणि होळकर यांना लागून राहिली होती. झालेल्या अपयशाची भरपाई करण्याची संधि त्यांना लौकरच मिळाली. त्याच सुमारास, दिल्लीच्या बादशहाची वजिरात (मुख्यप्रधानकी) मिळविणें म्हणजे जवळ जवळ सर्व उत्तरहिंदुस्थानचें वर्चस्व आपल्या हातांत घेण्यासारखें होतें. 'महादजी शिंदे' यांनीं ही अलौकिक कामगिरी बजाविली. आणि वहंशीं आपल्या पराक्रमानें शहाअलम बादशहाकडून मिळविलेला वजिरातीचा मानमरातब 'श्रीमंत पेशवेसरकारांना' —सवाई माधवराव पेशवे यांना—अर्पण करण्याचा, त्यांनीं मनसुबा केला. आपल्या राजवैभवाला साजेल अशा सरंजामानिशीं ते उत्तरहिंदुस्थानांतून देशावर यावयास निघाले. त्यांच्या सैन्याचें कूच, पुण्याजवळील त्यांचें आगमन, त्यांनीं दाखविलेली राजनिष्ठा आणि शेवटीं घडून आलेला बादशाही वजिरातीचा समारंभ—हे प्रसंग कसे चित्ताकर्षक परंतु तत्कालीन भाषेंत रेखाटले आहेत! ते वाचा. हा समारंभ पुण्यास ता. २२–६–१७९२ रोजीं झाला.

इकडे महादजी शिंदे यांस पेशजी बलाविण्याचीं पत्रें सरकारचीं गेलीं. त्यावरून शिंदे बादशाही वजिरातीचा मतराब घेऊन देशीं यावयास निघाले. हिंदुस्थानांतून अंतर्वेदीसुद्धां दिल्लीचे कारभाराचा बंदोबस्त करून, जिवबादादा बक्षी यांचे स्वाधीन पाठीमागें सर्व कारभार करून, पाटीलबोवा देशीं यावयास निघाले. ते कूच दरकूच हिंदुस्तानांतून उज्जनीवर येऊन, मुक्काम करून बऱ्हाणपुरास येऊन दाखल झाले. बऱ्हाणपुरास आठ पंधरा दिवस मुक्काम करून खानदेशांत कासार–बारीचा घाट चढून, गंगा उतरून, जांबगांवास येऊन दाखल झाले. जांबगांवास मुक्काम आठ पंधरा

दिवस करून तेथून कूच करून निघाले. ते पुण्यास येऊन दाखल झाले. त्यावेळेस श्रीमंत सामोरे जाऊन नाना फडणीस व हरिपंत तात्या वगैरे सर्व मंडळी समागमें जाऊन, सर्वांच्या भेटी झाल्या. भेटी होऊन सरकारची स्वारी माघारीं फिरण्याच्या वेळीं, शिंदे आपल्या मुक्कामावर जावयाचे, त्यावेळीं महादजी शिंदे यांनीं सर्व बोलणीं श्रीमंतांस समजाविलीं. नंतर श्रीमंतांस विनंति केली कीं, " हिंदुस्थानांतून मी पुण्यास आलों. माझे समागमें लाख फौज आहे, इला सरकारचें दर्शन कधीं व्हावें ? व फौजेचा सलाम सरकारास कोणते वेळीं व्हावा ? यासाठीं सरकारांनीं आतां अंबारींत स्वार होऊन उभें असावें, म्हणजे सर्वांचा मुजरा सरकारास होईल व सरकारची नजर सर्व फौजेवर होईल." असें पाटीलबोवांचें बोलणें ऐकून श्रीमंत हंसून " बरें आहे " म्हणून बोलले.

त्या समयीं सरकारची स्वारी हत्तीवर बसावयाची म्हणून विनायकगज हत्ती आणून रुप्याचे अंबारींत खांसा स्वारी बसली. पुढें बाबा महात हातीं अंकुश धरून बसला. तो हत्ती बिनझोल चालत असतां माणसाला वर डोलावें लागत नसे. यासाठीं खांसा स्वारीस तो हत्ती नेमिला होता. जरीबादली मस्तकीं सारी, पाठीवर मखमली गाशा, सभोंवतीं झालर कलाबतूची, गाशावर बेलबुट्टी कलाबतूची काढलेली, गळ्यांत घांगुरमाळा रुप्याच्या, व घंटा रुप्याच्या, दांत सोन्याचे मढविलेले, मस्तकीं सडका व सोन्याचीं पिंपळपानें, पायांत रुप्याचे तोडे, सोंड रंगविलेली, अशा हत्तीवर सरकारची स्वारी बसली. खवासखान्यांत अप्पा बळवंत व अमृतराव पेठे हातीं चवरी घेऊन श्रीमंतांवर उडावितात व हातीं रुमाल घेऊन अप्पा बळवंत श्रीमंतांवर वारीत बसले आहेत. सरकारची स्वारी हत्तीवर बसून उभी राहिली त्यासमयीं

सरकारचे मुत्सद्दी व कारभारी आपले वाहनारूढ होऊन उभे राहिले. जरीपटक्याचे हत्तीखेरीज, जिलबेचा हत्ती असे चौघे सजविलेले; शिवाय कोतवालघोडे चारशे, सोन्याचे गंडेपट्टे घातलेले, गळ्यांत मोहनमाळा, पायीं पैंजण, पाठीवर भरगच्ची झुला, त्यांवर कलग्या असा कोतवालघोड्यांचा समाज उभा; त्यांच्या पाठीमागें हत्ती उभे, जेथें श्रीमंतांचा हत्ती उभा, त्यापुढें खास जिलबेचे लोक बोथाटी बारदार, विटे–बारदार, खासबदार व बाणदार व लगी, अशी खाशी जिलीब उभी; व जरीपटक्याचा हत्ती उभा; तेथें सरकारची हुजरात, पागे, मानकरी व शिलेदार उभे; श्रीमंतांचे मागें झाडून सरंजामी उभे. पटवर्धन, विंचूरकर, दरेकर, पाटणकर, घोरपडे, निंबाळकर, जाधव व पुरंदरे, अक्कलकोटवाले, असा समुदाय सरकारचे स्वारीचा उभा राहिला आहे. चौघडे वाजतात. साहेब–नौबतीचे बाजे वाजतात. खेरीज घोड्यावरील नगारे व उंटांवरील नौबती वाजतात. असा सरकारचे स्वारीचा थाट उभा राहिला आहे व चोपदार, भालदार, छडीदार व नकीब ललकारत आहेत.

त्या समयीं महादजी शिंदे यांणीं आपली फौज दुरस्ता फऱ्यानें उभी सरकारचे मुजऱ्यासाठीं केली. एकतर्फेनें घोडदळ उभें राहिलें. त्यांत पागे व शिलेदार व पठार हुजारत शिंदे यांची उभी राहिली दुसऱ्या तर्फेनें चार कंपू उभे केले. त्यामध्यें तोफा उभ्या राहिल्या. बैल तोफेस जुंपलेले. असा सरंजाम सरकारचे सलामासाठीं उभा केला. त्यावेळेस शिंदे यांचे दौलतीची वर्णना काय करावी! घोडेस्वार घोड्यांवर स्वार झालेले, त्यांचे डोकीस मंदील, आंगांत झगार, आंगावर शालजोड्या, हातांत शालनामाचा रुमाल, पायांत किनकापी विजारा, असे साज बंदुका बांधून मुजऱ्यासाठीं उभे

राहिले. हातांत सोन्याचीं कडीं, गळयांत कंठी, कानांत चौकडे, असे स्वार, भालेकरी व आडहत्यारी व कलोल उभे राहिले. तसेंच हत्ती उभे वरतीं अंबाऱ्या ठेवलेल्या. याप्रमाणें कोतवालघोड्यांचा सरकारचे मुजऱ्यासाठीं करा उभा राहिला आहे. दुसरे तर्फेनें कंपू सहा दोन कोसांपर्यंत तोफासुद्धां उभे केले आहे. तेव्हां सरकारची स्वारी मुजरा घेत चालली. दुतर्फा मुजरे होऊं लागले. भालदार नांवें घेऊन बोलतात. याप्रमाणें दोन कोसांपर्यंत सरकारची स्वारी मुजरे घेत आली. शेवट झाला तेथें स्वारी उभी राहिली आणि तोफा सोडावयाची व कवाईत करण्याची आज्ञा सरकारची झाली. त्यावेळेस कंपूची कवाईत व तोफेचे आवाज एकदम होऊं लागले. तेव्हां तोफांच्या धूराची दाटी झाली. माणसाला माणूस दिसेनासें झालें. बाराशें तोफांचा आवाज सुटला. त्यासमयीं श्रीमंतांची मर्जी प्रसन्न होऊन स्वारी वाड्यांत जावयास निघाली. शिंदे आपली फौज घेऊन आपले तळावर जावयास निघालें. याप्रमाणें होऊन शिंदे वानवडीच्या तळावर जाऊन उतरले. महादजी शिंदे मोठे जोरावर, दौलत मोठी व म्हणून त्यांस अभिमानही मोठा-त्यामुळें सरकारचे दौलतीचा व राज्याचा कारभार आपण करावा असा मजकूर मनांत आणून पाटीलबोवा यांणीं सरकारांत बोलावणें लाविलें होतें. इतक्यांत दिल्लीहून वजिरातीचे मरातब बादशाही आणिले होते ते सरकारांत दाखल करावे, असा मनसोबा मनांत आणून सरकारांत विनंति करावयास महादजी शिंदे वाड्यांत आले श्रीमंतांस विनंति केली कीं, "सरकारचे नांवें दिल्लीचे बादशहा यांणीं वजिरातीचीं वगैरे वस्त्रें दिलीं आहेत, तीं सरकारांत प्रविष्ट व्हावयाची आज्ञा काय ती व्हावी." तेव्हां श्रीमंत बोलले, "सर्व कारभारी जमा करून सुमुहूर्त पाहून निश्चय

ठरवावा " असें श्रीमंताचें बोलणें होतांच दुसरे दिवशीं दरबार करावयाचा बेत ठरवून शिंदे आपले डेऱ्यास येऊन दाखल झाले.

मागती दुसरे दिवशीं दरबारची बोलावणीं सर्वांस झालीं. लहान थोर मुत्सद्दी व कारभारी व मानकरी व पागे व पथके तमाम सरदार दरबारास आले व शिंदे वानवडीहून वाड्यांत आले. सकळ दरबार झाला आहे. त्या समयीं महादजी शिंदे यांनीं सर्वांस सांगितलें कीं, " दिल्लीचें बादशहा यांणीं सरकारच्या नांवें वजिरातीचीं वस्त्रें वगैरे दिलीं तीं सरकारांत प्रविष्ट करावयाचीं त्यांचा विचार सर्वांनी करून सुमुहूर्त निश्चय ठरवात्रा. म्हणजे त्या प्रमाणें समारंभ करावयाचा बेत ठरवूं," असें सर्वांनीं ऐकतांच नाना, तात्या व वरकड कारभारी यांनीं रुकार दिला. " चांगलें आहे." त्या समयीं जोशी बोलावून, दिनशुद्धि चांगली पाहून, श्रीमंतांचें राशीस चंद्रबळ उत्तम व आणखी दोन चार ग्रह अति सुंदर, श्रीमंतांस मोठे अनुकूळ असा दिवस पाहून, त्या दिवशीं मरातब घेण्याचा निश्चय ठरवून पाटीलबोवा यांस सर्वांनीं रुकार दिला.

मग त्या दिवशीं महादजी शिंदे यांनीं आपले लष्करांत श्रीमंतांस बसावयाची जागा करून, मखमली डेरे देऊन, मखमाली बिछाईत घालून, कळवंतिणीचे नाच उभे करून शिंदे श्रीमंतांस न्यावययास पुण्यास येऊन त्यांनीं विनंति केली. तेव्हां स्वारी सरकारची तयार होऊन निघाली.

बरोबर तमाम मानकरी, शिलेदार, सर्व पथके व हुजरातसुद्धां जरीपटका घेऊन निघाले. त्यावेळीं खांसा स्वारी अयन्याच्या अंबारींत बसून चालले. खवासखान्यांत अप्पा बळवंत व पेठे बसले. श्रीमंतांच्या मागें नाना फडणीसही अंबारींत बसून चालिले.

तसेच तात्या व महादजी शिंदे अंबारींत बसून चालले व त्यांच्या मागून झाडून सरदार निघाले. खांशी स्वारी सरकारची चालत असतां खासगी जिलीब पुढें चालली. असें शिंदे यांजकडील जिलबीपुढें बल्लभ वगैरे चालतात. त्यापुढें भालदार, चोपदार, सरकारचे मिरधे, पुढें हांका मारून सांगतात. त्यांच्यापुढें कोतवाल घोडे. अशा थाटानें स्वारी वानवडीस जाण्यासाठीं निघाली.

ती स्वारी शनवारांतून वाडा डावा घालून आदितवारांतून, नागझरी उतरून तहत वानवडीपावेतों आघाडी स्वारीची व रास्ते यांचे पेठेपावेतों एकसारिखा स्वारीचा थाट चालिला. अशी स्वारी जात असतां लष्करांत दाखल झाली.

जेथें बसावयाची जागा केली होती तेथें जाऊन श्रीमंत बसले व सर्व मंडळी, मानकरी, मुख्य कारभारी, लहान थोर सरदार, आपल्या इराद्याच्याप्रमाणें कचेरीच्या डेऱ्यांत जाऊन बसले. नाच होत आहे. असा दोन तीन घटका नाच झाला. नंतर महादजी शिंदे यांणीं दिल्लीहून बादशाही वजिरातीचे मरातब आणिले होते, तीं भूषणें सारीं कचेरींस आणविलीं. नंतर श्रीमंतापुढें पाटीलबोवा येऊन हात जोडून विनंति केली, "बादशाही मरातब सरकारांत बादशहा यांणीं पाठविले, ते आतां खाशांनीं घ्यावे" असें बोलून वस्त्रें श्रीमंतापुढें ठेविलीं. नंतर मंदील पठाणी तऱ्हेचा बांधलेला होता तो डोकीस घातला. तसाच आंगांत जामानिमा तमामी, पायांत विजार घालून, कंबरेस पटका बांधून, श्रीमंत खालीं बसले. मग मस्तकीं शिरपेंच व तुरा व कलगी मंदिलावर बांधिलीं. हातांत मनगटी, पोंच्या, भुजबंद, गळ्यांत मोत्यांचे व नवरत्नांचे हार घातले. कानांत चौकडा घातला. पायांत घालण्याकरितां

बादशाही जोडा आणिला होता तो पाटीलबोवा यांनीं पुढें ठेविला, आणि मोरचल शिंदे यांनीं हातांत घेऊन, श्रीमंतांवर वारून, पाठीमागें खिसमतगार उभे होते त्यांच्या हातीं दिले. मग नालकी व कांहीं मरातब आणून पुढें ठेविले. नंतर " दिल्लीस वजिरातीचा कारभार करावयाचा तो श्रीमंतांच्या तर्फेनें महादजी शिंदे यांणीं करावा." अशी विनंति शिंदे यांणीं केली असतां सर्वांच्या मनांत येऊन, " उत्तम आहे" असे सर्वांचे रुकार आले. नंतर हरिपंत तात्या यांणीं विनंति केली कीं, " पाटीलबोवा यांस वजिरातीच्या गुमास्तगिरीचीं वस्त्रें, नालकी वगैरे द्यावयाची ती सरकारची स्वारी वाडयांत दाखल झाल्यानंतर तेथें द्यावी." ही गोष्ट सर्वांचे मनास आली. तेव्हां शिंदे यांणीं सर्वांस पोषाख दिले. शिंदे यांची अंबारी एक खांबाची होती ती त्याणीं सरकारांत नजर केली. मग पानसुपारी, अत्तरगुलाब, हारगजरे वांटले.

मग सरकारची स्वारी पुण्यास निघाली तेव्हां, मशाली लावून हत्तीवर हवया लावून, श्रीमंत नालकींत बसून निघाले. त्यासमयीं सरकारचे राजमंडळाचे मानकरी व सरदार होते ते नालकीबरोबर चालले नाहींत. आघाडी पिछाडीस चालले; व सरकारचाकर होते ते मात्र नालकीसमागमें चालिले. महादजी शिंदे व हरिपंत तात्या फडके हे नालकी धरून दोहींकडे चालिले. बादशाही पोषाख अंगावर होता त्यासुद्धां सरकारची स्वारी नालकींत बसली; एकीकडे मोर्चेल, एकीकडे चवरी, पुढें जिलीब बादशाही मरातब चालले. अशी स्वारी शहरांत येई तों चार घटका रात्र झाली. तेव्हां मशाली, हवाया लावून त्या उजेडांत बादशाही डौलानें चालले. असे येऊन वाडयांत दाखल झाले. नंतर बादशाही पोषाख अंगावर होता तो काढून नवा पोषाख घेतल्यानंतर स्वारी

सरकारची जाऊन गादीवर बसली. तेव्हां सारे मानकरी व सरदार व पागे व सरकारचे कारभारी व मुत्सद्दी शिलेदार असे सर्वांचे मुजरे व नजर नजराणे झाले. नंतर महादजी शिंदे यांस वजिरातीच्या गुमास्तगिरीचीं वस्त्रें द्यावयाचीं तीं तेथें वाड्यांत समक्ष दिलीं. आणखी मरातब बादशाही द्यावयाचे ते दिले. सर्वांस पानसुपारी, अत्तरगुलाब देऊन सर्वांस निरोप दिला. महादजी शिंदे यांस निरोप झाला. सर्व लोक आपआपले ठिकाणीं गेले, व महादजी शिंदेही आज्ञा घेऊन आपले लष्करांत गेले. याप्रमाणें बादशाही वजिरातीचा समारंभ झाला.

टीपाः—पेशजी–पूर्वी, मागें. मरातब–पदवी, उच्च दर्जा. अंतर्वेदी–गंगा व यमुना यांच्या मधला प्रदेश. खासा–खुद्द. बिन–विना, शिवाय. झोल–त्वरित गति, झटका. जरीबादली–कलाबतूच्या काड्या असलेलें वस्त्र गाशा–घोड्याच्या खोगिरावर घालण्याची गादी. सडक–वस्त्राचा पदर, गोंडे रेशमी काढणी. खवासखाना–हत्तीवर अंबारीच्या मागें खिजमतगाराची बसण्याची जागा. नकीब–चोपदार, भाट. जिलीब–लवाजमा. कलगी–पागोट्यावर बांधावयाचें रत्नखचित भूषण, तुरा. फरा–ओळ. लगी–पताका. हुजारत–खास सरकारची फौज. झगार–पायघोळ अंगरखा. करोल–घोड्यावरील बंदुकवाला शिपाई. बल्लभ–भाल्यासारखें शस्त्र. मिरधा–भालेकरांचा नाईक; जासुदांचा नाईक. तमामी–ज्यांत उभें सूत जरीचें व आडवें रेशमाचें असतें असें कापड. नालकी–एकप्रकारची पालखी.

प्रश्नः—श्रीमंत पेशवे सरकारास वजिरातीचीं वस्त्रें देण्याचा समारंभ कोठें झाला ? महादजी शिंदे यांचें वैभव कोणत्या प्रसंगीं विशेष दिसून आलें ? पुण्यापासून वानवडीपर्यंत सरकारस्वारी कोणत्या थाटामाटांत निघाली ? महादजी शिंदे यांच्या मनांत, आणखी कोणते हेतू होते असें

बखरकारांनीं सांगितलें आहे ? वरील उताऱ्यांत तत्कालीन परिस्थितीचें कोणतें चित्र उमटलें आहे.

अभ्यासः—( १ ) वजिरातीच्या समारंभाचें वर्णन तुमच्या शब्दांत थोडक्यांत लिहा. ( २ ) ह्या धड्यांतील भाषाशैलीचे विशेष शोधा. ( ३ ) तत्कालीन भाषेचा नमुना, म्हणून वरील समारंभाचें वर्णन तुमच्या मित्रास पत्रद्वारें लिहून पाठवा.

पुरवणीवाचनः—' भाऊसाहेबांची बखर ' हें पुस्तक आणि श्री. य. न केळकर यांनीं प्रसिद्ध केलेले ' ऐतिहासिक पोवाडे ' वाचा.

---

## ३९. कृष्णाकुमारी.

ओळखः—कै० विनायक जनार्दन करंदीकर, ( जन्म इ. स. १८७२, मृत्यु इ. स. १९०९ ). हे केशवसुतांच्या समकालीन प्रसिद्ध कवि होऊन गेले. त्यांचें बहुतेक आयुष्य नऱ्हाडांतच गेलें. त्यांचें शिक्षण, प्रवेशपरीक्षेपर्यंत झालें होतें. ते जितक्या शीघ्रगतीनें कविता लिहीत, तितकाच स्फूर्तीचा ओघ त्यांच्या काव्यांत, अस्खलित रीतीनें वहात असलेला दिसतो. ते खऱ्या अर्थानें लौकिक कवि होते. म्हणजे, आपल्या समाजांतील—राष्ट्रांतील—होणाऱ्या घडामोडींमुळें त्यांचें अंतःकरण कंपित होत असे. आपली जन्मभूमि पारतंत्र्यांत खितपत पडली आहे यावर त्यांनीं ' हतभागिनी ' या काव्यांत खेदोद्गार काढिले. ' यापुढें ' या कवितेंत त्यांना आपल्या गतेतिहासाचा केवढा अभिमान होता हें दिसून येतें. ' पूर्व दिव्य ज्यांचें त्यांना रम्य भाविकाळ ' असे आशादायक सूर त्यांच्या ' महाराष्ट्र—लक्ष्मी ' या कवितेंत आढळतात, ' शिवराजदर्शन ' ' प्रोफेसर छत्र्यांचा केसरी ', गणेशपूजन '—यासारख्या राष्ट्रीय विषयावर

कविता लिहून त्यांनीं आपलें नांव, श्रेष्ठप्रकारच्या राष्ट्रीय कवींच्या मालिकेंत गोंवून ठेविलें आहे. रजपूत स्त्रियांबद्दलचा आदर, त्यांनीं 'वीरमती' 'पद्मादेवी' यांसारख्या कवितांत व्यक्त केला आहे. भाषेचा अस्खलित ओघ व अनिर्बंध भावनेचें क्रीडन, यांमुळें त्यांचें काव्य उठावदार झालें आहे.

**विषय:**—कृष्णाकुमारी ही राजपुतान्यांतील भीमक राजाची कन्या. ती उपवर होतांच तिच्या रूपगुणांवर मोहून अनेक राजांनीं तिच्यासंबंधीं लग्नाची मागणी घातली. राजापुढें मोठाच प्रश्न येऊन पडला. एका घराण्याशीं अशाप्रकारें संबंध जोडावा तर दुसरें राजघराणें आपलें वैर साधणार, या विचारानें त्याला कांहीं सुचेना. त्यावेळीं अमीर नांवाच्या पठाणानें आणि मंत्र्यानें त्याला अगदीं विलक्षणच कानगोष्ट सांगितली. राजानेंहि त्या गोष्टीला अनुमति दिली, पण कृष्णाकुमारीनें, आपलें मातृपितृकर्तव्य बजाविण्याकरितां, विषाचा पेला आनंदानें गिळण्याचें ठरविलें. हाच करुण कथाभाग खालील सरस काव्यांत आला आहे.

१

कळी उमलली जों न पावली पूर्ण विकासाला,
अदय कराचा तोंच तिजवरी पडला कीं घाला !
सुनील गगनीं चमकूं लागे सुंदर इंदुकला,
तोंच तिचा निर्घृण राहूनें धरिला हाय ! गळा !
भीम नृपाला प्रियतर बाला कृष्णा वेल्हाळा,
नडली पडली बळी अकालीं, त्यायोगें, काळा !
स्वार्थसंसृतीलोभपरायण जगताची रीती,
उठे सुतेवर पिता हितास्तव, विसरे नयनीती ।

२

उपवर झाली भीमकबाळी रूपवती कृष्णा,
तत्प्राप्तीस्तव सहज लागली भूपवरां तृष्णा;
जयपुरराजा म्हणे गुणवती व्हावी मज भाजा,
जोधपूरचा भूप म्हणे तो भाग असे माझा :
शिंद्याच्या जोरावर चढला मारवाडवाला,
वांच्छी व्हावी प्राप्त आपणा कृष्णेची माला;
जयपुरची मागणी तयानें धाकें परतविली,
राजस्थांनीं वैराग्नीची ज्वाला भडकविलीं,
कृष्णेसाठीं सज्ज जाहले खड्गाचे हात,
घोर युद्ध माजलें वाहले रक्ताचे पाट !

३

अमीर नामा पठाण घातक, नीच अविश्वासी,
उदेपुराधिप, मानासाठीं, ये भीमापाशीं;
वदे ‘ हितास्तव करा स्वदुहिता अर्पण मानातें,
अपकारक होईल जोडिलें अन्याशीं नातें;
अथवा हें खंडूनच टाका मूळ अनर्थाचें,
कां कारण होतां पाडाया बळी सहस्रांचे ? ’
विचार पडला, कसा पोटचा गोळा तोडावा ?
चुकवावे वा काय उपायें शत्रूचा घावा ?
चालक, मंत्री अजित नृपाचा तोचि मार्ग दावी;
‘ समर्यांच ’ म्हणे ‘ ही अग्नीची ज्योत मालवावी ! ’

४

आप्त जवळचा दौलत त्यावर ये ती कामगिरी
कोसळून आकाश गमे त्या पडलें काय शिरीं !
‘ धिक्कार असो ! ’ वदे जीविता तुमच्या धिक्कार,
व्यर्थ जन्म घेऊन जाहलां धरणीला भार !
छत्र शिरीं मिरवितां, म्हणवितां स्वतां लोकपाळ !
पोर एक पोटची तिचाहि न करवे सांभाळ !
हाच काय पुरुषार्थ ! कुलाचा हाच काय मान ?
पुरुष सजावा कीं, अबलेची कापाया मान !
“ रजपूतांचे छावे आम्ही अबलांचे साथी !
वागवितों तलवार कटीला नित्य तयांसाठीं ।
वदा कोण, या मृणालिनीच्या जीवावर उठला ?
तद्रक्ताचा तिच्या कपाळीं लाविन खास टिळा !
पडेल जेथें मृगनयनेचा अश्रुबिंदु एक !
अरिरुधिरानें त्या स्थानावर लिहूं सूड–लेख !
नको बुद्धि ती, नका अमंगल वच तें उच्चारूं.
धीर न सोडा; धर्म आपला रणीं मरूं–मारूं ! ”

५

बोध खलास न रुचे, अहिमुखीं दुग्ध होय गरल,
श्वानपुच्छ नलिकेंत घातलें होईना सरल ।
दौलत थिजला; परि न खलांचा दुष्ट यत्न विझला,
जवान दुसरा ती नव कलिका तोडाया सजला !
करूनियां निर्धार मनाचा, धरून तलवार,
गेला कृष्णेजवळ नीच तो करावया वार !

करीत होती हार फुलांचा जाईच्या रमणी,
जणों करी स्वकरें तरुणांची हृदयें बद्ध गुणीं !
हिमधवलांगी धवलचंद्रिकाहृदया बाला ती,
धवल फुलें तीं धवल करानें धवल गुणीं गांठी !
कृष्ण हृदय धवलतेजवळ तें झालें धवळ पळीं.
नवल न धवलच बिंब शशीचें विलसे नील जळीं !
तिच्या दिव्य तेजानें दिपला भाला, कंप करीं,
उगारलेलें शस्त्र तयाचें गळलें भूमिवरी !
टिकलें पुण्यप्रभावापुढें नाहीं पळ दुरित.
भग्नमनोरथ परत दुरात्मा गेला थरथरत !

६

गळून पडलें शस्त्र पुढें तें—निशाण मरणाचें !
धरून जें स्वकरीं भूमिवरी स्वैर मरण नाचे !
परि नाहीं ती धैर्यदेवता तिळभर डगमगली,
मधुस्मिताची खळी कपोली उलट तिच्या पडली !
परि मातेनें तिच्या मांडिला एकच आकांत,
मातृहृदय तें ! करील कैसा सहन सुताघात !
पिटी उरःस्थल, कुंतल तोडी, कर माथां हाणी,
धाय मोकलुनि रडे, धरेला अश्रूंनीं न्हाणी.

७

पाषाणालाही शोकानें त्या पाझर फुटता,
परि न तयानें वळले खळ तें' त्यजी न विष कटुता !
शस्त्र न चाले म्हणुनि विषानें भरलेली वाटी,
आणून दिली जनकाज्ञेनें कृष्णेच्या हातीं.

स्मितवदनानें करीं विषाचा धरून तो प्याला,
पदरें नयन पुशी मातेचे, वदे वीरबाला—
का करिसी हा शोक ? आणिसी कां नयनीं पाणी ?
कवण वाचला सांग, भूवरी आजवरी प्राणी !
मृत्युसखा सोयरा जिवाचा असे सदा साथी,
मृत्युबलानें तुटे भवाची दुःखाची गांठी !
वाट जिवाला चिरसौख्याची मृत्य मात्र दावी,
वद मग आली मरणाची का संधि घालवावी ?
जन्म जयानें दिला तोच या जीवांचा स्वामी,
भाग्यवंत ती, पडे संकटीं जनकाच्या कामीं !
धिग् जीवित ! ज्याकरितां पडती बळी असंख्यांचे,
मरण यशाचें जर त्यायोगें देश-धर्म वांचे !

८

देऊन असा धीर, विषाचा घेई ती घोंट,
मोहमूढ मातेस नावरे अश्रूंचा लोट !
एक दोनदां घोट विषाचा नाहीं तिज पचला,
दुष्टांनीं यास्तव नाशाचा बेत नवा रचिला !
हाय ! कुसुंबा प्याया धरिला पुढें तिच्या ओठीं,
मालविली यापरी खलांनीं ती रत्नज्योती !
केला, अनुमोदिला जयांनीं कृष्णेचा अंत,
त्या शासाया चुकला नाहीं न्यायी भगवंत ।
जसें करावें, तसें भरावें, बीज तसे दाणे !
'विनायका 'ला करी बोध हा कृष्णेचें गाणें.

**प्रश्नः**—आपण दुसऱ्यांशीं जोडलेलें नातें अपकारक होईल असें भीमकराजाला केव्हां वाटलें ? कां ? कृष्णाकुमारीचें वर्णन कवीनें कोणत्या शब्दांत केलें आहे ? पुण्यप्रभावापुढें दुरित टिकलें नाहीं हें कसें ? कृष्णाकुमारीच्या दर्शनानें जीविताचें सार कशांत होतें ?

**अभ्यासः**—( १ ) कृष्णाकुमारीच्या स्वभावाची ओळख करून देणाऱ्या ओळी लिहा.

( २ ) 'धवल' या शब्दाचा उपयोग कवीनें कां केला आहे आणि तो कितपत यथार्थ आहे तें लिहा.

( ३ ) 'अर्थांतरन्यास' अलंकार म्हणजे काय तें सांगून त्याचीं या कवितेंतील उदाहरणें दाखवा.

**पुरवणीवाचनः**—'विनायकाच्या' काव्यसंग्रहांतून त्याच्या आरंभीं उद्धृत केलेल्या कविता वाचा.

---

# ४०. एक दिवस

**ओळखः**—( लेखक-परिचय ) धडा १९ पाहा.

**विषयः**—एखादा दिवस असा उगवतो कीं, जेव्हां एखाद्या व्यक्तीला आपलें मन दुसऱ्याजवळ उघड करावेंसें वाटतें; परंतु त्याची ही साधी मनीषा पूर्ण होऊं नये, असा त्याला अनुभव येतो. प्रस्तुतच्या गोष्टींतील मनुष्यानें हा आपला अनुभव सकाळपासून संध्याकाळपर्यंत, त्याला ज्या ज्या महत्त्वाच्या व्यक्ति भेटल्या त्यांच्या सहवासावरून मिळविला. मनुष्यस्वभाव कसा असतो, ह्या दृष्टीनें ही गोष्ट वाचल्यास ती तुमच्या सहज लक्षांत येईल.

आज ‘रविवार’ होता म्हणून मोठ्या समाधानाचा सुस्कारा टाकिला व खिडकीवाटे बाहेर पाहिलें. चोहोंकडे ऊनहि चांगलें कोवळें मजेदार पडलें होतें. मग खोलींत कोंडून घेण्यापेक्षां बाहेर पडलेलेंच काय वाईट, असा मनाशीं विचार ठरविला; आणि पुढें आलेला चहाचा घोट सावकाश घेत आणि मेजाच्या खणांतून पैशांचें पाकीट बाहेर काढीत मी हळूहळू अंगांत कोट चढविला. माझ्या या कृतीवरून मी कुठेंतरी जाण्याच्या तयारींत आहे, असा इषारा आमच्या अर्धांगीस मिळाला असावा! एरव्ही तिनें तेवढ्यांतल्या तेवढ्यांत तातडी करून ‘मंडई’ ला लागणारी पिशवी माझ्या हातांत दिली नसती!

रस्त्यानें जाणाऱ्या येणाऱ्या लोकांच्या धांदलींतून मार्ग काढीत मी नकळतच मंडईजवळ आलों, आणि अगदीं त्याच वेळीं समोरच्या चौकांतून लगबगीनें झटकणाऱ्या ‘वैशंपायना’ कडे माझें लक्ष गेलें. एखाद्या व्यक्तीला भेटण्याची तीव्र उत्कंठा असली म्हणजे मनुष्य आसपासच्या गोष्टींकडे लक्ष देत नसावा. कारण, माझ्याच सारखा जातभाईनीं भरगच्च भरलेल्या रस्त्यांतच उभे राहून मी मोठ्यानें ‘ए सदाशिव’ म्हणून हांक मारली. माझी हांक सदाशिवाच्या कानांवर जाण्यास आणि त्याच्या सायकलचे ‘ब्रेक’ सैल पडण्यास एकच गांठ पडली होती कीं काय न कळे! त्यानें आपली सायकल बरीच पुढें फरफटत नेऊन मगच ती थांबविली. मी जवळ जातांच त्याला कोण ब्रह्मानंद झाला! त्याच्या अगोदरच फुगीर असलेल्या गालावर मला पाहातांक्षणींच हास्याच्या केवढ्या तरी खळया पडल्यासारख्या दिसल्या.

“काय रे! गृहस्था मला चुकवून जात होतास नाहीं?” मी अगदीं उत्कंठेनें त्याच्या हाताची मूठ आपल्या हातांत दाबीत

म्हटलें, "पण आज मी तुला तसा सोडणार नाहीं, तूं बोलावीत नसलास तरी तुझ्या घरीं मी येऊन आज चहा उकळणार, समजलास ? "

माझी अपेक्षा होती कीं, वैशंपायन लाडिक शब्दानें मला कांहीं-तरी असेच प्रेमळ शब्दानें उत्तर देईन. परंतु सायकल आपल्या गुडघ्याला टेकवून व आपल्या कोटाचे दोन्ही खिसे चांचपत त्यानें तोंडातल्या तोंडांत कांहीं तरी पुटपुटण्यास सुरवात केली. " चल तूं घरीं त्याचें काय मोठेसें विशेष ? राहिलें आज काम तर राहिलें. उद्यां होईल. त्याचें काय एवढेंसें. "

" म्हणजे आहे काय तुझें विशेष काम ?

" तसं कांहीं विशेष नाहीं. ते आपले सुखटणकर नाहींत का— जळगांवाहून बदलून आलेले हेडक्लार्क, त्यांनीं मला सहज बोला-विलें होतें, कधीं तरी एकदां येऊन जा म्हणून ! म्हटलें, आज रविवार, भेटले तर भेटले !—इतकेंच. "

मग मी वैशंपायनाला आग्रह केला, ' जा तर तूं आपला त्यांच्या-कडे—' पण मध्येंच काय त्याला उमाळा आला कोण जाणे ! त्यानें माझ्या पाठीवर जोराची थाप दिली आणि म्हटलें, " बापट चलच तूं आतां घरीं, चहाच काय, पण तुला आणखी पुष्कळ मजा दाखवावयाची आहे आमच्या येथली, चल—"

त्यानंतर तो पलीकडे, सायकल मध्यें, आणि मी अलीकडे अशा थाटांत त्याच्या घरीं पोहोंचलों. रस्त्यानें जातां जातां मी कांहीं तरीच प्रश्न विचारले, आणि त्यानें उत्तरें दिलीं तींही पण विचि-त्रच ! ' तुझी सायकल इतके दिवस वापरून अजून कशी कोरीच्या कोरीच ? ' असें मी त्याला विचारावें, तर त्याचें उत्तर यावें.—

" ती मूळ मीं विकतच घेतली नाहीं—माझा निश्चयच हो
तुला माहीत नाहीं का, कीं, लग्न झाल्यावर श्वशुराकडून ही देण
लाटायची म्हणून ? " " तुझें आपलें बरें आहे बुवा. कशा
काळजी नाहीं—" माझ्या या म्हणण्यावर मात्र सदाशिवाला अप
मित हर्ष होई आणि मग तो लगेच म्हणे, " बापट ! आ
आम्ही जर बंगल्याचा नमुना आंखला, तर त्याला पुढच्या दर्श
भागाला सज्जा ठेवला तर बरा दिसेल—कीं तसें कांहीं नकोच
आपला साधाच बरा ? " तर मी आपलें अळेंबळेंच म्हणा
" तसं कशाला—दर्शनी भागालाच ठेव ना सज्जा ! "

मला वाटे ' वैशंपायनानें ' मात्र आपल्या स्वतःच्या विचार
एवढें गढावें आणि माझ्याबद्दल मात्र चुकून कसलीही चौक
करूं नये ! असें कां ? आपण त्याचे मित्र नाहींत का ? बाळप
पासून तो आणि आपण एकत्र वाढलेलों—पण मी मात्र त्याच
विचाराच्या सुराशीं सूर मिसळावा आणि त्यानें मात्र माझ
विषयीं बेफिकीर असावें !

* * *

त्याच्या बिऱ्हाडीं पोहोंचल्यावर त्यानें तांतडीनें मला बसावय
आरामखुर्ची पुढें केली आणि लागलीच म्हटलें, " हिचें लाकू
सागवानी आहे, मनोहर ! आणि हिची ठेवण किती ऐटब
आहे पाहा. " " खरेंच कीं सुंदर आहे बुवा ही खुर्ची ! " " आ
तासन् तास हींत बसून राहिलें तरी पाठीला रग म्हणून कशी
लागत नाहीं; बघ—" " बरं आहे आपलं ऑफिसांतून घ
आल्यावर इथेंच पडायला " असें म्हणून विषयाला पा
मिळावा म्हणून मीं तींत सपशेल अंग टाकलें. पुढें
वैशंपायनानें आपल्याला हें वर्ष आर्थिकदृष्ट्या किती फायद

गेलें हें सांगितलें आणि आपण केलेल्या नव्या खरेदीची साधारण कल्पना माझ्यासमोर उभी केली. चहापेक्षां या सर्व गोष्टींच्या वर्णनाची गोडीच त्याला मला पाजावयाची होती असें दिसलें.

मी आतां त्याची रजा घेणार एवढ्यांत त्यानें चपळाईनें घरांत जाऊन एक बारीक डबी माझ्या हातांत दिली.

“ उघडून पाहा, मनोहर ! कुडीचा जोड केवढ्याला घ्यावा सांग. ”

“ केवढ्याला घेतलास ? ”—मींच उलट त्याला प्रश्न केला.

“ दीडशें रुपयांला. का महाग पडला होय ? ”

“ छे रे ! सुंदरच सौदा केलास हा. ” मग काय मी जाऊं आतां ? ” तो मला दारापर्यंत पोंचवायला आला. मला निरोप देतांना परत वळतांना मोठ्यानें माझ्याकडे ओझरतें वळून म्हणालाच, “ ठीक आहे, मनोहर ! तूं म्हणतोस त्याप्रमाणेंच बंगल्याला दर्शनी सज्जाच ठेवतों म्हणजे झालें ! ”

दुपारीं जेवण झाल्यावर मीं मनाशींच सकाळच्या गोष्टीबद्दल विचार केला. “ त्यांत वैशंपायनाकडे काय दोष ! आपल्याशीं तो समरस झाला नाहीं, आपण तरी त्याच्याशीं एवढें कुठें एकरूप होऊन बोललों ? त्यांत आपलाही नाहीं का दोष ! आपल्या मनांतल्या गोष्टी त्यानें शांतपणें ऐकून घेतल्या असत्या, म्हणजे आपल्याला नसता का आनंद झाला ? जसें सदाशिवाच्या गोष्टींत एवढें महत्त्व नव्हतें, तसेंच आपल्या गोष्टींत त्याला महत्त्व वाटलें असतें असें कशावरून ? आणि तसें पाहिलें तर कालपासून आपण जें हृद्गत आपल्याजवळ ठेवलें आहे, त्यांत एवढें विशेष तें काय आहे ? ”

संध्याकाळीं घरीं तशीच विशेष गोष्ट घडली. जेवण झाल्यावर मीं आपण होऊन पत्नीजवळ कांहीं गोष्टी बोलावयास सुरवात

करणार तोंच ती म्हणाली, “ ठाऊक आहे का तुम्हांला काय काय खरेदी केली आज मीं बाळाकरितां ती ! तुम्हांला काय होतं !— तुम्ही ऑफिसांत जातां—पण ‘ बाळ ’ रडून घर डोक्यावर घेतो. त्याची नको का कांहीं समजूत करायला ?–बघा तर खरीं हीं रिंगणीं आणि रबराची बाहुली किती छान आहेत तीं ! ”

‘ छान आहेत कीं–’ एवढें बोलावयास आपणांस संधि मिळाली यामुळें मला हर्ष झाला. पण यामुळें माझ्या पत्नीस उत्तेजन येऊन तिनें आपली चर्पटपंजरी सुरू केली. “ आणि हें चिटाचं कापड. दिवाळी आठ दिवसांवर आली, तेव्हां ‘ बाळाच्या ’ आंगचीं सुरेख झबलीं मी घरींच शिवणार आहें. पाहा ना पण कापडाचा रंग नी त्याच्या वरच्या फुल्या, तुम्हांला पसंत आहेत का त्या ? ”

“ वा ! सुन्दरच आहेत कीं ! कापड टिकेलही पण छान ! आणि फुल्या पण मोठ्या नाहींत. ” मी बोलून गेलों खरा, पण काय बोललों तें मला खरोखर कळले नाहीं. मग तिनें आपल्या शेजाऱ्यापाजाऱ्या मैत्रिणींच्या संबंधीं कांहीं टकळी करण्यास सुरवात केली. मग मला बिलकूल राहावेना.

“ तुमचीं सर्वांनीं संभाषणें ऐकून घेण्याचा जणूं कांहीं मीं मक्ताच घेतला आहे वाटतें ! आणि मीं कांहीं बोलायला लागलों म्हणजे मात्र तुम्हीं कोणी ऐकून घेण्याइतकी शांतता धारण करूं नये. ” मी खुर्चीवर बसल्याबसल्याच बोलूं लागलों. “ मला तुला आज पुष्कळच गोष्टी सांगावयाच्या आहेत. पहिली गोष्ट म्हणजे माझा या नोकरींत चांगलासा निभाव लागेल, असें वाटत नाहीं. तूच पाहा मी कामांत कांहीं अळंटळं करतों का ? पण आमचे

वरिष्ठ तिरसिंगराव, त्यांना मात्र माझ्या या कर्तव्यानें पाझरच फुटत नाहीं. सेवाधर्म परम गहन म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं."

"हें बघ काल काय झालं–त्या काळ्या बुकांत ३८ नंबरचा कागद नोंदण्याच्या ऐवजीं मी तांबड्या·········दिवा भडकला वाटतं ······· थोडा बारीक तरी कर—"

माझ्यासमोर भडकणाऱ्या दिव्याकडे लक्ष जाऊन मीं म्हटलें, आणि त्याच वेळीं आपल्या संभाषणाचा आपल्या पत्नीवर काय परिणाम झाला असावा हें पाहाण्याच्या उद्देशानें तिच्याकडे सहज वळून पाहिलें; पण ती आपल्या हातांतील शिवणकामांत गर्क झाली होती असें दिसलें. मात्र माझ्यासमोर टिक् टिक् करणारें घड्याळ माझ्याकडे आणि मी घड्याळाकडे असे एकमेकांकडे शून्य मनानें बघत राहिलों !

—वा. भा. पाठक

प्रश्नः—वैशंपायन आणि गोष्टींतील गृहस्थ, ह्यांच्यांत कशाप्रकारें संभाषण घडून आलें ? त्यांत दोषी कोण होते ? संध्याकाळीं अशी कोणती विशेष गोष्ट घडली कीं जिची आठवण त्याच्या एवढी लक्षांत राहिली ? घड्याळ व गृहस्थ एकमेकांकडे शून्य दृष्टीनें बघत राहिले असें कां म्हटलें आहे ?

अभ्यासः—तुमच्या आयुष्यांतील एकाद्या संस्मरणीय दिवसाचें वर्णन करा.

पुरवणीवाचनः—श्री. य. गो. जोशी यांनीं संपादित केलेलें 'माझ्या आवडत्या गोष्टी' हें पुस्तक वाचा.

# ४१. आमची सोनी.

**ओळख:**—श्री. हरि सखाराम गोखले (जन्म इ. स. १८९५) हे 'काहींतरी' या लोकप्रिय काव्यसंग्रहाचे कर्ते होत. श्री. अज्ञातवासी यांनीं संपादित केलेल्या महाराष्ट्रशारदेंत त्यांच्या ज्या कविता प्रसिद्ध झाल्या, त्यांमुळें हे प्रथम रसिकप्रिय झाले. भाषेचा साधेपणा, मार्दव आणि चिंतनशीलता हे यांच्या काव्याचे प्रमुख घटक होत. तसेंच तें ध्येयानुलक्षी असतें. साध्या विषयांतून ते सहज लीलेनें मोटा आशय काढूं शकतात.

**विषय:**—सोबतच्या कवितेंत–नाट्यगीतांत–वर्णिलेला अनुभव, कवी-प्रमाणेंच सर्वांना दररोजच्या आयुष्यांत येत असतो. लहान मुलांमुलींचें मन, म्हणजे क्षणांत हंसणारें आणि क्षणांत मलूल होणारें फूलच! किती साध्या गोष्टीनें त्यांना आनंद होतो. 'चला, भुर्र जाऊं' असें म्हणतांच तीं पांखरांसारखीं उंच उडूं लागतात. बरें, जरा 'नाहीं' म्हणतांच लाजाळूच्या झाडासारखीं खालीं मान घालून बसतात. कवींनीं आपल्या 'सोनीला' शेवटीं बाहेर नेण्याचें ठरविलें, तेव्हां तिनें कोण थाटमाट केला!

मृदुल इतुकी नच मना बोचणारी
प्रबल इतुकी दृढ पाश घालणारी
नवल मोठें आनंद तींत पूर्ण
अशी आज्ञा ओळखा करिल कोण? १

मुकुल कलिकेपरि गाल ते फुगीर
राग रुसना सांचला जणुं अधीर
तरल आशाकुल साश्रु दृष्टिपात
रंगवीतो अनुराग क्षणार्धांत! २

रुष्ट उत्सुकता उघडुनी मुखातें
म्हणे-' मजला ने आज फिरायातें '
माझि भारी लाडकी सोनुबाई
असा साधा अनिवार हट्ट घेई. ३
' नको ' म्हटलें क्षणमात्र अश्रु आले
' बरें नेतों ' म्हणतांच कुठें गेले
शब्द केवळ बदलतां मनाजोगी
सृष्टि बाळांची, आमुची अभागी ! ४
झणीं हातांनीं केश सांवरून
रुसुनि पाहुनि मनमोकळें हंसून
चोळिपरकर नेसली थाटमाट
विचारीतां तो काय, पहा ऐट ! ५

—हरि सखाराम गोखले.

प्रश्नः—एकाच वेळीं मनाला मृदुल आणि प्रबल असें कां म्हटलें आहे ? उत्सुकतेला रुष्ट कां म्हटलें आहे ? सोनीच्या डोळ्यांत अश्रु आले आणि पुन्हा नाहींसे झाले असें, म्हणण्यांत कोणती गोष्ट सूचित झाली आहे ? कोणती आज्ञा अवघड असते ?

अभ्यासः—( अ ) खालील गोष्टी ध्यानांत घेऊन या कवितेचें रसग्रहण तुमच्या शब्दांत लिहा. ' भाषा ', ' मध्यवर्ती कल्पना ', ' मनावर होणारा एकंदर परिणाम. ' ( ब ) ' रूपक ' व ' उपमा ' या अलंकारांचीं या गीतांतील उदाहरणें द्या.

पुरवणीवाचनः— रे. टिळक यांच्या ' लेकराची जिज्ञासा ' व ' माझी ताई ' ह्या कविता वाचा.

---

# ४२. सौंदर्यभावना विरुद्ध स्वामित्वभावना.

ओळख:—प्रो. द. के. केळकर ( जन्म इ. स. १८९६ ) यांचें नांव मराठींतील प्रमुख टीकाकार व निबंधलेखक म्हणून प्रसिद्ध आहे. निरनिराळ्या नियतकालिकांतून, अनेक स्फुट लेख लिहून आजकालच्या सामाजिक प्रश्नांची चर्चा ते नेहमीं करितात. 'काव्यालोचन' हा त्यांचा ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहे. भावनांकित विचार हेंच त्यांच्या लेखनशैलीचें वैशिष्टय होय. हल्लीं ते मुंबईस रामनारायण रुइया कॉलेजांत मराठीचे प्राध्यापक म्हणून काम करीत आहेत.

विषय:—सृष्टींतील निर्भेळ सौंदर्याचा आस्वाद घेण्याची इच्छा प्राणिमात्राच्या ठिकाणीं उपजतच असते. तथापि अशा तऱ्हेचा शुद्ध आनंद व सुख मिळवीत असतांना त्याच्या ठिकाणीं असलेला अहंकार आणि स्वामित्वाची भावना हीं उचल खातात. हीच गोष्ट लेखकानें आरंभीं फुलपांखराचें उदाहरण घेऊन आजच्या जगाच्या परिस्थितीशीं कशी लावून दाखविली आहे, ती पाहा. लेखकानें दाखविलेला शेवटचा आशावाद किती स्पृहणीय आहे !

माझ्या बंगलीच्या समोर आंगणांत एक सुंदर लहानसा बाग आहे. रोज प्रातःकाळीं उठून त्या बागेंत जाऊन खुर्ची टाकून तेथें बसण्याचा माझा नित्याचा परिपाठ आहे. सकाळची उषःकाळची वेळ ही आधींच आल्हादकारक. सूर्याचीं कोमल कोवळीं किरणें सर्वत्र पसरलेलीं, बागेंतील फुलझाडें फुललेलीं, आणि चित्रविचित्र रंगानें नटलेलीं. सर्व वातावरण प्रशांत पण प्रोल्हासित अशा वृत्तींत बुडून गेलेलें. अशा स्थितींत सूर्य झपाझप पावलें टाकीत वर केव्हां

येई हें कळत नसे. या वेळीं मला सर्वांत अधिक आल्हाद कशांत होत असेल तर बागेंतील या पुष्पावरून त्या पुष्पावर उडणाऱ्या फुलपाखरांची क्रीडा निरीक्षण करीत बसण्यांत. किती तेजस्वी आणि चित्रविचित्र त्यांचे रंग. किती कोमल स्पर्श, किती तरल आणि त्वरित गति. पुष्पाशीं इतकें काय त्यांचें हितगुज चाललेलें असतें तें त्यांचें त्यांनाच माहीत ! एकदां एका पुष्पाच्या कानांत कांहीं कुजबुजून लगेच दुसरीकडे जावें आणि क्षणार्धांत कांहीं तरी आठवल्यासारखें करून पुनश्च पहिल्या पुष्पाशीं येऊन गुंगावें, असा अव्याहत त्यांचा खेळ चाललेला असतो. पुष्पांचा मधु लुटून घेऊन पुन्हा त्यांना आनंदित करावयाचें ही कला हे फुलपांखरा, तुलाच साधावयाची. तुझ्या पंखांवर हे इतके मनोहर रंग कसे उमटले हें आतां मला कळलें. पुष्पाशीं तूं इतका तद्रूप होऊन जातोस, आत्मीयत्व विसरतोस, म्हणून पुष्पांचे रम्यो-ज्वल रंग तुझ्या पंखांवर नकळत उमटत असतील. पुष्पांचें सौंदर्य खुलवावें आणि आपणहि आनंद लुटावा हें तुझ्या खेळकर वृत्तीचें सार.

बागेंत विहरणाऱ्या या फुलपाखरांची क्रीडा पाहात बसणें हें माझें नित्याचें व्यसनच होऊन बसलें होतें. या नित्याच्या व्यव-सायांत एक दिवस अकल्पितपणें खंड पडला.

एके दिवशीं सकाळीं नित्याप्रमाणें बंगलीचें दार उघडून बाहेर जों डोकावतों, तों सूर्यकिरणांचा सुखोष्ण कोमल स्पर्श अनुभवा-वयास सांपडण्याऐवजीं आकाशांत मेघ आल्यासारखे दिसूं लागलें. दिवस तर ऐन वसंत ऋतूचे. वर पाहूं लागलों तोंच जो मेघ म्हणून दिसत होता तो झपाट्यानें खालीं येऊं लागला, विस्तार पावूं लागला व पाहातां पाहातां जमिनविर हजारों–लाखों लहान

लहान सावल्या पळत सुटल्याचें दिसूं लागलें. विचार करण्यास वेळच नव्हता; समोरचा मेघ देखतादेखत विरून जाऊन त्यांतून लाखों कीटक बाहेर पडूं लागले, बंगलींत शिरूं लागले. अधिक विचार न करितां मी बंगलींत परत आलों व दारें बंद करून घेतलीं.

दोन तीन तासांनीं बाहेर येऊन पाहातों तों माझ्या आवडत्या बागेंत किती विलक्षण, किती भेसुर फरक पडलेला ! हंसऱ्या गालाच्या प्रफुल्ल चेहऱ्याप्रमाणें सतेज टवटवीत पुष्पांचा आतां मागमूसहि राहिलेला नव्हता. दुष्काळांतील उपासमारीनें काळवंड-लेल्या व अस्थिशेष उरलेल्या सांपळ्याप्रमाणें फुलझाडांचे नुसते खराटे उभे होते; आणि आजूबाजूस सर्वत्र त्या संहारक कीटकांचा सडा पडलेला होता. निरखून पाहूं लागलों तों किती हिडीस प्राणी ! असंख्य कीटक खातांखातांच मरून पडले होते. फूल नाहीं, फळ नाहीं, पान नाहीं, अमुक एक त्यांनीं खावयाचें बाकी ठेवलें होतें, असें नाहीं. तोंडाशीं येईल तें खाऊन फस्त ! सर्व इंद्रियें तोंडांतच एकवटलीं होतीं कीं काय कोण जाणें. पण इतकें मनसोक्त खाऊन चेहेरे पाहावे तों किती फिकटलेले आणि पाय किती फेंगडे ! हजारों नुसते खाऊनच मृत्युपंथाला लागलेले आणि त्यांचे बाकीचे संवगडी त्यांची फिकीर न करतां स्वतः अधिकच खात सुटलेले.

फुलपांखरूं आणि टोळ ! किती विदृश जोडी ही ! एकाची वृत्ति जगांतील सौंदर्याचा आस्वाद घेऊन जग आनंदानें भरून टाकावें ही, तर दुसऱ्याची जगांतील सौंदर्य बळकावून, भक्षून, फस्त करून जग दुःखाच्या गर्तेत लोटून द्यावें ही.

आज जगभर धुमसत असलेल्या असमाधानाच्या मुळाशीं हीच टोळधाडी स्वामित्ववृत्ति नाहीं का ? एका व्यक्तीनें दुसऱ्या

व्यक्तीवर, एका जातीनें दुसऱ्या जातीवर, एका राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्रावर आक्रमण करून, सत्ता, मत्ता, सौंदर्य हीं सर्व आपणच बळकावून बसावयाची, हीच वृत्ति आजच्या जगाच्या पोटदुखीच्या मुळाशीं आहे. सर्व जगाचें शेत मी पिकवीन, दुसऱ्याला त्यांत नांगर टाकूं देणार नाहीं; धान्य विकलें गेलें नाहीं तर उभें पीक जाळून टाकीन, पण कोणाच्या झोळींत चिमूटभर उचलून टाकणार नाहीं; स्पृश्यवर्ग देवदर्शनाची हेळसांड करूं लागला तर देवळाला टाळे लावीन, पण अस्पृश्याची सावली घरावर पडूं देणार नाहीं; एक ना दोन–सर्वत्र स्वामित्वाची अरेरावी वृत्ति.

या वृत्तीचा करडा लष्करी अंमल जोंवर जगावर चालू आहे, तोंवर सुखशांतीला समाजांत निवाऱ्याचें स्थान मिळणार नाहीं. स्वामित्वाची वृत्ति ही एक जहरी निशा आहे. जों जों निशापाणी वाढवीत जावें तों तों कैफ चढत जातो, एक प्रकारच्या मादक आनंदाचे भपकारे येऊं लागतात, पण अंतीं बेहोष होऊन त्या आनंदाचे भेसूर दुःखांत रूपांतर होण्यास अवसर लागत नाहीं. सुखाकरितां आणि आनंदाकरितां सुखविषय हस्तगत करण्याची धडपड ना? पण या धडपडींत स्वामित्वभावनेलाच एवढा विलक्षण जोर चढतो कीं, जी वस्तु हस्तगत करण्याकरितां जिवाचें रान केलें ती वस्तु हस्तगत केल्यावर तिचा आस्वाद घेण्याची विस्मृति पडून वस्तूच्या आस्वादाच्या ऐवजीं स्वामित्व–वृत्तीच्या आनंदांतच माणूस गर्क होऊन जातो. सुखाच्या तिजोरीची एक किल्ली म्हणजे संपत्ति. पण या संपत्तीच्या मागें लोभी माणूस एकदां लागला म्हणजे संपत्ति हें सुखाचें साधन आहे हें विसरून जाऊन संपत्तीचा संचय करणें हेंच अंतिम सुख होय अशा मिथ्या भ्रहाच्या भोवऱ्यांत सांपडतो. प्रसन्न होईपर्यंत ज्या संपत्तीची तो

झाडाचीं कामें करून अव्यभिचारी:निष्ठेनें उपासना करीत असतो, ती प्रसन्न झाली कीं, तिच्या प्रसन्न वातावरणांतील आनंदाचा आस्वाद घेण्याचा विसर पडून त्यानें तिला कडीकुलुपांत कोंडून टाकावें, हा देखावा विचित्र नाहीं का ?

याच्या मुळाशीं आनंदाची, सुखाची, विकृत व विपर्यस्त भावना दडलेली असते. सुखविषय हा दुसऱ्याचा हिरावून, बळकावून सर्वस्वीं आपल्या मालकीचा केल्याशिवाय सुखाची खरी माधुरी चाखतां येत नाहीं, ही ती भावना होय. ही भावना होतां होतां इतकी प्रभावी होते कीं, तिच्या आहारीं गेलेल्याचें लक्ष सुखविषया-वरून उडून हिरावून घेण्याच्या मालकी हक्काच्या भावनेंतच सर्वस्वीं गुरफटून जातें. लहान मुलाला खाऊचा तुकडा दिला तर तो नुसता खाणार नाहीं, तर शेजारच्या मुलाला वाकुल्या दाखवीत टुक टुक करीत खाईल. आपल्या हातांत दहा खेळणीं असलीं तरी दुसऱ्याच्या हातांतलें नवें खेळणें हिसकावून घेतल्याशिवाय कांहीं मुलांना चैनच पडत नाहीं; आणि मग तीं सर्व खेळणीं मांडी-खालीं घालून गाल फुगवून दुसऱ्याकडे तोऱ्यानें, वर्चस्वभावनेनें पाहाण्यांत काय तो खरा आनंद !

मानवी समाज या बाल्यावस्थेच्या पलीकडे अद्यापहि फारसा गेलेला नाहीं. या समाजानें शास्त्र, विद्या, कला यांचा भव्य प्रासाद उठविला आहे; सृष्टीवर विलोभनीय असें स्वामित्व संपादन केलें आहे; पण खुद्द स्वामित्वभावनेवर त्याला विजय मिळवितां आलेला नाहीं. भौतिक सृष्टीची एकनिष्ठपणें सेवा करून तिचें हृदय यानें काबीज केलें आहे. पण स्वतःच्या अन्तःकरणां-तील स्वामित्व-भावना ही मात्र त्याला अद्याप हाताच्या बोटावर हवी तशी खेळवीत आहे.

मानसशास्त्र सांगतें कीं, एखाद्या व्यक्तीचें शारीरिक वयोमान, बौद्धिक वयोमान व भावनात्मक वयोमान हीं पुष्कळ वेळां अगदीं भिन्न भिन्न असूं शकतात. शरीर आणि मन यांची वाढ असमांतर झाली तर शारीरिक वयोमान व बौद्धिक वयोमान यांच्यांत छत्तिसाचा आंकडा उमटूं शकतो. डोक्याचे केस पिकलेले पण आंतील बुद्धि मात्र बालकाला शोभेशी, किंबहुना बालिश अशीं म्हातारीं माणसें तुम्हीं पाहिलीं नाहींत ? किंवा वयानें पोरसवदा पण मनानें जरठ असे तरुण तुम्हांला आढळले नाहींत ? दाढी पिकली असूनहि फिदी फिदी हंसून माकडचेष्टा करणारे व मिशी फुटली नसूनहि भरतमल्याचा सुतकी चेहरा धारण करणारे हे दोन्ही प्रकार विचित्र नव्हेत का ? पण शरिराची व मनाची विसंगत वाढ झालेलीं माणसें जगांत अगदींच थोडीं सांपडत नाहींत.

मनाच्या निरनिराळ्या शक्तींची ही बेताल बेढब वाढ झालेली आढळून येते. बुद्धीनें व कल्पनेनें अबलख घोड्याप्रमाणें तल्लख असलेलीं माणसें, भावनेच्या किंवा इच्छाशक्तीच्या बाबतींत मद्दड बैलोबाप्रमाणें सुस्त असलेलीं कित्येक वेळां आढळून येतात. कल्पनेच्या प्रांतांत जे गडकरी अत्यंत धाडसी म्हणून गाजले, तेच गडकरी व्यावहारिक जगांत आपल्या एका नाटकावर राजकीयत्वाचा आरोप येण्याचा संभव आहे येवढ्या नुसत्या संशयानें तें नाटक जाळण्यास प्रवृत्त झाले; किंवा जो शोपेनहार जग हें दुःखपूर्ण असल्यानें आत्महत्या करणें हेंच श्रेयस्कर असें आपल्या ग्रंथांतून बेहोषपणें प्रतिपादन करी, तोच शोपेनहार देशावर परचक्र आल्यावर स्वतःचा जीव बचावण्याकरितां एका खेड्यांत जाऊन लपून बसला, या गोष्टी सांगितल्या तर खऱ्या तरी वाटतील ? पण अशी बेडौल वाढ झालेली जगांत आढळून येते.

आजच्या मानवी समाजाची वाढ ही अशीच बेडौल, बेताल व विसंगत झालेली आहे. शास्त्र, कला, वाङ्मय यांची निस्सीम उपासना करून समाजानें बुद्धीची आश्चर्यकारक वाढ केलेली आहे. पण स्वतःच्या भावनांना सुसंस्कृत करण्याच्या बाबतींत मात्र त्याची बाल्यावस्था अद्याप संपलेली नाहीं. लोकांच्या हातांतील खाऊ वा खेळणें हिसकावून घेण्यांत हिटलरी गाजविण्याची त्याची बालिश वृत्ति अद्याप कायमच आहे. बुद्धीची झेंप येवढी प्रचंड कीं, अनंत, अथांग भासणाऱ्या विश्वगोलाचा परीघ मोजून काढण्याची ती उमेद धरते ! पण भावनेची क्षुद्रता एवढी कीं, अनंत विश्वांतील रजःकणासमान भूमीवर जेथें तो उभा आहे, तेथील सुईच्या अग्रावरील मातीला दुसऱ्यास हात लावूं देण्यास ती राजी नसते ! बुद्धि राष्ट्रसंघाच्या संघारामांत वसून निःशस्त्रीकरणाचीं सुरस चित्रें रंगविते; पण भावनेची मंथरा तिच्या कानांत तत्काळ कुजबुजते कीं, हीं तुझीं मनोमय चित्रें कारखान्याच्या बाहेर दर्शनी मांड आणि आंत मात्र दारूगोळयाचा प्रचंड मांड तयार ठेव !

आनंद आणि सुख यांची कल्पना स्वामित्व–भावनेच्या छायेखालीं इतक्या शतकानुशतकें वाढत आलेली आहे कीं, स्वामित्वभावनेच्या बाहेर निर्लोभ, निःस्वार्थी सुखाचें जग असूं शकेल याच्या कल्पनेचें वारेंहि तिला क्वचितच लागतें.

पण या बाहेरच्या जगाच्या हवेची शुद्ध शीतळ झुळुक केव्हां ना केव्हां तरी अनुभवाला येतेच येते.

आनंदाचे–सात्त्विक, निर्भेळ, निरतिशय आनंदाचे–कांहीं विषय असेच आहेत कीं, ज्यांच्यापर्यंत स्वामित्वभावनेचे पाश पोहोंचूं शकतच नाहींत. स्वामित्वाच्या भावनेला गवसणी घालून

निर्लोभ अंतःकरणानेंच त्याचा सौंदर्यास्वाद घ्यावा लागतो; पण त्या आस्वादाची माधुरीहि तशीच ' सुधाता स्वादीया ' व अवीट असते. आकाशाचा अफाट गोल हा अशाच निर्भरानंदाचा एक अखंड ठेवा नाहीं काय ? नभोमंडलांतील तीं रेशमी इंद्रधनुष्यें, तो विद्युल्लतेचा जरतारी नाच, ती उदयास्तकालीन अवर्णनीय रंगसंपत्ति, आणि तो सर्वत्र भरून राहिलेला कोमल स्निग्ध नीलिमा हीं अनंत आनंदाचीं अमर्याद खुलीं भांडारें होत. कोणत्याहि सत्ताधीशाला त्यांच्यावर आपल्या स्वामित्वाची, मालकीची मोहोर ठोकतां येणार नाहीं.

पण स्वामित्व नाहीं म्हणून या विश्वसौंदर्यापासून मिळणारा आनंद उत्कटत्वांत रतीभर तरी कमी असतो ? छे ! उलट जास्तच असतो. स्वत्वाचा अर्धवट विसर पडल्याशिवाय आनंदाला उत्कटताच येत नाहीं. आनंदाच्या उत्कटक्षणीं आस्वेत्ता हा आस्वादविषयाशीं तद्रूप झालेला असतो, फुलपांखराप्रमाणेंच पुष्पांत गुंगून राहिलेला असतो. अशा तल्लीनावस्थेंत स्वत्वाचीच भावना विरल होऊं लागते; मग स्वामित्वाच्या भावनेस कोठला थारा ? सूर्याचें स्फूर्तिप्रद ऊर्जस्वल तेज, गिरिनिर्झरांचें मंजुळ संगीत, सागराचा गंभीर घोष, पवनाचा शीतल जीवनदायी स्पर्श, हे आनंदाचे अखंड झरे होत. कोणत्या सम्राटाच्या कोणत्या जामदारखान्यांत तुम्ही त्यांना कोंडणार ? रात्रींच्या प्रशांत समयीं प्रांगणांत तारकरत्नांचा नुसता सडा पडलेला असतो. कोणीहि डोळे भरून त्यांचा तेजस्वी चमचमाट पाहावा आणि धन्य व्हावें. पण त्यांतील एक तरी हिरकणी उचलून तुमच्या लोखंडी पेटींतील अंधारांत दडवून ठेवतां येईल काय ? अधूनमधून आकाशांतील एखादी हिरकणी निखळून भूमीवर पडते, पण तेथें स्वैरसंचार

करणाऱ्या स्वामित्वबुद्धीच्या लोभी हातांत आपण पडूं, या भीती-नेंच जणूं पृथ्वीवर येतांच पाषाणवत् होऊन काळीठिक्कर पडते! पण निःस्वार्थ, निर्लोभ वृत्तीनें तारकांचें सौंदर्य निरीक्षण करीत बसलांत तर प्रहरान् प्रहर केव्हां गेले याचें भानहि राहणार नाहीं.

आणि या आनंदाचें सेवन असंख्य लोकांनीं एकसयावच्छेदें-करून करावें. त्याला संख्येची मर्यादा नाहीं, स्थलाची नाहीं वा कालाची नाहीं.

सृष्टीमध्यें अवीट आनंदाचे हे विषय जसे आयतेच सिद्ध आहेत, तसे नवीन निर्माण करण्याची अलौकिक शक्तीहि मानवांस लाभलेली आहे. ती म्हणजे काव्यादि ललितकलांना जन्म देणारी प्रतिभा. हिच्या साहाय्यानें केवळ आनंदैकधन असें स्वतंत्र विश्वच प्रतिभावनांनीं निर्माण केलें आहे. यांत कोणासहि मज्जाव नाहीं. काव्यसृष्टींत कोणींहि मनसोक्त विहार करावा. व्यास-वाल्मी-कींची छंदोबद्धवाणी एकदां अवतीर्ण झाली, कीं पिढ्यान् पिढ्यांनीं तींतील रसास्वाद लुटीत राहावा. स्वामित्वबुद्धीनें एकट्याचा म्हणून उपभोगिला जाणाऱ्या आनंदाला खजील करणारा आनंद असेल तर तो हा काव्यादि ललितकलांचा. स्वामित्वाच्या संकुचित भाव-नेचा स्पर्श तर याला सहन होत नाहींच; पण याचें सेवन करणारे सहकारी जितके अधिक तितका तो अधिकच खुषींत येतो. नाटकाच्या प्रयोगाला किंवा गाण्याच्या मैफलीला तुम्ही कधीं एकटे-एकलकोंडे जाल? तसे जाल तर त्यांतील आनंद हिरमुसला होईल, फुरंगटेल, फुलणार नाहीं. उलटे समानवृत्ति, सहृदय असे जितके रसिक तुम्ही एकत्र जमाल, तितका आनंद अधिकाधिक लज्जतदार होत जाईल.

ही सामुदायिक आनंदसेवनाची सौंदर्यभावना हा स्वामित्व-

**भावनेवरील एक तोडगा होय. ही निःस्वार्थी आनंदसेवन करण्याची आवड जितकी वाढेल, तितकी समाजांत सुखशांति नांदूं लागेल.**

—द. के. केळकर.

**प्रश्नः**—फुलपाखरूं आणि टोळ, यांच्या वृत्तींचे कोणते विशेष लेखकानें येथें दाखविले आहेत ? आजच्या मानवी समाजाची वाढ अशीच बेडौल व विसंगत झालेली आहे, याला लेखकानें कोणतीं उदाहरणें घेतलीं आहेत ? सृष्टीमध्यें कोणते अवीट आनंदाचे विषय भरून राहिले आहेत ? समाजांत सुख आणि शांति हीं केव्हां नांदूं लागतील ? लेखकाच्या मतें आनंदाचे अखंड झरे कोणते ?

**अभ्यासः**—खालील वाक्यांतील कल्पना स्पष्ट करा.

( १ ) याच्या मुळाशीं आनंदाची, सुखाची विकृत व विपर्यस्त भावना दडलेली दिसते.

( २ ) शरीर आणि मन यांची वाढ असमांतर झाली, तर शारीरिक वयोमान व बौद्धिक वयोमान यांच्यांत छत्तिसाचा आंकडा उमटूं शकतो.

( ३ ) आणि या आनंदाचें सेवन असंख्य लोकांनीं एकसमयावच्छेदें-करून करावें. त्याला संख्येची मर्यादा नाहीं, स्थलाची नाहीं वा कालाची नाहीं.

**पुरवणीवाचनः**—श्री. ना. गो. चापेकर, यांच्या ‘ गच्चीवरील गप्पा ’ हें पुस्तक व प्रस्तुतच्या लेखकाचें ‘ काव्यालोचन ’ वाचा.

---

# ४३. हितगुज.

**ओळख:**—श्रेष्ठ दर्जाचे राष्ट्रीय कवि म्हणून रामदास ( जन्म शके १५३०, मृत्यु शके १६०३ ) यांचें नांव मराठी वाङ्मयांत चिरस्थायी झालें आहे. यांचें मूळगांव 'जांब.' यांच्या आईचें नांव राणूबाई आणि वडिलांचें सूर्याजीपंत. लहानपणापासून यांची वृत्ति विरक्त होती. त्यांनीं सर्व हिंदुस्थानभर प्रवास करून लोकजागृति केली. शिवाजी महाराजांच्या स्वराज्यस्थापनेच्या बहुमोल कार्यांत त्यांनीं आपल्या समयोचित व खऱ्या बोलांनीं उभा महाराष्ट्र जागा करून एक प्रकारें भरच टाकिली. यांची 'करुणाष्टकें' व 'मनाचे श्लोक' हीं स्फुट काव्यें प्रसिद्ध आहेत. त्याचप्रमाणें 'दासबोध' हा त्यांचा ग्रंथ रसिकमान्य झाला आहे. भाषेचा अस्खलित ओघ आणि वर्णनास मिळालेली अनुभवाची जोड ( आधीं केलें मग सांगितलें. ) यामुळें त्यांचें काव्य आकर्षक वाटतें.

**विषय:**—सोबतचा उतारा त्यांच्या दासबोध या ग्रंथांतून घेतला आहे. जगांतील व्यवहारांत व्यक्तीला लोकसंग्रह करून यशस्वी व्हावयाचें असेल, तर तिनें कोणत्या रीतीनें वागावयास पाहिजे, याबद्दलचें प्रेमळ हितगुज त्यांत आढळेल.

**कर्म केलेंचि करावें । ध्यान धरिलेंचि धरावें ।**
**विवरलेंचि विवरावें । पुन्हां निरूपणीं ॥ १ ॥**

**तैसें आम्हांस घडलें । बोलिलेंचि बोलणें पडिलें ।**
**कां जें विघडलेंचि घडलें । पाहिजे समाधान ॥ २ ॥**

**अनन्य राहे समुदाव । इतर जनांस उपजे भाव ।**
**ऐसा आहे अभिप्राव । उपायाचा ॥ ३ ॥**

एक हरिकथानिरूपण । दुसरें तें राजकारण ।
तिसरें तें सावधपण । सर्व विषयीं ॥ ४ ॥

चौथा अत्यंत साक्षेप । फेडावे नाना आक्षेप ।
अन्याय थोर अथवा अल्प । क्षमा करीत जावे. ॥ ५ ॥

जाणावें परांचें अंतर । उदासीनता निरंतर ।
नीतिन्यायासी अंतर । पडोंचि नेदावें ॥ ६ ॥

संकेतें लोक वेधावा । येकून येक बोधावा ।
प्रपंचहि सांवरावा । यथायोग्य ॥ ७ ॥

प्रसंग समयो वोळखावा । धीर बहुत असावा ।
संबंध पडों न द्यावा । अतिपरिचयाचा. ॥ ८ ॥

उपाधीस विस्तरावें । उपाधींत न सांपडावें ।
नीचत्व पहिलेंच घ्यावें । आणि मूर्खपण. ॥ ९ ॥

दोष देखोनी झांकावे । अवगुण अखंड न बोलावे ।
दुर्जन सांपडोन सोडावे । परोपकार करूनी ॥ १० ॥

तऱ्हे भरोंच नये । सुचावे नाना उपाये ।
नव्हे तेंचि करावें कार्यें । दीर्घ प्रयत्नें ॥ ११ ॥

फड नासोंच न द्यावा । पडिला प्रसंग सांवरावा ।
अतिवाद न करावा । कोणी एकासी ॥ १२ ॥

दुसऱ्याचें अभीष्ट जाणावें । बहुतांचें बहुत सोसावें ।
न सोसे तरी जावें । दिगंतरासीं ॥ १३ ॥

दुःख दुसऱ्याचें जाणावें । ऐकोन तरी वांटोन घ्यावें ।
बरें वाईट सोसावें । समुदायाचें ॥ १४ ॥

अपार असावें पाठांतर । सन्निध असावा विचार ।
सर्वदा सर्व तत्पर । परोपकारासी ॥ १५ ॥

शांती करून-करवावी । तऱ्हे सांडून सांडवावी ।
क्रिया करून करवावी । बहुतांकरवीं ॥ १६ ॥

करणें असेल अपाय । तरी बोलोन दाखऊं नये ।
परस्परेंचि प्रत्ययो । प्रचीतीस आणावा. ॥ १७ ॥

जो बहुतांचें सोसीना । त्यास बहुत लोक मिळेना ।
अवघेंची सोसितां उरेना । महत्त्व आपुलें. ॥ १८ ॥

राजकारण बहुत करावें । परंतु कळोंच न द्यावें ।
परपीडेवरी नसावें । अंतःकरण ॥ १९ ॥

लोक पारखून सोडावे । राजकारणें अभिमान झाडावे ।
पुनः मेळवूनि घ्यावे । दुरिल्या दोरें ॥ २० ॥

हिरवटासी दुरी धरावें । कचरटासि न बोलावें ।
संबंध पडतां सांडूनि जावें । एकीकडे ॥ २१ ॥

ऐसें असे राजकारण । सांगता तें असाधारण ।
सुचित असतां अंतःकरण । राजकारण जाणे ॥ २२ ॥

वृक्षीं रुढासी उचलावें । युद्धकर्त्यास ढकलून द्यावें ।
कारभाराचें सांगावें । अंग कैसें ॥ २३ ॥

पाहतां तरी सांपडेना । कीर्ति करूं तरी राहेना ।
आलें वैभव अभिलाषिना । कांहीं केल्या ॥ २४ ॥

येकाची पाठी राखणें । येकास देखों न शकणें ।
ऐसीं नव्हत कीं लक्षणें । चातुर्याचीं. ॥ २५ ॥

न्याय बोलतांही मानेना । हित तेंचि नये मना ।
येथें कांहींच चालेना । त्यागाविण ॥ २६ ॥

श्रोतीं कळोन आक्षेपिलें । म्हणोनि बोलिलेंचि बोलिलें ।
न्यूनपूर्ण क्षमा केलें । पाहिजे श्रोतीं ॥ २७ ॥

—रामदास.

**टीपाः**—( १ ) तऱ्हे भरणें—एककल्लीपणा करणें. ( २ ) तऱ्हे सांडून-सांडवावी—तऱ्हेवाईकपणा स्वतः न करितां दुसऱ्यालाहि करूं देऊं नये.

**प्रश्न**—रामदासांनीं कोणतें निरूपण पुन्हा पुन्हा केलें आहे ? व्यवहारदक्ष मनुष्यानें कोणत्या गोष्टी आपल्या आचरणांत आणाव्यात ? राजकारणी लोकांना उद्देशून या काव्यांत कोणता उपदेश केला आहे ? रामदासांनीं रसिकाजवळ शेवटीं कोणती मागणी केली आहे ?

**अभ्यासः**—( १ ) साक्षेप, अभीष्ट, उपाधी, सुचित ह्या शब्दांची व्युत्पत्ति द्या.

( २ ) वरील उताऱ्यावरून तत्कालीन परिस्थितीचा तुम्हांस जो बोध होतो, तो तुमच्या शब्दांत लिहा.

**पुरवणीवाचनः**—श्रीतुकाराम महाराजांनीं श्रीशिवाजीमहाराजांस जो अभंगांच्या द्वारें उपदेश केला, तो वाचा; आणि तो वरील काव्यांतील विचारांशीं तोलून पाहा.

---

# ४४. समाजोत्कर्षाचा एक घटक—व्यापारवृद्धि.

**ओळख:**—कै. गोपाळ गणेश आगरकर ( जन्म इ. स. १८५६, मृत्यु इ. स. १८९५) यांचें नांव अनेक कारणांमुळें महाराष्ट्राच्या इतिहासांत चिरकाल टिकणारें आहे. कै. लो. टिळक ह्यांच्याबरोबर त्यांनीं राष्ट्र-सेवेची दीक्षा घेतली आणि ती आमरण पाळिली. त्यांचा जन्म सातारा जिल्ह्यांतील टेंभू या गांवीं झाला. लहानपणींच त्यांना दारिद्र्याचे खडतर अनुभव भोगावे लागले आणि आपलें शिक्षण बिकट परिस्थितींत पुरें करावें लागलें. वऱ्हाडांत अकोलें येथील शालेय शिक्षण पुरें झाल्यावर तें पुण्यास डेक्कन कॉलेजांत आले. इ. स. १८८० मध्यें एम्. ए. झाल्यावर कै. चिपळूणकर व कै. लो. टिळक यांच्या बरोबरच त्यांनीं नवीनच सुरू झालेल्या न्यू. इं. स्कूल या संस्थेंत अल्पवेतनावर शिक्षकाचें काम सुरू केलें. आरंभीं ‘ केसरी ’ या वर्तमानपत्रांत त्यांचे लेख येऊं लागले; परंतु पुढें १८८८ सालीं त्यांनीं आपलें स्वतःचें असें ‘ सुधारक ’ पत्र काढून, त्यांतून सामाजिक शिक्षणाचें काम हातीं घेतलें. मध्यंतरीं त्यांना कै. लो. टिळकांच्याबरोबर डोंगरीच्या तुरुंगांत १०१ दिवसांचा कारागृहवासहि घडला. तथापि कोणत्याहि अडचणीला व टीकेला न जुमानतां खरें असेल तें बोलण्याचा व इष्ट दिसेल तें करण्याचा दृढ संकल्प त्यांनीं आचरणांत आणिला.



त्यांचे सुधारकांतील व इतर लेख पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाले आहेत, त्यांवरून त्यांची समाजसेवेची तळमळ आणि निर्भीड विचारसरणी यांची

ओळख पटते. सत्याची पूजा करितांना, लोकनिंदेची पर्वा न करणाऱ्या श्रेष्ठ लोकशिक्षकांत त्यांची गणना होते. त्यांचें लेखन जितकें साभिप्राय, तितकेंच तें कळकळीचें, आणि भाषाशैली जितकी ओघवती, तितकी ती निर्भीड आणि ओजस्वी वाटते.

विषयः—प्रस्तुतच्या निबंधांत, मानवी सुधारणेचा उद्योगाशीं कसा निकट संबंध आहे, हें लेखकानें आरंभीं दाखविलें आहे. सुधारलेलीं राष्ट्रें जीं वैभवसंपन्न झालीं, त्याचें मुख्य कारण त्यांची उद्योगप्रवृत्ति व स्वतंत्र शोध लावून नवीन वस्तु निर्माण करण्याची कलाशक्तीच होय. बुद्धीच्या अलौकिक देणगीमुळेंच मनुष्यप्राणी हा इतर प्राण्यापेक्षां निराळा वाटतो. तेव्हां तिचा विनियोग त्यानें जास्तींत जास्त सुख आपणांस कसें मिळवितां येईल, ह्या विचाराकडे केला पाहिजे इ. अनेक जिव्हाळ्यांच्या प्रश्नांची चर्चा लेखकानें कशी केली, आहे ती पाहा.

आपल्या भाषेंतील ‘ व्यापार ’ शब्द अत्यंत व्यापक आहे. शरिराच्या व मनाच्या कोणत्याही चलनावस्थेस व्यापार म्हणतात. ‘ व्यापारा ’ च्या या मूळ अर्थापासून बाकीचे अर्थ निघालेले आहेत. सांप्रत निबंधावलींत त्याचा सार्वत्रिक अर्थ घेऊन तत्संबंधानें कांहीं विचार वाचकांपुढें आणण्याचा इरादा आहे.

ज्यांनीं सामाजिक स्थित्यंतरांचा लक्षपूर्वक विचार केलेला नसतो, त्यांस असें वाटत असतें कीं, मृगयेवर चरितार्थ करून राहाणारे रानटी लोक, पशुपालन किंवा कृषिकर्म करून राहाणाऱ्या लोकांपेक्षां विशेष उद्योगी असतील. पण ही त्यांची चुकीची समजूत आहे. मांस, स्तन्य आणि धान्य ही मनुष्यांच्या उपजीविकेचीं मुख्य साधनें होत. यांपैकीं कोणत्याहि एकावर, दोहोंवर किंवा साऱ्या तिहींवर मनुष्यास आपला चरितार्थ करतां येतो.

शिकार करणें, मेंढरें, गाई, ससे, कोंबडीं, डुकरें वगैरें जनावरें पाळणें व दूध-दुभतें करणें आणि जमीन तयार करून तींत धान्य, भाजीपाला व फळफळावळ उत्पन्न करणें या तीन गोष्टींपैकीं पहिली पेक्षां दुसरीस व दुसरीपेक्षां तिसरीस अधिक श्रम, अधिक आत्म संयमन व अधिक दूरदृष्टि लागतात, हें सहज समजण्यासारखें आहे. तेव्हां ज्या लोकांत उपजीविकेचीं हीं तिन्ही साधनें अस्तित्वांत आलीं असून त्यांची आवश्यकता पटूं लागली असेल, ते लोक पहिल्या किंवा पहिल्या आणि दुसऱ्या साधनानें उपजीविका करणाऱ्या लोकांपेक्षां अधिक उद्योगी असले पाहिजेत, हें उघड आहे.

मनुष्याशिवाय इतर प्राण्यांपैकीं कांहीं केवळ मांसाहारी, कांहीं केवळ उद्भिज्जाहारी व कांहीं मांसोद्भिज्जाहारी असे आहेत. फक्त मनुष्य मात्र या तीन प्रकारच्या आहारांपैकीं पाहिजे तो आहार करून राहूं शकतो. पण जसजशी त्याला उन्नतावस्था येत जाते तसतसा त्याचा मांसाहार कमी होत जाऊन उद्भिज्जाहार वाढूं लागतो. व शेवटीं तो उद्भिज्जाहारी होईल किंवा होणें त्यास भाग पडेल, असें कित्येकांचें मत आहे; पण येथें आपणांस त्याची चर्चा करीत बसण्याची गरज नाहीं. येथें इतकेंच ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, मनुष्याशिवाय इतर प्राण्यांचे जे तीन वर्ग आहारभेदावरून वर केले आहेत, त्यांपैकीं कोणत्याहि वर्गांतील प्राण्यास आपलें भक्ष्य 'गोपालवृत्ती' चें किंवा 'कृषीवलवृत्ती' चें अवलंबन करून संपादितां येत नाहीं. अशा रीतीनें आपला चरितार्थ करण्याची बुद्धि व सामर्थ्य फक्त मनुष्यांतच आहे. मनुष्याशिवाय इतर प्राणिसंख्येची वृद्धि नैसर्गिक प्राण्युत्पत्तीवर व भूमिगत उद्भिज्जोत्पत्तीवर अवलंबून असते. ती कमी झाली कीं, त्यांची संख्या कमी होते व अधिक झाली कीं अधिक होते. मनुष्याची तशी गोष्ट

नाहीं. त्याच्या शरिराच्या व मनाच्या विशिष्ट रचनेमुळें त्याला आपल्या उपजीविकेस लागणाऱ्या वस्तु हव्या तितक्या उत्पन्न करतां येतात. यामुळें मनुष्यांची संख्या आणि त्यांस लागणारें अन्न हीं एकसारखीं वाढत आहेत.

मनुष्यांत व इतर प्राण्यांत दुसरा आणखी एक भेद आहे तो हा कीं, मनुष्याची उपभोगेच्छा इतर प्राण्यांच्या उपभोगेच्छे-सारखी मर्यादित नाहीं. इतर प्राण्यास उदरपोषण आणि सजाति-वर्धन यांशिवाय इतर सुखांची कल्पनाहि नसते, असें म्हणण्यास हरकत नाहीं. यामुळें त्यांच्या या दोन क्षुधांचें समाधान होत असलें म्हणजे ते सुखी असतात. मनुष्यांची तशी गोष्ट नाहीं. इतरांप्रमाणें या दोन क्षुधांची पीडा त्यांच्या पाठीमागें लागली असून, शिवाय त्यांस अनेक प्रकारचे मानासिक व शारीरिक उप-भोग घेतां येण्यासारखीं मनें व शरीरें प्राप्त झालीं आहेत, व या अनेकविध उपभोगांकडे त्यांची स्वाभाविक प्रवृत्ति आहे. हे अनेक उपभोग घेण्याचें त्यांचे अंगीं जें सामर्थ्य आहे त्यामुळें ते इतर प्राण्यांपेक्षां अधिक सुखी आहेत किंवा नाहींत, हा वादग्रस्त प्रश्न आहे व याचें समाधानकारक उत्तर देतां येईल असेंहि वाटत नाहीं. थोड्या वासना आणि थोडी तृप्ति व पुष्कळ वासना आणि पुष्कळ तृप्ति या दोन स्थितींपैकीं इष्टतर कोणती, याचा निर्णय करण्यास कोण समर्थ होणार आहे ? या वादांत समंजस मनु-ष्यानें कधींहि पडूं नये. मनुष्यास विचार करतां येऊं लागल्या-पासून, कांहीं पहिला व कांहीं दुसरा पक्ष घेऊन भांडत आहेत, व तदनुरोधानें निवृत्ति व प्रवृत्ति असे दोन विचार व आचार-पंथ झाले आहेत. फलमूलाशन करून राहावें, पूर्ण वैराग्याचें अव-लंबन करावें, पर्वतांच्या गुहांत वास करावा, आणि संसाराच्या

भानगडींत पडूं नये, असें निवृत्तिपंथाचे प्रचारक आज शेंकडों वर्षें सांगत असतां व बऱ्याच अंशीं वागून दाखवीत असतां, प्रवृत्तिमार्गाकडे जग अधिकाधिक जात चाललें आहे. तेव्हां सामान्य विचाराअंतीं असें दिसून येईल कीं, अनेक उपभोग भोगल्यापासून मनुष्य इतर प्राण्यांपेक्षां अधिक सुखी होवो किंवा न होवो, त्या गोष्टीचा निर्णय करण्याच्या भरीस मुळींच न पडतां, अनेक उपभोगांची वांच्छा करावी, ते प्राप्त होण्यासाठीं रात्रंदिवस झटावें, आणि त्यांपासून होईल तितकें सुख करून घ्यावें, असा मनुष्यांचा सामान्य स्वभाव आहे व याच स्वभावामुळें मनुष्यांच्या व इतर प्राण्यांच्या वर्तनांत इतकें अंतर पडलें आहे.

मनुष्यांच्या आहारवस्तु कष्टसाध्य आहेत, व त्यांची उपभोगेच्छा अमर्याद आहे, एवढ्या दोन गोष्टी स्पष्टपणें ध्यानांत आल्या म्हणजे त्यांस इतर प्राण्यांपेक्षां शेंकडोंपट अधिक उद्योग कां केला पाहिजे, हें सहज समजणार आहे. हें ज्यास पक्कें समजून येईल तो सहसा निरुद्योगी होणार नाहीं. याशिवाय निरुद्योगी लोकांस उद्योगी लोकांच्या वश होऊन किती त्रास सोसावा लागतो, हें ज्यास कळलें असेल तो तर स्वतः उद्योगी होईल इतकेंच नाहीं, तर इतरांसहि उद्योग करण्यास प्रवृत्त करील. विशेष उद्योगी मनुष्यांचें सान्निध्य नसल्यास सामान्य उद्योग करून आयुष्य घालविणें शक्य आहे. पण कोणत्याहि कारणानें उद्योगी मनुष्याशीं गांठ पडल्यास, एक तर त्याच्याप्रमाणें उद्योग करण्यास किंवा त्याच्या आधीन होऊन तो ठेवील त्या स्थितींत राहाण्यास तयार झालें पाहिजे. सध्यां आम्हां निरुद्योगी हिंदू लोकांची उद्योगी इंग्रज लोकांशीं गांठ पडली आहे. तेव्हां एकतर आम्हीं त्यांच्या सारखा उद्योग करण्यास राजी झालें पाहिजे, किंवा ते ज्या स्थितींत

ठेवतील त्या स्थितींत राहाण्यास सिद्ध असलें पाहिजे, आमचें भावी स्वातंत्र्य, अथवा आमचें निरंतर दास्य, सर्वथैव आमच्या उद्योगावर अवलंबून आहे.

मनुष्यांच्या उद्योगाचे किंवा प्रवृत्तिप्रणीत मानसिक व शारीरिक चलनावस्थेचे दोन भेद आहेत. एक नियामक व दुसरा उत्पादक. नियामक उद्योग म्हणजे ज्या उद्योगामुळें मनुष्यांस आपल्या समाजांत व्यवस्था ठेवतां येते. राजे, मंत्री, लष्करी शिपाई, न्यायाधीश, पोलीस, सामान्य नीतिशिक्षक वगैरे लोकांचा उद्योग पहिल्या प्रकारचा आहे; हे समाज–यंत्राचे फक्त चालक किंवा व्यवस्थापक आहेत. शेतकरी, कोष्टी, सुतार, गवंडी वगैरे सर्व प्रकारचे कारागीर व धंदेवाले लोक दुसऱ्या वर्गांत येतात, म्हणजे त्यांचा उद्योग उत्पादक आहे. सुधारलेल्या राष्ट्रांतील कांहीं लोक पहिल्या प्रकारचा, कांहीं दुसऱ्या प्रकारचा व कांहीं दोन्ही प्रकारचे उद्योग करीत असतात. देशाच्या विशिष्ट स्थितीप्रमाणें या निरनिराळ्या वर्गांतील लोकांचें प्रमाण कमी अधिक होत असतें. केवळ नियामक उद्योग करणारांची संख्या अगदीं स्वल्प असून, थोडासा नियामक व पुष्कळ उत्पादक उद्योग करणारांची मोठी संख्या ज्या देशांत असते, तो विशेष सुखी असतो. अमेरिकेंत सध्यां अशी स्थिति आहे; त्यामुळें तेथील लोक इतर देशांतील लोकांपेक्षां प्रत्येक बाबतींत फार पुढें सरसावले आहेत. अमेरिकन लोकांस उत्पादक उद्योग करण्याचें जणूं काय वेड लागून गेलें आहे व त्यामुळें संयुक्त संस्थानें इंद्रलोकतुल्य होऊन गेलीं आहेत. या संस्थानांच्या खालोखाल इंग्लंड व फ्रान्स हे देश आहेत. सगळ्याच देशांतील लोकांस सारखा उद्योग करण्याची स्वाभाविक व कृत्रिम साधनें असतील व साऱ्यांस सारखें

वैभव प्राप्त करून घेतां येईल, असें आमचें म्हणणें नाहीं. तथापि एक गोष्ट आम्हांस पक्की ठाऊक आहे कीं, कोणत्याहि देशांतील लोकांस प्राप्त होण्यासारखें जें सुख असेल, तें त्यांना वर सांगितलेल्या पद्धतीनें उद्योग केल्याशिवाय कधींहि प्राप्त होणार नाहीं. ज्या लोकांस उत्पादक उद्योगाचा कंटाळा व कांहीं हौस असली तर नियामक उद्योगाची—असे लोक मोठेपणास कधींहि चढणार नाहींत. पण सध्यां तर आमची तशी स्थिति होऊन गेली आहे. ज्याला त्याला अंमलदार व्हावयाला पाहिजे. सगळ्यांचींच अंमलदार होऊन चैन करण्याची इच्छा धरल्यावर चैनीचे पदार्थ तरी उत्पन्न करणार कोण ? उत्पादक उद्योग करण्याची हौस सार्वत्रिक होऊन संपत्ति व व्यापार वाढल्याशिवाय सर्वांस चैन तरी कोठून करतां येणार ? अंमलदार मुळींच नकोत, असें आमचें म्हणणें नाहीं. पण शेरभर मसाला आणि मूठभर तांदूळ अशी स्थिति काय कामाची ! १७८९ सालीं फ्रान्स देशांत जी मोठी राज्यक्रांति झाली, तिच्या अनेक कारणांपैकीं फाजील अंमलदार हें एक मुख्य कारण होतें. जिकडे तिकडे अंमलदारांचा सुळसुळाट होऊन गेल्यामुळें देशांतील वार्षिक संपत्तीचें उत्पन्न अगदीं संपुष्टांत आलें होतें; इतकेंच नाहीं, तर जे थोडे उत्पादक लोक काबाडकष्ट करून थोडी बहुत संपत्ति उत्पन्न करीत, त्यांवर पराकाष्ठेचा जुलूम होऊं लागला होता. अंमलदार वाजवीपेक्षां अधिक झाल्यानें उत्पादक रयतेचें दोन प्रकारांनीं नुकसान होतें; एक, त्यांच्या पगारासाठीं तिला आपल्या प्राप्तीचा बराच वांटा द्यावा लागतो. दुसरें त्यांच्या जुलमामुळें केलेलें उत्पन्न आपल्या हातीं लागेल किंवा नाहीं, अशाविषयीं तिला संशय येऊं लागतो. या दोन कारणांमुळें उत्पन्न करण्याची इच्छा मंदावते, आणि तसें झालें म्हणजे सर्वांचेंच

नुकसान होतें. हाच परिणाम सरकारी अंमलदारांशिवाय इतर प्रकारचे अनुत्पादक लोक वाढल्यानेंहि होतो. फाजील धर्माधिकारी फाजील नीतिप्रसारक, फाजील शिक्षक, फाजील अडते, फाजील लेखक (पत्रकर्ते, पुस्तककर्ते वगैरे), फाजील वकील, फाजील राजकारस्थानी, या सर्वांच्या फाजीलपणांत, म्हणजे त्यांची वाजवी पेक्षां जास्त संख्या होण्यांत, कष्टाळू रयतेचा फार तोटा आहे. अशा प्रकारचे लोक मुळींच नसावेंत, असें आमचें म्हणणें नाहीं. तसें झाल्यास समाज मुळींच सुरळीत चालावयाचा नाहीं. पण त्यांचें कमीपण त्याला जितकें विघातक आहे, तितकें त्यांचें अधिक पणहि विघातक आहे. आमच्या इकडील अलीकडल्या सुशिक्षित लोकांनीं सरकारी नोकरीवर सगळा जीव ठेविल्यामुळें आपली किंमत किती कमी करून घेतली आहे बरें ? हाडांचीं काडें करून व शेंकडों रुपये खर्च करून बी. ए. पर्यंत अभ्यास करावा आणि पुढें फळ काय ? तर रेव्हिन्यू खात्यांत किंवा शाळा-खात्यांत ३०।३५ रुपये दरमहाची नोकरी ! चांगला सुतार सुद्धां तुमच्या शाळेचा उंबरठा न चढतां २५।३० रुपये सहज मिळवितो, हें या ग्राजुएटांस समजूं नये काय ? तसेंच कोठें १०।१२ रुपयांची जागा रिकामी झाली कीं, तीबद्दल शेंपन्नास मॅट्रिक्युलेशन पास झालेल्या उमेदवारांचे अर्ज ! कष्टानें संपादिलेल्या विद्येचा असा सवंग विक्रय करावयाचा काय ? विद्यार्जनानें विकसित झालेली मनें स्वतंत्र धंदे स्थापण्याकडे लावाल, तर तुम्हांस अन्नाची किंवा मानाची काय वाण पडणार आहे ? पण खांदा देऊन काम करण्याची व दुसऱ्याचे गुलाम न होतां स्वतःच्या करामतीवर चरितार्थ संपादण्याची धमक आतां कोठें राहिली आहे ?

—गो. ग. आगरकर

**प्रश्नः**—व्यापार या शब्दाचा कोणता सार्वत्रिक अर्थ लेखकानें केला आहे ? मनुष्याची सुखाची कल्पना सामान्य पशुपक्ष्यांच्या सुखाच्या कल्पनेहून कशी निराळी असते ? नियामक व उत्पादक उद्योग म्हणजे काय ? आमच्या इकडील सुशिक्षित वर्गानें कोणते उद्योग हातीं घ्यावेत, असे लेखकानें सूचित केलें आहे ?

**अभ्यासः**—( अ ) खालील वाक्यांचा अर्थ स्पष्ट करा.

( १ ) मनुष्याच्या आहारवस्तु कष्टसाध्य आहेत व त्यांची उपभोगेच्छा अमर्याद आहे.

( २ ) शेरभर मसाला आणि मूठभर तांदूळ अशी स्थिति काय कामाची ?

( ब ) 'तागडी', 'तलवार' आणि 'लेखणी' यांच्यांत चाललेल्या आपापल्या श्रेष्ठतेसंबंधींचा एक मनोरंजक काल्पनिक संवाद लिहा.

**पुरवणीवाचनः**—कै. आगरकर यांच्या निबंधांचीं पुस्तकें वाचा.

---

## ४५. अन्योक्ति-सुभाषितें.

**ओळखः**—प्राचीन मराठी वाङ्मयांत जे श्रेष्ठ प्रकारचे पण्डितकवि होऊन गेले, त्यांतच वामनपण्डित यांची गणना होते. हे रामदासांच्या समकालीन कवि होत. संस्कृत भाषेंतील त्यांचें प्रावीण्य विशेषच होतें, म्हणून त्यांनीं जी मराठींत काव्यरचना केली, तिच्यावर 'संस्कृता'ची छाप पडलेली आहे. त्यांनीं 'यथार्थ दीपिका' नांवाची भगवद्‌गीतेवर मराठी टीका लिहिली. याखेरीज 'वेणुसुधा' या नांवाचा त्यांचा श्लोकबद्ध ग्रंथ व भर्तृहरीच्या शतकांचे त्यांनीं केलेले मराठींतील भाषांतरित श्लोक सुप्रसिद्ध आहेत. त्यांची काव्यरचना पांडित्यपूर्ण असते. शब्दालंकार तींत विपुल आढळतात.

'सुश्लोक वामनाचा' असा त्यांचा जो लौकिक आहे, तो यथार्थच वाटतो. शके १५९५ त ते कालवश झाले.

**विषय**—खालील श्लोक भर्तृहरीच्या नीतिशतकाचें त्यांनीं जें मराठींत भाषांतर केलें, त्यांतून घेतले आहेत. वामनपंडितांचे वर सांगितलेले काव्य-गुण त्यांत प्रकट झाले आहेत. मूळ काव्यार्शी भाषांतरकार किती समरस झाले आहेत, याची प्रचीति खालील श्लोक वाचून तुम्हांस येईल.

**अन्योक्ति आणि सुभाषितें** यांचा भरणा संस्कृतभाषेंत विपुल आहे. मराठींत ते प्रकार वामनपण्डित, मोरोपंत, इत्यादि प्राचीन कवींनीं आणि अव्वल इंग्रजींत होऊन गेलेल्या कै. कृष्णशास्त्री चिपळूणकर, कै. गणेश-शास्त्री लेले, कै. लेंभे, कै. लोंढे इत्यादि कवींनीं अनेक सुरस श्लोकरच-नेच्या द्वारें रूढ केले. अन्योक्ति हा प्रकार, एखाद्या व्यक्तीवर अगर प्रश्नावर केलेल्या प्रच्छन्न टीकेच्या पोटीं निर्माण होतो. 'सुभाषित' हें मोजक्या पण अर्थपूर्ण शब्दांत, एकच विचार, वैचित्र्यपूर्ण पद्धतीनें प्रदर्शित करण्याचें एक साधनच होय. अर्थात भावनेपेक्षां बुद्धीचाच चमत्कारिक विलास वरील प्रकारांतून आढळतो. खालील श्लोकांत जें वारस्य आहे, तें याच दृष्टीनें पाहा.

**नम्रपणेंच सभेंत महोन्नत, जे गुण वर्णुनियां परक्याचे ।**
**सांगितल्याविण दाविति कौशल सर्व जनांप्रति जे स्वगुणांचें ।**
**स्वार्थ परार्थहि साधिति जिंकिति शांति–बळें मुखरत्व खलांचें ।**
**संत महाद्भुत–भाजन यापरि सेवन कोण करी न तयांचें ॥ १ ॥**

**ज्यांचीं देहमनें तशींच वचनें पुण्यामृतें ओतिलीं ।**
**कीं ज्यांहीं स्वकृतोपकार–विभवें सर्वत्र विस्तारिलीं ।**
**लोकांचे परमाणुतुल्य गुण जे मेरूपरी वानिती ।**
**चित्तीं तोषहि पावती सुजन ते नेणों किती नांदती ॥ २ ॥**

भाग्याला सुजनत्व भूषण असे, कीं मौन शौर्यास तें, ।
ज्ञानाला शम, त्या शमास विनय, द्रव्यास दातृत्व तें, ।
अक्रोधत्व तपा, क्षमा प्रभुपणा, धर्मास निर्दंभता; ।
या सर्वांसहि मुख्य भूषण पहा सच्छील हें तत्त्वतां ॥ ३ ॥

दे दान गुप्त, उपकार करी, न बोले ।
मानी प्रमोद जरि मान्य घरास आले ।
दावी न गर्व विभवें, गुण घे परांचे ।
खड्गाग्रतुल्य विषमव्रत हें भल्यांचें ॥ ४ ॥

पद्में प्रफुल्ल करितो सविता स्वयें हा; ।
रात्रीं विकास कुमुदाप्रति चंद्र दे हा; ।
न प्रार्थिता जलद दे जल या जनांला ।
मुक्तार्थ कीं परहितोत्सव सज्जनाला ॥ ५ ॥

राहो जाति रसातलीं, सुगुण हे राहोत कीं खालते ।
शैलाग्राहुनि शील सत्वर पडो, सौजन्य अग्नींत तें ।
शूरत्वावरि आदळो अशनि, का, हें सर्वही नावडे ।
अर्थप्राप्ति असो निरंतर मला, त्यावीण हें बापुडें ॥ ६ ॥

झाला क्षीण बहू क्षुधेस्तव जरी कीं व्यापिला वार्धकें, ।
आली कष्टदशा घडो मरणही कीं तेज गेलें निकें ।
ऐसाही मृगराज जीर्ण तृण तो खाईल कीं काय हा ।
शौर्यें भेदुनि हस्तिमस्तक शुभग्रासींच ज्याला स्पृहा ॥ ७ ॥

तोयाचें परि नांवही न उरतें संतप्त लोहावरी ।
तें भासे नलिनीदलावरि पहा सन्मौक्तिकाचे परी, ।
तें स्वातीस्तव अब्धि-शुक्ति-पुटकीं मोतीं घडे नेटकें; ।
जाणा उत्तम-मध्यमाधम दशा संसर्गयोगें टिके ॥ ८ ॥

प्रश्नः—सज्जनांचा गौरव करितांना, कवींनीं त्यांना कोणतीं विशेषणें लाविलीं आहेत? मृगराजाला उद्देशून कवींनीं जो श्लोक रचिला त्याचा गर्भित हेतु काय? अर्थप्राप्तीपुढें कोणत्या गोष्टी फोल होतात? तोयाचें उदाहरण कोणती गोष्ट सिद्ध करण्यासाठीं कवीनें घेतलें आहे?

अभ्यासः—(अ) दीपक, अर्थांतरन्यास, रूपक, उत्प्रेक्षा या अलंकारांचीं लक्षणें सांगून त्यांची या कवितेंतील उदाहरणें दाखवा.

(ब) 'खड्गाग्रतुल्य विषमव्रत हें भल्यांचें' या चरणाला जुळेल अशी समस्यापूर्ति करा.

पुरवणीवाचनः—भर्तृहरीच्या नीतिशतकाचें वामनपंडितांनीं केलेलें समवृत्त भाषांतर आणि कै० कृष्णशास्त्री चिपळूणकर, यांचें 'पद्यमाला' हीं पुस्तकें वाचा.

---

## ४६. युगप्रवर्तक कोल्हटकर.

ओळख—श्री. गजानन त्र्यंबक माडखोलकर (जन्म इ. स. १९००) हे नागपूर येथें प्रसिद्ध होत असलेल्या, 'महाराष्ट्र' पत्राचे सहसंपादक आहेत. त्यांचें शालेय शिक्षण मुंबईस झालें. त्यांचा लेखनव्यवसाय लहानपणापासूनच सुरू आहे. 'आधुनिक कविपंचक' या अगदीं पहिल्याच पुस्तकानें त्यांचें नांव प्रमुख रसिक टीकाकारांमध्यें मोडूं लागलें. त्यानंतर त्यांनीं विविधज्ञान विस्तारांत कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्यावरील लेखमाला प्रसिद्ध केली

'विलापिका' नांवाचा एक टीकालेखसंग्रह त्याच सुमारास त्यांनीं प्रसिद्ध केला. गेल्या पांच सात वर्षांत त्यांनीं 'मुक्तात्मा', 'भंगलेलें देऊळ' यांसारख्या कादंबऱ्या, व अनेक चटकदार लघुकथा लिहून मराठी वाङ्मयांत मोलाची भर टाकिली आहे. 'वाङ्मयविलास' आणि 'स्वैरविचार' हे त्यांचे दोन निबंधसंग्रहहि प्रसिद्ध आहेत. त्यांचें अवलोकन सूक्ष्म आणि विवेचन आकर्षक असतें. एखाद्या प्रश्नाची सर्वांगीण बाजू, वाचकाला आपल्या विश्वासांत घेऊन, पुढें मांडण्याची टीकापद्धति त्यांना विशेष हस्तगत आहे. त्यांची भाषाशैली भावरम्य, सुश्लिष्ट आणि सूचक वाटते.

विषय:—कै. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर (सन १८७१–१९३४) ह्यांनीं नाट्य, टीका, आणि विनोद ह्यांवर वाङ्मय निर्माण करून, मराठींतील युगप्रवर्तक लेखकांत स्थान मिळविलें, हा एक मुद्दा सोबतच्या टीकालेखांत आला आहे. त्यांच्या वाङ्मयांतील गुणदोषांचेंहि विवेचन किती तर्कशुद्ध पद्धतीनें लेखकांनीं केलें आहे तें वाचा, म्हणजे कै. कोल्हटकरांच्या वाङ्मयसंसाराची तुम्हांस तोंडओळख होईल.

इतिहासांत काय किंवा वाङ्मयांत काय, यश हें कांहीं केवळ पराक्रमानेंच मिळत नसतें. इतिहासामध्यें आपण अनेक राजांच्या शौर्याचीं वर्णनें वाचतों, पण त्यांपैकीं किती जणांचीं नांवें नव्या युगाच्या ललकारणीशीं संलग्न झालेलीं सांपडतात ? नदीला तीर्थाची योग्यता मिळावयाला तिच्या जलौघाचा नुसता विस्तार जसा उपयोगी पडत नाहीं, तसाच मनुष्याला युगप्रवर्तकांची पदवी प्राप्त व्हावयाला नुसता पराक्रम पुरेसा होत नाहीं. त्या पराक्रमांत जर स्फूर्ति देण्याचें, म्हणजे आपण सुरू केलेल्या कार्याची परंपरा अव्याहत पुढें चालू ठेवण्याचें सामर्थ्य असेल, तरच तो पराक्रम समाजांत काय किंवा साहित्यांत काय, मन्वंतर घडवून आणूं

शकतो. वीरपुरुषांच्या जीवनांत हें सामर्थ्य उदात्त कृतींनीं व वाङ्मयसेवकांच्या लेखनांत उदात्त कल्पनांनीं उत्पन्न होत असतें, कल्पकता, ध्येयवाद आणि विद्वत्ता यांचा त्रिवेणीसंगम ज्या ग्रंथकारांच्या वाङ्मयांत झालेला असतो, त्यांचेच ग्रंथ भावी पिढ्यांना स्फूर्ति देऊं शकतात; व त्यामुळें त्यांच्या नांवाची द्वाही साहित्याच्या क्षेत्रांत सदैव दुमदुमत राहाते.

कै. चिपळूणकर यांच्या हातून निबंधांव्यतिरिक्त दुसरें कोणतेंच वाङ्मय उत्पन्न झालें नाहीं, ही गोष्ट खरी; पण, त्यांच्या त्या एकाच लेखनप्रकारांत कल्पकता, ध्येयवाद आणि विद्वत्ता, हीं तिन्हीहि इतक्या ओजस्वितेनें प्रकट झालीं होतीं कीं, त्यांच्या निबंधमालेनें महाराष्ट्राच्या आधुनिक इतिहासांतील नव्या मनूला जन्म दिला; व त्यांच्या नंतरच्या पिढींतून जे लेखक उदयाला आले, त्यांपैकीं बहुतेकांच्या स्फूर्तीची ज्योत त्यांच्या प्रतिभेनें प्रवर्तित केलेली होती, ही गोष्ट प्रसिद्धच आहे. त्यांच्यापासून मातृभाषेच्या सेवेची दीक्षा घेतलेल्या या लेखकांत, कै. ह. ना. आपटे, कै. शि. म. परांजपे, कै. वि. का. राजवाडे, कै. श्री. कृ कोल्हटकर व श्री. न. चिं. केळकर यांची गणना प्रामुख्यानें होते. या ग्रंथकारांपैकीं कै. राजवाडे यांचें आयुष्य इतिहाससंशोधनाच्या एकमात्र व्यवसायांत गेलें. आपटे, परांजपे व केळकर यांनीं लेखनाचे जवळ जवळ सर्वच प्रकार मनसोक्त हाताळलेले आहेत. वाङ्मयाचा प्रायः असा एकहि प्रदेश आढळणार नाहीं कीं, ज्यांत त्यांच्या हौशी प्रतिभेची हळुवार पदचिन्हें उमटलेलीं नसतील. पण त्यांची प्रतिभा सर्वगामी असली, तरी त्यांना मिळालेली कीर्ति मात्र सर्वव्यापी नाहीं. कै. आपटे हे सुधारणावादी कादंबरीकार म्हणून आणि कै. परांजपे हे वक्रोक्तिकुशल वृत्तपत्रकार म्हणून

आज मुख्यतः ओळखले जातात व श्री. केळकर यांची साहित्याच्या निरनिराळ्या विभागांतील कामगिरी जरी त्यांच्या मानानें जास्त भरीव असली, तरी तेहि मानवी जीवनाचे टीकाकार या नात्यानेंच बहुधा लोकांच्या पुढें स्मरणांत राहातील.

पण कै. कोल्हटकर यांची गोष्ट तशी नाहीं. नाट्य, विनोद आणि टीका या वाङ्मयाच्या तीन क्षेत्रांवर त्यांच्या कामरूपिणी प्रतिभेनें गाजविलेलें प्रभुत्व केवळ लोकोत्तर आहे. आपटे आणि परांजपे यांनीं नाटकें बरींच लिहिलेलीं असलीं, तरी त्यापैकीं बहुतेक रूपांतरित असून, शिवाय त्यांना रंगभूमिहि फारशी कधीं लाभली नाहीं; व श्री. केळकर यांच्या नाटकांना त्या मानानें रंगदेवतेचा कृपाप्रसाद जरी अधिक मिळाला असला, तरी त्यांनीं रंगभूमीवर वर्चस्व गाजविलें आहे, असें म्हणतां येणार नाहीं. उलट कै० कोल्हटकर यांनीं रंगभूमीवर एक तप अबाधित सार्वभौम सत्ता गाजविली, आणि त्या अवधींत तिचें स्वरूप इतकें बदलून टाकिलें कीं, श्री. खाडिलकर यांच्यासारख्या स्वतंत्र बुद्धीच्या समकालीन नाटककारालाहि रंगभूमीच्या संगीत विभागाचें आक्रमण करण्यासाठीं, त्यांचें थोडेंबहुत अनुकरण करण्याशिवाय गत्यंतर उरलें नाहीं.

आज क्वचित् असे उद्गार ऐकूं येतात कीं, कोल्हटकरांचीं नाटकें रंगभूमीवरून आधींच अस्त पावलेलीं असून कालांतरानें लोकांच्या स्मृतींतूनहि तीं लुप्त होऊन जातील! पण हें भाकित यदाकदाचित् खरें ठरलें, तरी त्यांत त्या नाटकांना कमीपणा येण्यासारखें काय आहे? सर्व मानवजातीचा कवि म्हणून नांवाजलेल्या शेक्सपिअरच्या नाटकांची स्मृति जिवंत ठेवण्याकरितां जॉन्सन्-सारख्या पंडितांपासून तों आयर्व्हिंगसारख्या नटांपर्यंत अनेक

थोर व्यक्तींचे भगीरथ प्रयत्न आजपर्यंत खर्ची पडलेले नाहींत काय ? शिवाय, कोल्हटकरांच्या नाटकांचें स्मरण जरी कदाचित् लोपून गेलें, तरी त्यामुळें त्या नाटकांनीं रंगभूमीवर घडवून आणलेल्या परिवर्तनाचें महत्त्व कसें कमी होतें ? नेपोलियनचें राज्यपद गेलें, आणि त्याचा वंशहि बुडाला, पण त्यानें इतिहासांत केलेल्या क्रांतीचें स्मरण आजहि लोकांत तीव्रतेनें जागृत नाहीं काय ? पाश्चात्य धर्तीचीं विनोदसुंदर, हेतुप्रधान नाटकें लिहून कोल्हटकरांनीं मराठी रंगभूमीला लावलेलें नवीन वळण इतिहासांत संस्मरणीय होऊन बसेल.

कोल्हटकरांच्या नाट्यक्षेत्रांतील कामगिरीपेक्षांहि त्यांची विनोदाच्या क्षेत्रांतील कामगिरी अधिक महत्त्वाची ठरेल. त्यांचे ' सुदाम्याचे पोहे ' प्रसिद्ध होण्यापूर्वी स्वतंत्र असें विनोदी वाङ्मय मराठींत मुळींच निर्माण झालेलें नव्हतें. कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर, कै. गोपाळराव आगरकर किंवा कै. शि. म. परांजपे यांच्या निबंधांतून विनोदाच्या छटा पुष्कळच आढळतात. किंबहुना, कै. चिपळूणकर यांच्या निबंधमालेंतील सुधारकांवरील उपहासात्मक टीका वाचूनच आपली विनोदबुद्धि जागृत झाली असें कोल्हटकर नेहमीं सांगत असत. पण दैत्यगुरूपासून संजीवनी विद्या शिकून तिच्या जोरावर दैत्यांना हतबल करणाऱ्या कचाप्रमाणें, कोल्हटकरांनीं पुराणमतवाद्यांचे अध्वर्यु मानल्या-गेलेल्या चिपळूणकरांपासून विनोदाची स्फूर्ति घेऊन त्याचा उपयोग जुन्या रूढीच्या निर्मूलनार्थ केला. कै० चिपळूणकर किंवा कै० आगरकर यांच्या लेखांतून मधून मधून विनोदाच्या छटा असल्या, तरी त्या त्यांच्या वाङ्मयाच्या एकंदर गंभीर स्वरूपाला गालबोटाप्रमाणें शोभा देतात एवढेंच. परंतु धोतराच्या

कांठांत जरीची किनार असली, म्हणून कांहीं त्याला कोणी पीतांबर म्हणत नाहीं; तसेंच त्यांच्या विनोदाचेंहि आहे. परांजपे यांचे 'काळां'तील लेखमात्र विनोदाच्या दृष्टीनें स्वतंत्र आणि श्रेष्ठ दर्जाचे आहेत. परंतु त्यांच्या विनोदांत विविधता नाहीं, हें एक व दुसरें असें कीं, त्यांच्या विनोदाचा जन्म हा विद्वेषाच्या पोटीं झालेला असल्यामुळें तो मनाला आल्हाद न देतां उलट उद्विग्न किंवा संतप्त मात्र करितो. त्यांचा उपरोधिक विनोद हा सूडाच्या इच्छेनें तळमळत असलेल्या माणसाच्या अंधारांतील आत्मगत विकट हास्यासारखा वाटतो. उलट, कोल्हटकरांचा विनोद म्हणजे प्रसन्न मनाचें निर्भर हास्य ! त्या हास्यांत क्वचित् उपरोधाचा, तुच्छतेचा किंवा विडंबनाचाहि ध्वनि उमटलेला असला, तरी त्यामुळें मन फार काळ पिचत राहावयाचें नाहीं. 'साहित्यबत्तिशी'तल्या 'निर्जळी एकादशी' या लेखांतील उपोषणाच्या दिवशीं आकंठ फराळ झोडण्याच्या वृत्तीचें केलेलें उपरोधिक वर्णन वाचून भाविकाच्याहि हंसून मुरकुंड्या वळल्याचें मीं पाहिलें आहे. शिवाय त्यांचा विनोद जितका विशुद्ध तितकाच विविधहि आहे. परांजपे यांची विनोदबुद्धि मानहानीच्या दुःखानें डिवचून काय फुसफुसत उठेल तेवढीच. उलट, अस्पृश्यतेच्या अमानुष रूढीपासून तों गवयांच्या आचरट संवईपर्यंत मानवी जीवनांतील हरएक वैगुण्यांत आणि विसंगतींत मन घालून, कोल्हटकरांच्या सूक्ष्मदर्शी प्रतिभेनें त्यांची हास्यास्पदता चवाठ्यावर आणली; व रंगभूमीपासून तों वृत्तपत्रांपर्यंत सार्वजनिक विचारविनिमयांचीं सारीं केंद्रें विनोदाच्या संचाराला खुलीं करून देऊन, लोकशिक्षकाचें अत्यंत प्रभावी साधन निर्माण केलें.

विनोदी वाङ्मयाच्या प्रवर्तनाचा अग्रमान जो कोल्हटकरांना दिला जातो, तो त्यांच्या त्या क्षेत्रांतील कर्तबगारीचें हें अनन्य महत्त्व लक्षांत घेऊनच.

साहित्याच्या ज्या विभागावर कोल्हटकरांनीं अधिराज्य गाजविलें, त्यांपैकीं तिसरा विभाग टीका हा होय. मराठींत वृत्तपत्रांबरोबरच टीकेचाहि जन्म झाला. कारण वर्तमानपत्रें हीं बव्हंशीं टीकेवरच जगत असतात. मग ती टीका मतांवरील असो, व्यक्तींवरील असो, वा ग्रंथांवरील असो; पण वर्तमानपत्रांतील टीका ही स्वभावतःच अगदीं उथळ असते. पक्ष्यानें ज्याप्रमाणें उडतां उडतां वाटेंत दिसलेल्या जलाशयाचें पाणी पंखानें स्पर्श करून चाळवावें, त्याप्रमाणें वृत्तपत्रें हीं आपल्या रोजच्या धांवपळींत रस्त्यांत गांठणाऱ्या ग्रंथाला कोपरखळी देऊन पुढें सटकतात. नियतकालिकांतलि टीका ही त्यापेक्षां अधिक भारदस्त आणि भरीवहि असते. किंबहुना गेल्या पाऊणशें वर्षांत मराठी टीकात्मक वाङ्मयाची जी काय थोडीबहुत प्रगति झाली असेल, तिचें श्रेय ग्रंथकारांचा अगत्यपूर्वक परामर्ष घेणाऱ्या नियतकालिकांनाच खरोखरी दिलें पाहिजे. परंतु टीकालेखनाला सुरवात आरंभीं वर्तमानपत्रांतून झाल्यामुळें, वृत्तपत्रांप्रमाणेंच टीकेचेंहि दोषाविष्करण हें वैशिष्ट्य किंबहुना उद्दिष्ट होऊन बसलें; व टीका हा टवाळीचा केवळ एक संभावित प्रकार गणण्यांत येऊं लागला. नियतकालिकांतल्या टीका या त्यांतल्या त्यांत अधिक संभावित असत; म्हणजे असें कीं, दोषांची मनसोक्त कुचाळी केल्यानंतर, ग्रंथांतील एखाद्या दुसऱ्या गुणाकडे जातां जातां बोट दाखवून नियतकालिकांतील टीकाकार आपल्या निःपक्षपातीपणाचें प्रदर्शन करीत. 'विविधज्ञानविस्तारा'चे गेल्या साठ वर्षांचे अंक जर कोणीं जिज्ञासेनें

चाळून पाहिले, तर कै० विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्यापासून तों कै० रा. ग. गडकरी यांच्यापर्यंत आज श्रेष्ठ समजल्या जात असलेल्या बहुतेक साऱ्या ग्रंथकारांपुढें टीकाकारांनीं मिरच्यांची धुरी घातली असल्याचें दृष्टीस पडेल. या प्रवृत्तीमुळें केवळ गुण-दोषांची चिकित्सा असेंच मराठींत टीकेला स्वरूप आलें. टीकाकार फारच सहृदय असेल, तर तो दोषांपेक्षां गुणांवर थोडा अधिक भर देईल एवढेंच. या टीकापद्धतीचे उत्कृष्ट प्रतिनिधी म्हणून कै० बाळकृष्ण अनंत भिडे यांचा निर्देश करतां येईल. त्यांचे टीकालेख निव्वळ गुणदोषदिग्दर्शक खरेच, पण अत्यंत मार्मिक आहेत. कै० कोल्हटकर यांची टीकापद्धति या टीकाप्रकारांपासून अगदीं भिन्न आणि व्यापक आहे. समोर असलेल्या ग्रंथांतील फक्त गुणदोषांची चर्चा करण्यांतच इतिकर्तव्यता न मानतां, त्यांतील प्रतिपाद्य तत्त्वांची चिकित्सा आणि त्यांच्या घटकांचें पृथक्करण करणारा सूक्ष्मदर्शी तत्त्वज्ञ टीकाकार जर महाराष्ट्रांत कोणी झाला असेल, तर ते कोल्हटकर हेच होत. म्हणूनच ‘ हिंदुधर्म आणि सुधारणा,’ ‘ गायकवाड सरकारची ग्रंथमाला ’, ‘ मराठी भाषेचे संप्रदाय व म्हणी ’ ‘ तोतयाचें बंड ’, ‘ रागिणी व तिचीं भाचंडें ’, ‘ नक्षत्रविज्ञान ’, ‘ ग्रहगणित ’ वगैरे त्यांच्या टीकालेखांचा सर रामकृष्ण भांडारकर, प्रो. राजारामशास्त्री भागवत, व्यंकटेश बापूजी केतकर किंवा सर सयाजीराव गायकवाड यांच्या-सारख्या मेधावींनीं स्वयंस्फूर्तीनें गौरव केला. या टीकालेखांतून त्या त्या ग्रंथांतील प्रतिपाद्य विषयांचें कोल्हटकरांनीं केलेलें विश्लेषण जितकें मूलगामी आहे, तितकेंच त्या ग्रंथांच्या गुणदोषांचें त्यांनीं केलेलें विवेचन मार्मिक आहे; व आपल्या या टीका-लेखांतून ललित वाङ्मयाच्या निर्मितीविषयीं त्यांनीं प्रतिपादिलेल्या

अभिनव उपपत्तीचा विचार साहित्यकोविदांना आदरपूर्वक करावा लागेल. १८९३ पासून १९१८ पर्यंत सतत दोन तपें मराठींतील निबंधक ग्रंथांचें परीक्षण करून कोल्हटकरांनीं केलेली मराठी वाङ्मयाची सेवा गुण आणि विस्तार या दोहोंच्याहि दृष्टीनें केवळ निरुपम आहे.

कोल्हटकरांना ज्या अनेक कारणांमुळें युगप्रवर्तक ग्रंथकार म्हणावयाचें, त्यांपैकीं एक कारण त्यांचा निःसीम सुधारणावाद हें होय. त्यांच्या वाङ्मयाकडे केवळ कलाविलासाच्या दृष्टीनें पाहून चालणार नाहीं. ते जितके कलानिष्ठ तितकेच सुधारणावादीहि आहेत. किंबहुना मानवी बुद्धीला दास्यमुक्त करणाऱ्या ध्येयाचा पुरस्कार करण्यांतच कलाविलासाची परिणति आहे, अशी त्यांची श्रद्धा होती; व काव्यरचनेपासून तों पंचांगशोधनापर्यंत जे निरनिराळया प्रकारचे उद्योग गेल्या चाळीस वर्षांत त्यांच्या हातून घडले, त्या सर्वांच्या मुळाशीं ही समाजसुधारणेची बुद्धि होती, हें स्पष्ट दिसून येतें. त्यांच्या समकालीन लेखकवर्गांत समाजाच्या उन्नतीच्या दृष्टीनें ललितवाङ्मय निर्माण करणारे ग्रंथकार कै. ह. ना. आपटे आणि श्री. कृ. प्र. खाडिलकर हे दोघेच झालेले आढळतात. पण त्यांच्यापैकी कै. आपटे हेच खरोखरी सुधारणावादित्वाच्या बाबतींत कोल्हटकरांशीं तुल्यगुण म्हणतां येतील. कै. आपटे हे सामाजिक सुधारणेचे कट्टे पुरस्कर्ते असले, तथापि त्यांची दृष्टि पांढरपेशा वर्गापलीकडे सहसा गेली नाहीं; किंबहुना त्यांच्या कादंबऱ्यांचा सर्व भर स्त्रीदास्यविमोचनावर आहे, असेंहि म्हटलें तरी शोभेल. कोल्हटकरांचा सुधारणावाद हा असा एकांगी नाहीं. समाजाच्या आघाडीला उभ्या असलेल्या वर्णगुरु ब्राह्मणापासून तों त्याच्या तळाशीं कुजत पडलेल्या पददलित अंत्यजापर्यंत सर्वांच्या

उन्नतीची कळकळ मनांत बाळगून, एकंदर समाजाच्या पुनर्घटनेला पोषक होईल, असें ललितवाङ्मय त्यांनीं उत्पन्न केलें. सुधारणा-सर्वांगीण सुधारणा—हें त्यांचें ध्येय होतें. म्हणूनच अस्पृश्यता आणि निरक्षरता यांच्या दुष्परिणामांचें हृदयस्पर्शी शब्दचित्र रेखाटणारी 'श्यामसुंदर' सारखी हरिजनांच्या प्रश्नावरील 'पहिलीच मराठी कादंबरी' त्यांच्या लेखणींतून उतरली. पण कोल्हटकर हे सुधारणा-वादी असले तरी सुधारणेच्या प्रसाराला अवश्य असलेला आवेश त्यांच्या वाणींत नव्हता, असे उद्गार क्वचित् ऐकूं येतात. पण हें खरें नाहीं. 'सुदाम्याच्या पोह्यां'तल्या 'गणपति', 'श्रावणी', 'शिमगा' वगैरे आरंभींच्या लेखांतील उपरोध इतका मर्मच्छेदक होता कीं, त्यामुळें खवळून गेलेल्या त्यांच्या वाचकवर्गाला शांत करण्यासाठीं कोल्हटकरांचे रसिक स्नेही कै० रावसाहेब मोरमकर यांना 'विस्तारांत' ती लेखमाला छापणें कांहीं काळ बंद करावें लागलें; व त्या लेखावर 'इंदुप्रकाशा' सारख्या सुधारणाप्रिय वर्तमान-पत्रांतून झालेल्या टीकेचा भडिमार पाहून आपल्या विदारक लेखणीची धार थोडी सौम्य करण्याबद्दल श्री. न. चिं. केळकर यांनींहि कोल्हटकरांना आग्रहाचा इषारा दिला. त्या दृष्टीनें श्री. केळकर यांनीं त्यांच्या विनोदाला दिलेली तरवारीची उपमा अगदीं समर्पक असून, 'हंसणारे सिंह' या शब्दांनीं केलेलें त्यांच्या विनोदशक्तीचें वर्णनहि अगदीं यथार्थ वाटतें. अज्ञान आणि तज्जन्य दुष्ट रूढि यांच्या संहारार्थ विनोदाचें लखलखित खड्ग इतक्या त्वेषानें आणि कुशलतेनेंहि कोल्हटकरांशिवाय महाराष्ट्रांतील दुसऱ्या कोणत्याहि लेखकानें गेल्या अर्धशतकांत चालविलेलें नाहीं.

कोल्हटकरांची ही त्रिविध कामगिरी लक्षांत घेऊन मी म्हणतों कीं, निदान ललित वाङ्मयाच्या क्षेत्रांत तरी आज त्यांचेंच युग

चालू आहे. कलाविलास आणि ध्येयवाद यांचा संगम जर कोणाच्या वाङ्मयांत झालेला असेल, तर तो फक्त कोल्हटकरांच्या संप्रदायींच्याच. तिथें बुद्धीबरोबरच भावना, विद्वत्तेबरोबर विनोद आणि विश्लेषणाबरोबर रसिकता सुखेनैव विहार करतांना दिसून येतात. कै. चिपळूणकर यांच्यापासून ज्या लोकांनीं मातृभाषेच्या सेवेची स्फूर्ति घेतली, त्यांच्यापैकीं बहुतेकांना कालांतरानें त्यांची विचारसरणी अग्राह्य वाटली, तसा प्रकार कोल्हटकरांच्या बाबतींत होण्याची भीति नाहीं; कारण ते अत्यंत प्रगमनशील होते. 'मुक्तात्मा' या कादंबरीवरून बोलतांना मला ते एकदां असें म्हणाले होते कीं, " जगांत सर्व बाबतींत समता स्थापन करणें एवढेंच जर सोशालिस्टांचें ध्येय असेल तर त्याबद्दल सुधारणावादी लोकांना तरी कांहींच विषाद वाटण्याचें कारण नाहीं. जातीजातींतली आणि स्त्रीपुरुषांतली विषमता नष्ट व्हावी, म्हणून ज्यांचे सारखे प्रयत्न चालले आहेत. त्यांना वर्गावर्गांतली विषमता नष्ट होऊं नये, असें कां वाटेल ? " अशा ध्येयदर्शी प्रतिभेच्या ग्रंथकारांबद्दल तरुण पिढीला उत्कट आकर्षण वाटावें यांत काय आश्चर्य ? तें आकर्षण कायम ठेवून कोल्हटकरांचें सुधारणेच्या पुरस्कारांचें पवित्र व्रत पुढें चालविण्याची जबाबदारी आतां त्यांच्या शिष्यपरंपरेवर आहे. त्यांच्या वाङ्मयांतले ठळक दोष सांगावयाचे झाले तर ते कलाविलासांत कृत्रिमता, विनोदांत अतिरंजन, आणि टीकालेखांत बोजडपणा हे सांगतां येतील. पहिला दोष कल्पकतेच्या अतिरेकामुळें, दुसरा वैचित्र्याच्या लालसेमुळें आणि तिसरा विद्वत्तेच्या प्राचुर्यामुळें उद्भवलेला आहे. गुणातिशयाचें पर्यवसान पुष्कळदां वैगुण्यांत कसें होतें, याचा उत्कृष्ट नमुना म्हणून हे दोष दाखवितां येतील.

प्रश्नः—कै. कोल्हटकरांच्या नाटकांनीं कोणतें कार्य बजाविलें ? त्यांच्या टीकालेखांत विशेष काय असे ? विनोदी वाङ्मय लिहितांना कोणता दृष्टिकोण त्यांनीं अंगिकारिला होता ? मराठी वाङ्मयांत प्रथम टीकालेख कोणत्या कारणास्तव अवतरले ? कै. कोल्हटकरांना युगप्रवर्तक म्हणावयाचें याला अनेक कारणें कोणतीं ? त्यांच्या वाङ्मयांतील कोणते ठळक दोष लेखकांनीं सांगितले आहेत.

अभ्यासः—( १ ) कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर, कै. हरि नारायण आपटे, कै. गोपाळराव आगरकर, कै. शिवराम महादेव परांजपे, कै. राम गणेश गडकरी, यांचा उल्लेख या उताऱ्यांत ज्या कारणाकरितां आला आहे, तीं कारणें शब्दांत लिहून काढा.

( २ ) या उताऱ्यावरून कै. कोल्हटकरांची व्यक्ति या नात्यानें काय माहिती मिळते, तिचें टांचण करा.

( ३ ) 'इतिहासांत काय किंवा वाङ्मयांत काय युगप्रवर्तनाचें यश हें कांहीं केवळ पराक्रमानें मिळत नसतें.' या विधानास पोषक अशीं दुसरीं उदाहरणें शोधून काढा.

पुरवणीवाचनः—श्री. माडखोलकर यांचीं 'आधुनिक कविपंचक' 'कै. चिपळूणकर—द्विविधदर्शन' हीं टीकात्मक पुस्तकें व 'मुक्तात्मा' ही कादंबरी वाचा.

# ४७. स्वप्नमंदिर

**ओळख:**—विदर्भांतील सुप्रसिद्ध साहित्यसेवक आणि कवि, श्री. वामन नारायण देशपांडे, ( जन्म इ. स. १९०३ ) यांनीं नुकताच 'आराधना' या नांवाचा आपला काव्यसंग्रह प्रसिद्ध केला आहे. आरंभींच्या त्यांच्या कवनांतून कल्पनाविलास आढळतो; परंतु त्यासच पुढें सूचकतेची जोड मिळाल्यानें, त्यांचीं पुढील काव्यें अतीव आकर्षक झालीं आहेत. आपले भावगर्भ व कल्पनाप्रचुर विचार ते सूचकतेनें व्यक्त करितात.

छंदःशास्त्राचा त्यांचा विशेष अभ्यास असून, मराठींतील मुक्तछंद कवितेंत, स्वतःच्या काव्याच्या द्वारें मोलाची भर घालून, त्यांनीं महनीय कामगिरी बजाविली आहे.

विषय:—आजकाल सर्वांच्याच मनांत 'मानवतेच्या' भविष्यासंबंधीं विचार घोळतात. कवि हे तर अधिकच संवेदनाक्षम असल्यामुळें त्यांचेंहि मन, तशाच तऱ्हेच्या विचारांनीं व्याप्त होतें. 'मनीं वसे तें ध्यानीं दिसे' या न्यायानें, एका प्रतिभावंत कवीला जें मानवाच्या 'भावी उज्ज्वल आशेचें मोहक स्वप्न पडलें, तेंच प्रस्तुतच्या काव्याचा विषय होय.

देवदूत:—पहा ! अद्भुत कवे ! मंदिर सुंदर किती !

कवि:—सुंदर फार !—

आकार छान, रचना छान,
कारागिरीनें हरतें भान !
हिंदु मांदिर, बौद्ध मांदिर,
पैगंबरी वा ख्रिस्ती मंदिर,

—यांत रचना विशेष जी जी
ती ती आणिली मंदिरामाजीं !
सर्व धर्मांच्या अनुयायांना
वाटावा त्यांत आपलेपणा

देवदूतः—कवीच खरा ! पुरें वर्णन !
आंतलें कधीं घेशी बघून ?
अद्भुत तर सारें आंतील
निववी नेत्र !

कविः—कोण नवल—
गाभाऱ्यामध्यें घवघवीत
सुवर्णासन रत्नजडित
छत्र सोन्याचें वरी शोभतें
हिऱ्यामोत्यांची झालर त्यातें
—विचित्र किती !— आसनावरी
फावडे, विळा प्रतिमा परी !
हेच का देव नवमंदिरीं ?
पूजनीय का ते खरोखरी ?
त्यांसच काय वंदावें जनीं ?
भूषवावें का त्यांस सुमनीं ?
नकळे कांहीं मन बावरे !
असेल यांत दूता ! काय रे ?

देवदूतः—नवयुगाची नव तेजाची
पाहाट आतां फुटावयाची !
नवयुगाचें नवीन वारें,

नवयुगाचे नवे पसारे
नवयुगाचे नवीन देव,
जुनाच जरी भक्तीचा भाव
श्रमलक्ष्मी ही देवी उद्यांची
—फावडें, विळा— प्रतीकें तिचीं
परीस कवे ! परिस कानीं
गंभीर होई आकाशवाणी
'या रे या सारे नव मंदिरीं
वसें मी नव्या मूर्तिमाझारीं
विश्वधर्माचें मंदिरधाम
विश्वशांतीचा तेंच उगम "

## अनुष्टुभ्

जाग आणि नभोवाणी स्वप्नजाल तदा विरे.
देवदूत कुठें ?—कोठें दिव्य मंदिर तें बरें ?
अर्थ कांहीं असें स्वप्नीं ?—कां तें आहे निरर्थक ?
असो कांहीं ! स्मरें चित्तीं नित्य हें स्वप्नकौतुक !

—वामन नारायण देशपांडे

प्रश्न:—देवदूतानें कसलें मंदिर रचिलें होतें ? कवीनें त्याचें कोणत्या शब्दांत वर्णन केलें ? देवदूतास तें वर्णन पटलें का ? कवीचें मन कशामुळें बावरलें ? कवीला स्वप्नमंदिरांत कोणत्या देवीचें दर्शन घडलें ? काव्यांत कोणतें ध्येय कवीनें सूचित केलें आहे ?

अभ्यास:—( १ ) कवि आणि देवदूत यांच्यातील संवाद तुमच्या शब्दांत लिहा.

( २ ) विश्वकुटुंबीसंस्था या धड्यांत आलेले विचार वरील कवितेतील विचारांशीं तोलून पाहा.

**पुरवणीवाचनः**—श्री. वामन नारायण देशपांडे यांचा ' आराधना ' आणि अनिल यांची ' फुलवात ' हे कवितासंग्रह वाचा.

---

# ४८ आमचें तत्त्वज्ञान

**ओळखः**—कै. लोकमान्य बाळ गंगाधर टिळक, ( जन्म इ. स. १८५६, मृत्यु इ. स. १९२० ) यांनीं आपलें आयुष्य हिंदुस्थानच्या सेवेकरितां वाहिलें होतें. अगदीं शालेय शिक्षणापासून त्यांच्या तीव्र बुद्धिमत्तेचीं अनेक उदाहरणें आढळतात. त्यांचें इंग्रजी शिक्षण पुण्यातील तेव्हांच्या सिटीस्कूलमध्यें झालें, आणि तेथूनच ते इ. स. १८७३ मध्यें मॅट्रिकची परीक्षा पास झाले. इ. स. १८७६ मध्यें बी. ए. पहिल्या वर्गांत, आणि इ. स. १८७९ मध्यें ते एल्एल्. बी., या परीक्षा उत्तीर्ण झाले. कै. गोपाळ गणेश आगरकर हे त्यांचे सहाध्यायी होते, आणि कॉलेजांतील शिक्षण संपवून दोघांनींहि पुढें देशकार्यालाच आपले देह अर्पण केले.



कै. चिपळूणकर यांनीं सुरू केलेल्या न्यू इं. स्कूल ह्या संस्थेला इ. स. १८७९ मध्यें ते येऊन मिळाले आणि तेव्हांपासून ' केसरी ' या वर्तमानपत्राशीं त्यांचा जो संबंध जडला, तो शेवटपर्यंत राहिला. राजकीय विषयां-

वरील अनेक प्रासंगिक लेख लिहून लोकजागृतीचें खडतर कार्य सडेतोड विचारसरणीमुळें त्यांनीं घडवून आणिलें. त्या अवधींत राजद्रोहाचे त्यांच्यावर खटले होऊन, त्यांना दोनदां दीर्घकाळपर्यंत तुरुंगवासहि घडला. तथापि 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे' ही घोषणा त्यांनीं आमरणान्त चालविली होती. त्यांचें कार्य ध्यानांत आणून चिरोलसाहेबांनीं त्यांना 'हिंदुस्थानच्या असंतोषाचे जनक' असें म्हटलें होतें. इंग्रजी अंमल सुरू झाल्यावर हिंदुस्थानांत जे श्रेष्ठ राष्ट्रीय पुरुष उदयाला आले, त्यांतच त्यांची प्रामुख्यानें गणना होते.

"माझ्या मनाची खरी हौस पाहिली तर प्रोफेसर होऊन ग्रंथ लिहिण्याची. मी केवळ परिस्थितीच्या जुलमानें राजकारणांत पडलों आणि संपादक झालों." हे लो. टिळकांचे स्वतःसंबंधाचे उद्गार, त्यांचें स्वतंत्र ग्रंथकर्तृत्व लक्षांत घेतां खरे वाटतात. वेदकाल-निर्णयावरील विद्वत्ताप्रचुर पुस्तकाखेरीज 'भगवद्गीतारहस्य' यासारखा तत्त्वविवेचक ग्रंथ लिहून त्यांनीं मराठी भाषेंत अनन्यसाधारण भर टाकिली. त्यांनीं धर्म, तत्त्वज्ञान, भाषा इ० विविध विषयांवर जे स्फुट लेख लिहिले, त्यांतून आपलीं प्रांजल मतें निर्भीडपणें सांगितलेलीं आहेत. सर्व विचारप्रवाहांतून त्यांचा पूर्वसंस्कृतीचा अभिमान आणि राष्ट्रीयप्रेम व्यक्त होतें. किंबहुना स्वदेशभक्तीच्या पोटींच त्यांच्या वाङ्मयाची निर्मिति झाली आहे. त्यांची बुद्धि सर्वविषयव्यापी आणि एखाद्या विषयाकडे पाहाण्याचा त्यांचा दृष्टिकोण तर्कशुद्ध होता. विद्वत्तेबद्दल त्यांस आदर वाटे, आणि तिचा गौरव करितांना देशकालाच्या आकुंचित मर्यादा त्यांनीं पाळिल्या नाहींत त्यांचे टीकालेख प्रायः विधायक स्वरूपाचे असत. मात्र जेथें सामोपचाराचा उपाय लागू पडत नसे, तेथें ते 'जशास तसें' हा न्याय उपयोगांत आणीत. सहेतुकता हें त्यांच्या वाङ्मयाचें प्रधान अंग होय. त्यांच्या लेखनकलेला जें गांभीर्य आलें आहे, तें यामुळेंच. पुष्कळ वेळपर्यंत आकाशांत ढग

जमून यावेत आणि ते दाटून आल्यावर जोराचा पाऊस पडावा, तसेंच त्यांच्या अंतःकरणांतून बाहेर पडलेल्या घनदाट शब्दांची स्थिति होते. कल्पकतेपेक्षां वास्तवाकडे आणि निव्वळ भावनेपेक्षां बुद्धिवादाकडेच त्यांच्या साहित्याचा कल दिसतो.

विषयः—जगांत सुखाचे दोन मार्ग आढळून येतात. कांहीं लोक शारीरिक सुखाच्या मार्गे लागतात, तर कांहींना आत्मोन्नति केव्हां होईल असा निदिध्यास लागतो. सकृद्दर्शनीं हे दोन मार्ग निराळे दिसतात खरे; परंतु 'खरें सुख' म्हणजे तें शाश्वत स्वरूपाचें असलें पाहिजे. आज आहे आणि उद्यां नाहीं असलें सुख काय कामाचें ! या जगांत, बाह्य वस्तूंच्या योगानें आपणांस सुख मिळवितां येईल, तें तर मिळविणें आपलें कर्तव्यच आहे, तथापि तेवढ्यानें आपलें कार्य संपलें असें नाहीं; कारण असें केलें म्हणजे फक्त शरिराला सुख होईल. पण मनाला–आत्म्याला–सुख मिळवून देणें हेंच मानवाचें शेवटचें ध्येय असतें. मनाला अखंड शांतीचा आणि आनंदाचा लाभ होणें हाच खरा मोक्ष. ह्या सर्व गोष्टी सोबतच्या उताऱ्यांत लेखकांनीं थोडक्यांत किती निश्चित स्वरूपानें सांगितल्या आहेत पाहा.

संसारांत सुखदुःखें नेहमींच पर्यायानें प्राप्त होत असून, सुखापेक्षां दुःखांचीच बेरीज अखेर आधिक हें सिद्ध असतांहि जर सांसारिक कर्में सोडावयाचीं नाहींत, तर अत्यंत दुःखनिवृत्ति होऊन अत्यंत सुख प्राप्त करून घेण्याचे मनुष्याचे प्रयत्न व्यर्थ होत, असें कित्येकांस वाटण्याचा संभव आहे; आणि केवळ आधिभौतिक–म्हणजे इंद्रियगम्य बाह्य विषयोपभोगरूपी–सुखांकडेच दृष्टि दिली तर ही त्यांची समजूत गैरवाजवी आहे, असें म्हणतां यावयाचें नाहीं. चांदोबास धरण्यासाठीं आकाशांत हात पसरणाऱ्या

लहान मुलांच्या मुठींत ज्याप्रमाणें चांदोबा कधींच सांपडत नाहीं, तद्वतच आत्यान्तिक सुखाच्या आशेनें केवळ आधिभौतिक सुखाच्या पाठीस लागणाऱ्यांस केव्हांहि अत्यन्त सुखाची प्राप्ति होणें दुर्घट होय. परंतु आधिभौतिक सुख हाच काय तो सुखाचा एकटा प्रकार नसल्यामुळें, या अडचणींतूनहि अत्यन्त व नित्य सुखप्राप्तीचा मार्ग काढितां येण्यासारखा आहे. सुखाचे शारीरिक व मानसिक असे दोन भाग केल्यावर, शरिराचे किंवा इंद्रियांचे व्यापारांपेक्षां मनासच शेवटीं अधिक महत्त्व द्यावें लागतें, हें वर सांगितलेंच आहे. शारीरिक (म्हणजे आधिभौतिक) सुखापेक्षां मानसिक सुखाची योग्यता अधिक असा जो सिद्धांत ज्ञानी पुरुष करितात, तो आपल्या ज्ञानाच्या घमेंडीनें करीत नसून, त्यांतच श्रेष्ठ मनुष्यजन्माची खरी थोरवी म्हणजे सार्थकता आहे, असें प्रसिद्ध आधिभौतिकवादी मिल्ल यानेंहि आपल्या उपयुक्तता-वादावरील ग्रंथांत प्रांजलपणें कबूल केलें आहे. कुत्रीं, डुकरें, बैल वगैरेसहि मनुष्यांप्रमाणेंच इंद्रियसुखाची गोडी असते; आणि विषयोपभोग एवढेंच काय तें या जगांत खरें सुख आहे अशी जर मनुष्याची समजूत असती, तर मनुष्य पशु होण्यासहि राजी झाला असता. पण पशूंचें सर्व विषयसुख नित्य मिळावयाचें असलें, तरीहि ज्या अर्थीं पशु होण्यास कोणी राजी होत नाहीं, त्या अर्थीं पशूंपेक्षां मनुष्यांमध्यें कांहीं तरी विशेष आहे, असें उघड होतें. हा विशेष कोणता हें पाहूं गेलें, म्हणजे मन आणि बुद्धि यांच्या द्वारें स्वतःचें व बाह्यसृष्टीचें ज्यास ज्ञान होतें, त्या आत्म्याच्या स्वरूपाचा विचार करावा लागतो; आणि एकदां हा विचार सुरू झाला म्हणजे पशु आणि मनुष्य या दोघांना सारखेंच साध्य जें विषयोपभोगसुख त्यापेक्षां मनाच्या

आणि बुद्धीच्या अत्यन्त उदात्त व्यापारांत व शुद्धावस्थेंत जें सुख तेंच मनुष्याचें श्रेष्ठ किंवा अत्यन्त सुख असें ओघानेंच प्राप्त होतें. हीं सुखें सर्व आत्मवश म्हणजे बाह्य वस्तूंची अपेक्षा न ठेवितां किंवा दुसऱ्याचें सुख कमी न करितां, आपल्या प्रयत्नानेंच आपल्या स्वतःस प्राप्त होण्यासारखीं असून, जसजसें वर चढत जावें, तसतसें या सुखाचें स्वरूप अधिकाधिक शुद्ध व निर्भेळ होत असतें. " मनसि च परितुष्टे कोऽर्थवान् को दरिद्रः"—मन प्रसन्न असलें म्हणजे दरिद्री काय आणि श्रीमंत काय, सारखेच,—असें भर्तृहरीनें उद्गार काढिले असून, प्लेटो नांवाच्या प्रसिद्ध ग्रीक तत्त्ववेत्त्यानेंहि शारीरिक ( म्हणजे बाह्य किंवा आधिभौतिक ) सुखापेक्षां मनाचें सुख श्रेष्ठ, आणि मनाच्या सुखापेक्षांहि बुद्धिग्राह्य ( म्हणजे परम आध्यात्मिक ) सुख श्रेष्ठ असें प्रतिपादन केलें आहे. म्हणून मोक्षाचा विचार जरी सध्यां बाजूला ठेविला तरी आत्मविचारांत निमग्न झालेल्या बुद्धीलाच परम सुख मिळणें शक्य असतें, असें सिद्ध होतें; व त्याचमुळें भगवद्गीतेंत सुखाचे सात्त्विक, राजस आणि तामस असे तीन भेद केल्यावर, त्यांपैकीं " तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तं आत्मबुद्धिप्रसादजम् "—आत्मनिष्ठ ( सर्वांभूतीं एकच आत्मा असें आत्म्याचें खरें स्वरूप ओळखून त्यांतच रत झालेल्या ) बुद्धीच्या प्रसन्नतेनें जे आध्यात्मिक सुख प्राप्त होतें, तेंच सात्त्विक म्हणजे श्रेष्ठ—असें प्रथम सांगून ( गीता १८–३७ ), नंतर इंद्रियें व इंद्रियांचे विषय यांपासून होणाऱ्या आधिभौतिक सुखाची पायरी याखालची म्हणजे राजस ( गी. १८–३८ ), आणि चित्ताला मोह पाडणाऱ्या व निद्रा किंवा आलस्य यांपासून होणाऱ्या सुखाची योग्यता तामस म्हणजे सर्वांत कनिष्ठ होय, असें पुढें क्रमवार वर्णन केलें आहे.

या प्रकरणाचे आरंभीं गीतेंतला जो श्लोक दिला आहे. (सुखमात्यंतिकं यत्तत् बुद्धिग्राह्यमतींद्रियम्। गी. ६–२१) त्यांतील तात्पर्य हेंच असून, या परम सुखाचा अनुभव एकदां आला म्हणजे पुढें कितीहि मोठे दुःख असलें तरी त्यानें ही स्थिति हालत नाहीं, असें गीताच:सांगत आहे. (गी. ६–२२). हें अत्यन्त सुख स्वर्गीच्याहि विषयसुखांत नसून तें मिळण्यास आपली बुद्धि प्रथम प्रसन्न झाली पाहिजे. ती कशी प्रसन्न ठेवावी हें न पाहातां, केवळ विषयोपभोगांतच जो गढून जातो, त्याचें सुख क्षणिक किंवा अनित्य असतें. कारण, जें इंद्रियसुख आज आहे तें उद्यां नाहीं इतकेंच नव्हे, तर जी गोष्ट आपल्या इंद्रियांस आज सुखकर वाटते तीच कांहीं कारणामुळें उद्यां दुःखकारक होते. उदाहरणार्थ, उन्हाळ्यांत जें थंड पाणी गोड वाटतें तेंच थंडीच्या दिवसांत नकोसें होतें. बरें; इतकें करूनहि त्यापासून सुखेच्छेची पूर्ण तृप्ति होते असेंहि नाहीं, हें वर सांगितलेंच आहे. म्हणून 'सुख' हा शब्द व्यापकपणानें सर्व प्रकारच्या सुखास जरी लावितां आला, तरी सुखासुखांतहि भेद करावा लागतो. नेहमींच्या व्यवहारांत सुख म्हणजे इंद्रियसुख असाच मुख्यत्वेंकरून अर्थ होत असतो; पण इंद्रियातीत म्हणजे इंद्रियसुखापलीकडल्या व केवळ आत्मनिष्ठ बुद्धीलाच कळणाऱ्या सुखापासून, विषयोपभोगरूपी सुखाचा जेव्हां भेद दाखविणें इष्ट असतें, तेव्हां विषयोपभोगाच्या आधिभौतिक सुखास नुसतें सुख किंवा प्रेय, आणि आत्मबुद्धिप्रसादज म्हणजे आध्यात्मिक सुखास श्रेय, कल्याण, हित, आनंद किंवा शांति, असें म्हणण्याची वहिवाट आहे. गेल्या प्रकरणाच्या अखेरीस दिलेल्या कठोपनिषदांतील वाक्यांत प्रेय आणि श्रेय यांमध्यें नचिकेतानें जो भेद केला आहे, तो याच धोर-

धोरणावर केलेला आहे. मृत्यूनें त्याला अग्नीचें रहस्य पहिल्यानेंच सांगितलें होतें; पण हें सुख प्राप्त झाल्यावर नचिकेतानें पुढें मला आत्मज्ञान सांगा असा जेव्हां वर मागितला, तेव्हां त्याऐवजीं मृत्यूनें दुसऱ्या अनेक ऐहिक सुखांचा त्यास लोभ दाखविला. परंतु मग अशा प्रकारच्या या अनित्य आधिभौतिक सुखांस, किंवा सकृद्दर्शनीं गोड वाटणाऱ्या ( प्रेय ) वस्तूंस न भुलतां दूरवर नजर देऊन ज्यांत आपल्या आत्म्याचें श्रेय म्हणजे परिणामीं कल्याण आहे, त्या आत्मविद्येलाच नचिकेतानें आग्रह धरून अखेर ती संपादन केली आहे. सारांश, आत्मबुद्धि-प्रसादापासून होणाऱ्या केवळ बुद्धिगम्य सुखास किंवा आध्यात्मिक आनंदासच आमचे शास्त्रकार श्रेष्ठ सुख मानीत असून, हें नित्यसुख आत्मवश असल्यामुळें सर्वांस प्राप्त होण्यासारखें आहे व सर्वांनीं तें संपादन करण्याचा प्रयत्न करावा, असा त्यांचा अभिप्राय आहे. पशुधर्माखेरीज मनुष्याचें म्हणून जें कांहीं विलक्षण किंवा विशिष्ट सुख आहे, तें हेंच होय; व हा आत्मानंद केवळ बाह्योपाधींवर कधींच अवलंबून राहात नसल्यामुळें तो सर्व सुखांत नित्य, स्वतंत्र व श्रेष्ठ आहे. त्यालाच गीतेंत निर्वाणीची शांति असें नांव असून ( गी. ६–१५ ) स्थितप्रज्ञाच्या ब्राह्मी अवस्थेंतील परमावधीचें जें सुख तें हेंच होय. ( गी. २–७१; ११–८; १२–१२; १८–६२ पाहा ).

भगवद्गीतारहस्य— —लो. टिळक.

प्रश्नः—संसारांतील अनेक दुःखें सहन करूनहि मनाला सुखी ठेवण्याचे उपाय कोणते ? परमसुखाला स्वर्गसुख म्हणतात हें बरोबर आहे

काय ? एकच पदार्थ भिन्न परिस्थितींत भिन्न प्रकारचे परिणाम निर्माण करितो, याला उदाहरणें कोणती ? नचिकेताचें ध्येय काय होतें ?

अभ्यासः—(अ) खालील वाक्यांचा अर्थ उघड करा—

(१) मन प्रसन्न असलें म्हणजे दरिद्री काय आणि श्रीमंत काय सारखेच.

(२) 'प्रेय' आणि 'श्रेय' यांमध्यें नचिकेतानें जो भेद केला आहे, तो याच धोरणामुळें.

(३) आत्मानंद केवळ बाह्योपाधींवर कधींच अवलंबून राहात नसल्यामुळें तो सर्व सुखांत नित्य, स्वतंत्र व श्रेष्ठ आहे.

(ब) 'आमची सुखाची कल्पना' यावर आपले विचार लिहा.

पुरवणीवाचनः—श्रीमद्भगवद्गीतारहस्यांतील 'सुखःदुःख' हें प्रकरण समजावून घ्या.

---

# ४९. ज्ञानेश्वर आणि मराठी भाषा.

ओळखः—ज्ञानेश्वर महाराज (जन्म शके ११९७, समाधिकाल शके १२१८) हे मराठी भाषेंतील श्रेष्ठप्रकारचे तत्त्वज्ञ कवि होत. पैठणाजवळील आपेगांव हें त्यांचें मूळ गांव. त्यांचे वडील विठ्ठलपंत हे तेथील कुलकर्णी. त्यांचा विवाह सिधोपंत कुलकर्ण्यांची मुलगी रुक्मिणीबाई ह्यांच्याशीं घडून आला. आळंदी हें ज्ञानेश्वरांचें आजोळ. वडिलांच्या वैराग्यशील आचरणाचा परिणाम ज्ञानेश्वरांच्या मनावर अक्षय राहात गेला. ते, त्यांचे थोरले बंधु निवृत्तिनाथ, आणि धाकटे भाऊबहीण सोपानदेव-

मुक्ताबाई, ह्या सर्वांनीं मिळून आपल्या शुद्ध आचरणाच्या द्वारें, जणुं काय तत्कालीन समाजांत साधुत्वाचा प्रसार करण्याचेंच कार्य स्वीकारलें. ज्ञानेश्वरांच्या या निःस्वार्थी मनोवृत्तीचा मंगलदायक ठसा त्यांच्या वाङ्मयांत उतरलेला दिसतो. जात्याच अत्यंत संवेदानाक्षम असलेलें त्यांचें हृदय, आपल्या सभोंवतालच्या परिस्थितीमुळें—तींत आढळून येणाऱ्या विषम स्थितीमुळें—स्पंदन पावूं लागलें. ‘ज्ञानेश्वरी’ हा विचारपरिप्लुत व भावनारम्य काव्यग्रंथ त्यांनीं शके १२१२ त प्रसिद्ध करून, मराठी भाषा आणि आपलें नांव अढळ करून ठेविलें आहे.

विषयः—ज्ञानेश्वरांच्या वेळीं मराठी भाषेची गळचेपी अनेक रितींनीं होत असे. तत्कालीन पण्डितवर्ग संस्कृत भाषेला अगदीं मोहून गेला होता. मराठींत ग्रंथरचना करणें एकप्रकारचें गांवढळपणाचें लक्षण मानिलें जात होतें; तथापि सर्वसाधारण जनसमूहाची भाषा ‘मराठीच’ (प्राकृत) होती. यामुळें, सामान्य जनतेच्या कल्याणाची ज्यांना तळमळ लागून राहिली होती, असे प्रतिभावंत ग्रंथकार विशिष्ट वर्गाच्या अपवादाची पर्वा न करितां मराठींतच ग्रंथरचना करूं लागले. ज्ञानेश्वरांनीं हें कार्य इतक्या उत्तम रीतीनें केलें कीं, मराठीभाषा आणि ज्ञानेश्वरी हीं नांवें हळूहळू समानार्थक होत गेलीं. आपल्या या मायभाषेच्या अभिमानाचे जिवंत आणि क्रान्तिकारक उद्गार, त्यांच्या काव्य-ग्रंथांत ठिकठिकाणीं आढळतात. त्याच्या पाठीमागें जो वरील इतिहास आहे, तो लक्षांत घेऊन तुम्ही खालील उतारे वाचा म्हणजे तुम्हांस आनंद होईल.

१

माझा मऱ्हाठाचि बोल कौतुकें । परी अमृतातेंही पैजा जिंकें । ऐसीं अक्षरें रसिकें । मेळवीन ॥ १ ॥ जियें कोवाळिकेचेनि पाडें । दिसती नादींचे रंग थोडे । वेधें परिमळाचे बीक मोडे । जयाचेनि

॥ २ ॥ एका रसाळपणाचिया लोभा । कीं श्रवणींचि होती जिभा । बोलें इंद्रिया लागे कळंभा । एकमेकां ॥ ३ ॥ सहजें शब्द तरी विषो श्रवणाचा । परी रसना म्हणे रस हा आमुचा । घ्राणासि भाव जाय परिमळाचा । हा तोचि होईल ॥ ४ ॥ नवल बोलतीये रेखेची वाहाणी । देखतां डोळां पुरें लागे धणी । ते म्हणती उघडली खाणी । रूपाची हे ॥ ५ ॥ जेथ संपूर्ण पद उभारे । तेथ मनचि धांवे बाहिरें । बोल भुजांहीं आविष्करें । आलिंगावया ॥ ६ ॥ ऐसीं इंद्रियें आपुलालिया भावीं । झोंबती परी तो सरिसेपणेंचि बुझावी । जैसा एकला जग चेववी । सहस्रकर ॥ ७ ॥ तैसें शब्दाचें व्यापकपण । देखिजे असाधारण । पाहातया भावज्ञां फावती गुण । चिंतामणीचे ॥ ८ ॥

—अध्याय ६

२

देशियेचेनि नागरपणें । शांत शृंगारातें जिणें । तरी वोंविया होती लेणें । साहित्यासी ॥ १ ॥ मूळ ग्रंथींचिया संस्कृता । वरि मऱ्हाटी नीट पाहातां । अभिप्राय मानिलिया चित्ता । कवण भूमी हें न चोजवे ॥ २ ॥ जैसें आंगाचेनि सुंदरपणें । लेणिया आंगचि होय लेणें । तेथ अळंकारिलें कवण कवणें । हें निर्वचेना ॥ ३ ॥ तैसी देशी आणि संस्कृत वाणी । एका भावार्थाच्या सुखासनीं । शोभती आयणी । चोखट आइका ॥ ४ ॥ उठावलिया भावा रूप । करितां रसवृत्तीचें लागे वडप । चातुर्य म्हणे पडप । जोडलें आम्हां ॥ ५ ॥ तैसें देशियेचें लावण्य । हिरोनि रसां आणिलें तारुण्य । मग रचिलें अगण्य । गीतातत्त्व ॥ ६ ॥

—अध्याय १०

३

एवं जे महाभारतीं । श्रीव्यासें अप्रांतमती । भीष्मपर्वसंगतीं । म्हणितली कथा ॥ १ ॥ जो श्रीकृष्णार्जुन संवाद । नागरी बोलीं विशद । सांगोनि दाऊं प्रबंध । वोंवियेचा ॥ २ ॥ तुसधीचि शांतिकथा । आणिजेल कीर वाक्पथा । जे शृंगाराच्या माथां । पाय ठेवी ॥ ३ ॥ दाऊं वेल्हाळ देशी नवी । जे साहित्यातें वोजावी । अमृतातें चुकी ठेवी । गोडसपणें ॥ ४ ॥ बोल वोल्हाविते‍नि गुणें । चंद्रासि घे उमाणें । रसरंभा भुलवणें । नाद लोपी ॥ ६ ॥ तैसा वाग्विलास विस्तारूं । गीतार्थेसीं विश्व भरूं । आनंदाचा आवारूं । मांडूं जगा ॥ ७ ॥

—अध्याय १३

४

आणि तोचि हा मी आतां । श्रीव्यासाचीं पदें पाहाता पाहातां । आणिला श्रवणपथा । मऱ्हाठिया ॥ १ ॥ व्यासादिकांचे उन्मेख । राहाटती जेथ साशंक । तेथ मीहि रंक येक । वाचाळी करीं ॥ २ ॥ परि गीता ईश्वर भोळा । ले व्यासोक्तिकुसुममाला । तरी माझिया दुर्वादळा । ना न म्हणे कीं ॥ ३ ॥ आणि क्षीरसिंधूचिया तटा । पाणिया येती गजघटा । तेथ काय मुरकुटा । वारिजत असे ॥ ४ ॥ राजहंसाचें चालणें । भूतळीं जालिया शाहाणें । आणिकें काय कोणें । चालावेंचि ना ? ॥ ५ ॥ जी आपुलेनि अवकाशें । अगाध जळ घेपे कलशें । चुळीं चूळपणा ऐसें । भरूनि न निघे ॥ ६ ॥ दिवटीच्या आंगीं थोरी । तरि ते बहु तेज धरी । वाती आपुलिया परी । आणीच कीं ना ॥ ७ ॥ जी समुद्राचेनि पैसें । समुद्रीं आकाश आभासे । थिल्लरीं थिल्लराऐसें । बिंबेचि पैं ॥ ८ ॥ तेविं

व्यासादिक महामती । वावरों येती इथे ग्रंथीं । मा आम्ही ठाकों हे युक्ती । न मिळे कीर ।। ९ ।। जिये सागरीं जळचरें । संचरती मंदराकारें । तेथ देखोनि शफरें येरें । पोहों न लाहती ।। १० ।। अरुण आंगाजवळिके । म्हणोनि सूर्यातें देखे । मा भूतळींची न देखे । मुंगी काई ।। ११ ।। यालागीं आम्हां प्राकृतां । देशिकारें बंधे गीता । म्हणणें हें अनुचिता । कारण नोहे ।। १२ ।। आणि बाप पुढां जाये । ते घेत पाउलाची सोये । बाळ ये तरि न लाहे । पावों कायी ।। १३ ।। तैसा व्यासाचा मागोवा घेत । भाष्यकारातें वाट पुसत । अयोग्यही मी न पवत । कें जाइन ।। १४ ।।

—अध्याय १८

टीपाः—पैजा—प्रतिज्ञेनें. रसिकें—मधुर. कोंवळिका—मृदुता. नादींचे—नादाचे—सप्तसुरांचे. वेध—आकर्षण, गोडी. बीक—वैभव, बळ. कळंभा लागे—भांडण, स्पर्धा लागे. विषो—विषय. रेखा—पंक्ती, ओळ. वाहाणी—सरणी, पद्धत. घणी—तृप्ति. भाव—धर्म, स्वभाव. बुझावी—समजावणी करी. भावज्ञ—रसिक. फावती—सांपडती, आढळती. चिंतामणी—इच्छिलेली वस्तु देणारा मणि.

जिणे—जिंकली. साहित्य—अलंकारशास्त्र. निर्वचेना—सांगवत नाहीं. आयाणी—आवडीनें. वडप—वृष्टि. पडप—प्रतिष्ठा.

अप्रांतमतीं—अ+प्रांत+मती—अगाधबुद्धीनें. नागरबोल—सुसंस्कृत शब्द. नुसधीच—नुसतीच, केवल. वेल्हाळ—आवडती. वोजावी—शिकवील. वोल्हावितेनि—शांत करणाऱ्या, भिजविणाऱ्या. उमाणें—बरोबरी. आवारूं—गावकुसू, भिंत.

गजघट—हत्तींचे थवे. मुरकुट—चिलट. शाहाणें—आकर्षक, सुंदर. कलश—घागर. कीर—खरोखर. शफर—लहान मासा. आंगजवळिके—शरीराजवळ असलेला. देशिकारें—देशभाषेनें. मागोवा—माग, रस्ता.

**प्रश्नः**—मराठींतील रसिक अक्षरांची कोणती थोरवी कवीनें सांगितली आहे? गीतेंत विशेषेंकरून कोणता रस आढळतो? त्यावरून कोणत्या गोष्टी रसिकांनीं ओवाळून टाकाव्या असें कवीनें सूचित केलें आहे? जगा-भोंवतीं आनंदाचा तट उभारूं, असे उद्‌गार कोणत्या सामर्थ्यावर कवींनीं काढले? इत्ती आणि चिलट, राजहंस, दिवटी, वात, यांचे संबंध कशा-करितां आले आहेत? कवींनीं कोणता आत्मविश्वास शेवटीं प्रकट केला आहे?

**अभ्यासः**—या धड्यांत आलेल्या ओव्यांपैकीं ज्या तुम्हांस विशेष आवडतील, त्यांचा अर्थ तुमच्या शब्दांत लिहा.

**पुरवणीवाचनः**—कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या निबंधमालेंतील ‘मराठी भाषेची स्थिति’ हा निबंध वाचा.

---

# ५० आमच्या देशास काय झालें आहे?

**ओळखः**—कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर, (१८५०-१८८२) हे



आपल्या मराठी भाषेतील एक युग-प्रवर्तक लेखक होऊन गेले. ते मराठी भाषेचे शिवाजी कसे यथार्थतेनें शोभतात, याचा प्रत्यय त्यांचा ‘निबंधमाला’ हा ग्रंथ वाचून येतो. त्यांचें शाळेंतील शिक्षण पूना हायस्कूलमध्यें झालें. तथापि वाङ्मयसेवेची आवड त्यांना थोरले-शास्त्रीबुवा—त्यांचे वडील, कृष्णशास्त्री चिपळूणकर—यांच्या सहवासानेंच लागली. ते डेक्कन कॉलेजमधून इ. स. १८७१ त बी. ए. झाले. इ. स. १८७४

पासून त्यांनीं निबंधमाला या नांवाचें मासिक सुरू केलें व तें सुमारें आठ वर्षे चालविलें. स्वदेश, स्वधर्म व स्वभाषा या विषयावर कळकळीनें व भावनोत्कट पद्धतीनें अनेक सुरस लेख लिहून त्यांनीं आपल्या मायभूमीची अमोलिक सेवा बजाविली. 'न्यू इंग्लिश स्कूल', 'चित्रशाळा', 'आर्यभूषण छापखाना', 'केसरी' वगैरे संस्थांचे आरंभींचे संचालक म्हणूनहि त्यांचें नांव चिरस्मरणीय झालें आहे. मार्मिक टीकाप्रहार, आवेशयुक्त, अभिनिवेशात्मक व अलंकारिक भाषा, आणि ध्येयांकित, निर्भीड विचारसरणी हे त्यांच्या लेखन-पद्धतींतील विशेष होत.

विषयः—सोबतचा उतारा शास्त्रीबोवांनीं लिहिलेल्या 'आमच्या देशाची स्थिति' या निबंधांतून घेतला आहे. आपला देश अनेक वर्षे पारतंत्र्यांत पडला, तेव्हां त्यास काय झालें आहे याची चिकित्सा शास्त्रीबोवांनीं या बव्यांत केली आहे. आपल्या देशाचें पारतंत्र्य नष्ट करावयाचें म्हणजे आपण कोणत्या गोष्टी करावयास पाहिजेत, याबद्दलच्या आपल्या विधायक सूचना त्यांनीं या बव्यांत निर्भीडपणें पण मोठ्या कळकळीनें सांगितल्या आहेत.

छिन्नोऽपि रोहति तरुश्चन्द्रः क्षीणोऽपि वर्धते लोके ।
इति विमृशन्तः सन्तः सन्तप्यन्ते न लोकेऽस्मिन् ॥ 'नीतिशतक'

["झाड तोडलें तरी पुनः वाढतेंच व चंद्रास क्षय लागला असतांहि तो पुनः वृद्धिंगत होतो, या सृष्टिधर्माकडे लक्ष देऊन सज्जन विपत्तींतहि खचून जात नाहींत."]

१. प्रथमतः आमच्या प्रस्तुतच्या ऱ्हासस्थितीची उपपत्ति. प्रस्तुत विषयावर आमच्या आजपर्यंत काय समजुती झाल्या आहेत, त्या नुकत्याच आम्हीं प्रदर्शित केल्या आहेत; यास्तव त्या

पुनः येथें दाखल करण्याची जरूर नाहीं. आमचा ठरलेला सिद्धांत आम्हीं मागेंच नमूद केला आहे, कीं आमच्या देशास कांहीं एक झालें नाहीं. त्याची नाडी अद्याप साफ चालत असून शरीरप्रकृतीस म्हणण्यासारखा कांहीं एक विकार नाहीं. यास्तव आमच्या अर्वाचीन पंडितमंडळींनें डाक्तरी पद्धतीस अनुसरून एकावर एक जालीम दवे सुरू करून व शस्त्रक्रियेचे तीव्र प्रयोग करून त्याची जी हलाखी मांडली आहे, व विनाकारण विटंबना आरंभली आहे, ती सर्व सोडून देऊन साधारण पौष्टिकाचे उपचार त्याजवर सुरू झाले असतां, तो लवकरच पुनः पहिल्यासारखा सशक्त व तेजस्वी होईल, याविषयीं आम्हांस बिलकुल संशय नाहीं. हल्लीं जी आमच्या राष्ट्रास विपत्तीची स्थिति प्राप्त झाली आहे, ती आमच्या आंगच्या कांहीं अनिवार्य दोषांमुळें आली नसून, ती यदृच्छेनें कोणत्याहि देशास येण्यासारखी आहे, व आजपर्यंत आलीहि आहे. इंग्रज लोक हे आम्हांहून अनेक प्रकारांनीं बलिष्ठ असल्यामुळें व आमचें दैव फिरल्यामुळें हल्लींच्या अवस्थेंत आम्ही येऊन पडलों आहों. ज्या प्रबलतेमुळें व ज्या सद्दीमुळें स्कॉट्लंडसारखा वीर्यपरिप्लुत देश आमच्या राज्यकर्त्यांच्या सत्तेखालीं आला आणि 'फिलिप व नेपोलियन' सारखे मी मी म्हणत त्यांच्यावर चढाई करून गेले असतां, ते हतवीर्य होऊन माघारीं आले, त्याच दोन कारणांचा येथेंहि प्रभाव गाजला आहे. बाकी ज्या देशांत शिवाजी, बाजीराव, माधवराव, राघोबा, हैदर, यशवंतराव, रणजितसिंग, तात्याटोपी असलाले एकेक तरवारबहाद्दर होऊन गेले व बाळाजी विश्वनाथ, नाना फडणवीस, सखाराम बापू, महादजी शिंदा, नानासाहेब असले मसलती पुरुष ज्या देशांत निपजले, तो म्हणजे कॅप्टन् क्लैव्हसारख्यांस

व वॉरन् हेस्टिंग्ससारख्यांसहि हार जावा, अशांतली बिलकुल गोष्ट नव्हती ! पण कालगति विचित्र आहे; त्या वैचित्र्यांतीलच आमची प्रस्तुतची स्थिति हा एक प्रकार होय.

आतां ही जी आमची सांप्रतची दुरवस्था हींतून सुटण्याचा कांहीं मार्ग आहे कीं नाहीं व असल्यास तो कोणता, याविषयीं विवेचन करावयाचें.

आमच्या प्रस्तुच्या दैन्याचें मुख्य कारण काय आहे हें कोणालाहि सांगावयाला नकोच. तें परकी अंमल हें होय, हें उघडच आहे. इंग्रज लोक इकडे प्रभु होण्यापूर्वी हा देश फार संपन्न होता, व मुसलमानांची जुलमी म्हटलेली कारकीर्द सांप्रतच्या सुधारलेल्या कारकीर्दीहून शंभर वांट्यांनीं बरी वगैरे गोष्टी अलीकडे सिद्धान्तासारख्या होऊन बसल्या आहेत व प्रत्यक्ष इंग्रेज लोकहि त्या बोलून दाखवितात, हें आज बहुधा सर्वांस माहीत असेलच; असो. तर आमच्या पाश्चात्य आर्यबंधूंचें आधिपत्य हें जर आमच्या विपत्तीचें मोठें कारण होय, तर तें नाहींसें झालें असतां आमची स्थिति सुधारेल, ही अर्थातच कोणाच्याहि मनांत प्रथमतः मोठी कल्पना येणार आहे. तर आमचा व आमच्या राज्यकर्त्यांचा संबंध तोडून टाकून आपणांस सुखी करण्याचे आमच्या स्वाधीन आहे कीं काय, याविषयीं पहिल्या प्रथम विचार करूं.

वरील उपाय म्हटला म्हणजे आम्ही आमच्या राज्यकर्त्यांशीं लढाईला उभें राहून त्यांचा पराजय करावयाचा व आपलें राज्य पुनः आपलें आपण वहिवाटावयाचें, हा होय. आतां ही गोष्ट हल्लींच्या काळीं कितपत साध्य आहे हें बहुधा एखाद्या लहान पोरालाहि कळण्यासारखें आहे. जो अ–संबंध सिद्ध करावयास आमच्या

पातालवासी बंधूंस आठ वर्षें घनघोर संग्राम करावा लागला व आयरिश् लोकांनीं आज शेंकडों वेळां झटापटी खाल्ल्या पण कांहीं एक झालें नाहीं, तो आमच्यानें आज तडीस जावयाच्या म्हणजे खरेखुरेच मुसळास अंकुर फुटावयाचे होत ! आमच्या राज्यकर्त्यांचें केवढें अपार सामर्थ्य व केवढा कट्टा सरंजाम, तसाच केवढा जगड्व्याळ बंदोबस्त; आणि आमच्याकडे मंडळींत परस्पर किती सूत ! आमची हल्लींची रणसामुग्री किती व युद्धकलेचें ज्ञान किती—सर्वच गोष्टी अनुकूल ! असो; तर वरील थोरल्या उपायाच्या संबंधानें तर आज कोणीं गोष्टहि काढूं नये अशी सांप्रतची अवस्था आहे, हें स्पष्टच आहे.

तेव्हां हें सिद्ध आहे कीं, आम्हांस सांप्रतच्या दुरवस्थेंतून जर निघावयाचें असेल, तर आमच्या सांप्रतच्या राज्यकर्त्यांशीं बिघडून आम्हांस बिलकूल सोय नाहीं. जो प्रसंग पडला आहे त्यास सादर होऊन त्यांच्या सलोख्यानेंच जें काय कार्य होईल तेवढें करून घेतलें पाहिजे. हा सलोखा होण्यास दिवसेंदिवस अधिकाधिक सोईहि होत चालल्या आहेत. पूर्वीं टोपकरांचा स्पर्श होतांच सचैल स्नान करावें अशा ज्या आमच्या ठिकाणीं आमच्या पाश्चात्य आर्यबंधूंविषयीं समजूती होत्या, त्या आतां पुष्कळ कमी होऊन त्यांचें वैभव व थोरवी हीं आतां आमच्या पुरतीं लक्षांत येऊन चुकलीं आहेत; त्याप्रमाणें हिंदु म्हणजे आफ्रिकेंतील नीग्रो लोकांचे बंधु ही जी आकाशांतील बापाच्या पवित्र लेंकरांनीं चोहोंकडे समजूत पसरून दिली होती, तींतहि आतां इतकें अंतर पडलें आहे कीं, जगाच्या चारी खंडांत गीर्वाणवाणीचा घोष सुरू होऊन, अमेरिकेंतील मंडळी अर्धा गोल वलांडून आम्हांस कडकडून भेटण्याकरितां व आमच्या प्राचीन ऋषींचा आम्हांपासून अनुग्रह घेण्याकरितां आम्हांकडे उड्या

टाकूं लागली आहेत. तसेंच अर्वाचीन शास्त्रांनीं व कलांनीं सारें भू-मंडल एकमय करून टाकून 'पवित्र शास्त्रां'तील सार्वलौकिक बंधुत्वाचें जें पोकळ मत त्यास यथार्थता आणण्याचा योग आणला आहे. खेरीज या शतकांत राजांच्या सत्तेस धक्का बसून त्यांचें माहात्म्य किती कमी होत चाललें आहे, आणि लोकप्रभुत्व व स्वातंत्र्य हीं तत्त्वें चोहोंकडे किती जारीनें पसरत चाललीं आहेत, हेंहि आज कोणाहि शोधक मनुष्याला अश्रुत नाहीं. तर वरील सर्व गोष्टींचा विचार केला असतां, या देशाविषयीं कळकळ बाळगणाऱ्या कोणाहि मनुष्यास मोठी उमेद येण्यासारखी आहे कीं, हल्लींच्या निकृष्टावस्थेंतून निघून हिंदुस्थाननें पुन: आपलें नांव जगांत गाजवावें. असें होण्यास दिवसोंदिवस अधिकाधिक उपाय सिद्ध होत आहेत.

आतां वरील उपाय कोणते, त्यांची योजना कोणत्या तऱ्हेनें झाली पाहिजे व आजपर्यंत आमच्या मंडळींचें काय काय चुकत होतें, वगैरे गोष्टींच्या संबंधानें आम्ही आपले विचार आमच्या देशबंधूंस सादर करतों.

मनुष्याची किंवा राष्ट्राची सुधारणा करावयाची म्हटली म्हणजे तिचा पाया आत्मस्थितीचें पूर्ण ज्ञान हें होय. ज्यास आपली अवस्था काय आहे, पुढें काय होणार, आपलें बळाबळ किती वगैरे गोष्टींचें चांगलेंसें ज्ञान नाहीं, त्याची स्थिति कधीं सुधारावयाची नाहीं. तर आमच्या लोकांस प्रथमतः स्वतःविषयीचें ज्ञान करून देणें अवश्य होय. आतां स्वतःविषयीचें ज्ञान म्हणजे काय अशी कोणी पृच्छा करील, तर तिचें उत्तर असें आहेः—साऱ्या जगाची स्थिति हल्लीं काय आहे, अलीकडे निरनिराळ्या संबंधांनीं पृथ्वींतील देशांचे परस्परांशीं व्यापार कसे सुरू आहेत, त्यांत या आमच्या

देशाचें इतरांशीं दळणवळण कोणत्या प्रकारचें आहे, आमच्या राष्ट्राची पूर्वी स्थिति कशी होती व हल्लीं कशी आहे, या स्थित्यंतराची उपपात्ति काय, आपली पुनः भरभराट होण्यास कोणत्या गोष्टी आवश्यक आहेत, इत्यादि विषयांवर सर्वांचे यथार्थ समज होणें हें अगोदर फार जरूरीचें आहे. हें जोंपर्यंत होणार नाहीं तोंपर्यंत हल्लींसारखेंच पोकळ लोककल्याण व रिकामी बड-बड चालेल व वास्तविक उपयोगाचें असें कांहीं एक होणार नाहीं. उघडच आहे कीं, ज्याला आपणास कांहीं रोग जडला आहे हीच मुळीं कल्पना नाहीं तो औषधक्रियेची तजवीज कशाला करील ? तो मूर्खपणानें कुपथ्यावर कुपथ्यें करून ऐन त्रिदोषाच्या वेळेस मात्र हाका मारीत बसेल. तर ज्यास आपली प्रकृति नीट करून शरीर दृढ करावयाचें असेल, त्यानें प्रथमतः आपल्या प्रकृतीचें मान समजून घेणें जसें अत्यवश्यक होय, त्याप्रमाणेंच येथेंहि प्रत्येक मनुष्यास आपल्या देशाची स्थिति पूर्णपणें लक्षांत येऊन आपलें बळाबळ जेव्हां त्याच्या पुरतेपणीं मनांत भरेल, तेव्हां आमच्या सुधारणेला आरंभ झाला असें खास म्हणतां येईल. आतां ही साऱ्या राष्ट्राची जागृति व्हावी कशी ? हा वरच्याच्या पुढला विचार होय; पण याचाहि निकाल करणें फार कठिण आहे, असें नाहीं. अज्ञानध्वंसनाची अलीकडे जशीं जबरदस्त साधनें उपलब्ध झालीं आहेत तशीं पूर्वी कधींहि नव्हतीं. छापखाने, आगगाड्या, आगबोटी, डाका, तारायंत्रें वगैरे अर्वाचीन कला हीं सर्व युद्धांत कामीं पड-णारीं अशीं केवळ दिव्य अस्त्रेंच होत असें म्हटलें असतां चालेल; पण हीं सर्व स्वतः केवढींहि प्रबळ असलीं तरी उपयोग काय ! पंतांनीं आपल्या प्रसिद्ध महाकाव्यांत म्हटलें आहेः—

सहाय असिला असे तरिच शत्रुला मारवें ।

मोठी भवानी तरवार असली तरी तिचें पाणिग्रहण जेव्हां 'यवन कुंजरशिरपर' चढणाऱ्या 'सिंहानें' करावें तेव्हां तिचें पाणी खळाळणार, नाहीं तर कोंडून राहिलेल्या डबक्याप्रमाणें तें जागच्या जागींच मठ्ठ बसून राहणार !

तर वरील महासाधनांच्या द्वारें आमचा येवढा सारा देश जो कुंभकर्णासारखा निद्रापद भोगीत स्वस्थ व सुस्त होऊन पडला आहे, त्यास हालहालवून जागें करण्याची प्रथमतः तजवीज झाली पाहिजे. हाच प्रकार यापूर्वीं साऱ्या युरोपांत, फ्रान्स देशांत व राशियांत झालेला आहे. अवघें युरोपखंड हें सोळाव्या शतकापूर्वीं आमच्या देशाप्रमाणें स्वस्थपणें घोरत पडलें होतें. पण चीन देशांतून मुद्रण-कलेनें येऊन पाश्चात्य राष्ट्राचे ठायीं वस्ती केली मात्र, तें लागलीच पन्नास साठ वर्षांत जिकडे तिकडे चळवळ सुरू खाली. जुन्या ग्रीक व लॅटिन् ग्रंथांचा साऱ्या देशांत अभ्यास व्हावयाला लागून युरोपची बुद्धिदेवता फार दिवसदर्यंत जी निद्रिस्त झाली होती, ती एकाएकीं जागृत झाली. हिचें फळ सोळाव्या शतकांतील जगत्प्रसिद्ध धर्मक्रांति हें होय. याप्रमाणेंच फ्रान्स् देशांतहि अठराव्या शतका-पर्यंत बिलकुल गडबड नसून, हवी तशी अंदाधुंदी चालली होती व एकंदर राष्ट्र हें मेंढवाड्यासारखें होऊन गेलें होतें. सरकारी अधिकाऱ्यांनीं हवे तसे जुलूम करावे आणि ते खुशाल खपले जावे. पण व्हॉल्टेर्प्रभृति महान् महान् ग्रंथकारांनीं देशभाषेच्या द्वारें लोकांचें मन क्षुब्ध करून त्यांस सुजाण केल्याबरोबर वरील शतकाच्या शेवटीं अशी धुमश्चक्री उडाली कीं, तिनें फ्रान्सच काय, पण सारें युरोपखंड खळबळून सोडलें ! अशाच प्रकारचें तिसरें उदाहरण रशियन् लोकांचें होय. हे लोक अद्यापहि आड-दांड व दांडगे असेच आहेत व त्यांची गणना सरासरी अर्धवट

रानटी लोकांतच आहे. मग दोन शतकांपूर्वीं तर त्यांची अवस्था काय असेल ती पाहा ! पण तसल्या स्थितींतहि त्यांचा राजा पीटर दि ग्रेट यानें जातीनें अचाट मेहनत करून त्यांची सुधारणा करण्याचें मनांत आणलें आणि पांच पंचवीस वर्षांत आपल्या राष्ट्रांत अतोनात फरक करून सोडला. तो इतका कीं, रशियाचें संस्थान आज साऱ्या युरोपांत प्रबळ होऊन बसलें आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं ! असो; तर ज्ञानाच्या प्रसाराचा महिमा असा विचित्र आहे.

तेव्हां आमच्या देशाची हलाखी पाहून ज्यांस खरोखर दुःख होत असेल व तिजपासून त्याची सुटका व्हावी म्हणून जे झटत असतील, त्यांनीं वरील ज्ञानांजनाचा प्रयोग करण्याचें मनावर घेतलें पाहिजे. सर्व क्रियेचें मूळ मन आहे; यास्तव तेंच सुविचारसंपन्न व पोक्त झालें असतां केवढा फायदा होणार बरें ? ही गोष्ट येवढी स्पष्ट असताहि हिजकडे आमच्या आजपर्यंतच्या पुढारी मंडळींचें कांहींच लक्ष पोंचलें नाहीं, असें म्हटलें पाहिजे. देशहिताची दीक्षा विद्यापीठांतील भट्टाचार्यांपासून घेऊन निघाल्यावर आमच्या नूतन पंडितमंडळीनें करावें काय ? तर सरकारी हुद्दे मिळवावे, जन्मभाषेची व आपल्या देशाची ओळख विसरून जाऊन पाश्चात्य भाषेंत निरंतर अद्वातद्वा प्रलाप करावे, व आपल्या राज्यकर्त्यांचें सर्व प्रकारें अनुकरण करून मोराचीं पिसें लावून आयता थोरपणा मिळवूं पाहणाऱ्या डोमकावळ्याच्या पंक्तीला बसावें. ज्यांच्या शिरावर साऱ्या देशसुधारणेचा भार व जे आपणांस अटोकाट शहाणे समजून आपल्या देशबंधूंचें विपत्तिरूप महागर्तेंतून उद्धरण करणार त्यांच्या वरील कृति पाहून कोणास आश्चर्य व खेद हीं वाटणार नाहींत ?

तर देशस्थिति सुधारण्याचा राजमान्य मार्ग म्हटला म्हणजे लोकांस ज्ञानसंपन्न करणें हा होय. ही संपन्नता सिद्ध करण्याचीं मोठीं दोन साधनें म्हटलीं म्हणजे रसना व लेखणी हीं होत. पहिल्या सदराखालीं शाळा, व्याख्यानें हीं येतात व दुसऱ्याखालीं वर्तमानपत्रें, मासिकपुस्तकें, ग्रंथ हे येतात. या दोन्ही साधनांचा उत्कर्ष होऊन या अज्ञानांध राष्ट्राचे डोळे उघडावे एतदर्थ आमच्या थोर व दयाळू सरकारनें आजपर्यंत थोडा उद्योग केला आहे, असें नाहीं. युनिव्हर्सिटी (विद्यापीठ), विद्यालयें, शाळा वगैरेंची स्थापना करून आज वर्षानुवर्षें त्यांची व्यवस्था चालविली आहे. देशभाषांची अभिवृद्धि व्हावी म्हणूनहि होईल तितका यत्न सरकारनें केला असून, अजूनहि तो चालू आहेच. पण सरकारनें आपलें काम बजाविलें म्हणून तितक्यानें काय झालें? आम्ही स्वतः मोठे कर्तृत्वाचे पडलों ना! आमच्या तोंडावर अचानक जांभूळ पडलें तरी तें आंत लोटावयालाहि आणखी कोणी पाहिजेच! आमची मर्दुमकी असली कीं, खडतरावाप्रमाणें आम्हांला घोड्यावर बसवून शिवाय आमच्या हातून लोकांनीं तरवारहि मारविली पाहिजे! वस्तुतः पाहातां सरकारनें जर इतका पल्ला मारला, तर बाकीची मजल आम्हीं मोठ्या संतोषानें व उत्साहानें केव्हांच आटपावी! येवढा ज्ञानाचा प्रवाह आडवून त्याची मालकी जर आमच्या सरकारानें आमच्या नवीन बांडांस दिली, तर नलिकाद्वारें घरोघर उदकसंचय करण्याचें अल्पस्वरूप कामहि त्यांच्यानें होऊं नये? पण हें करतो कोण व गरज कोणाला? शिवाय असें करण्यापासून कांहीं फायदा होण्यासारखा आहे हें तरी कोणाच्या अंतःकरणांत बिंबलें आहे? आमच्या भाषेंत म्हण आहे कीं, 'डोळ्यांत केर आणि कानांत फुंकर;' तर याच

न्यायानें सारी व्यवस्था चालली आहे. आमची अन्नान्नगत झाली आहे. दुष्काळाचा तडाका उडाला म्हणजे लाखों लोकांची चांदी उडते आहे, सरकार देण्याखालीं रयतेचा चुराडा होत आहे, लोकांस आपल्या सामान्य हक्कांचें व सामान्य गोष्टींचें ज्ञान नसून त्यांच्या अभावीं त्यांची स्थिति पशुवर्गांसारखी होऊन गेलेली आहे, येवढा हा संपन्न देश असतां, येथील लोकसंख्या येवढी असतां लोकांची बुद्धि येवढी प्रखर असतां व आहे तेथें अर्थसंचयहि विपुल असतां 'कल्पवृक्षाखालीं उपवास !' या न्यायानें इतकी प्रजा व्यर्थ हाल सोसते आहे. ही स्थिति सर्वांच्या डोळ्यांसमोर आहे; आणि देशोन्नतीचे धुरंधर वरील विपत्तीच्या प्रतिकारार्थ उद्योग काय करीत आहेत म्हणाल तर कोणी पार्लमेंटच्या गर्दींत गुंग होऊन गेले आहेत, कोणी अर्वाचीन सोमरसांत तल्लीन होऊन जातिभेदरूप महान् अनिष्टाचा उपशम होऊन या देशास आराम पडावा म्हणून अर्वाचिन ऋषींचा तांडा जुळवून गवालंभाचें अनुष्ठान करीत आहेत. कोणी सरकारी अधिकाऱ्यांचे प्रतिदिवशीं उंबरठे पुजून त्यांच्यापुढें निरंतर लांगूलचालन करीत आहेत, इ० इ० ! हा सर्व प्रकार आम्हांस तर केवळ लज्जास्पद दिसतो. मेकॉलेसारख्यांनीं येवढी भवति न भवति करून व येवढा अट्टाहास करून जी नवीन शिक्षणपद्धति सुरू केली तिचीं वर सांगितलीं हींच फळें काय ? त्यांनीं लावलेल्या उत्तम वृक्षास दरवर्षीं येवढा मोहोर येत असतां तो बहुधा सगळा गळून जावा आणि फळ म्हणून प्रायः मुळींच धरूं नये ही केवढी खेदाची गोष्ट आहे ? आमच्या राष्ट्राचे पालक म्हणून ज्यांस सरकारनें नेमलें आहे त्यांनीं आपला अधिकार किती उत्कृष्ट रीतीनें आजपर्यंत बजावला बरें ?

—वि. कृ. चिपळूणकर.

प्रश्न:—आपला देश विपन्नावस्थेंत असण्याचीं कारणें कोणतीं ? व्यक्तीची किंवा राष्ट्राची सुधारणा कोणत्या कारणांमुळें घडून येत असते ? आपल्या देशाची स्थिति सुधारण्याचे कोणते उपाय लेखकांनीं सुचविले आहेत ?

**अभ्यासः**—खालील विचार तुमच्या शब्दांत लिहा.

( १ ) मनुष्याची किंवा राष्ट्राची सुधारणा करावयाची म्हटली म्हणजे तिचा पाया आत्मस्थितीचें पूर्ण ज्ञान हें होय.

( २ ) मोठी भवानी तलवार असली तरी तिचें पाणिग्रहण 'यवन-कुंजरशिर' चढणाऱ्या 'सिंहानें' करावें तेव्हां तिचें पाणी खळाळणार.

( ३ ) 'कल्पवृक्षाखालीं उपवास' 'मुसळास अंकुर फुटणें', 'मोरांचीं पिसें लावणें' ह्या म्हणींचा अर्थ सांगून त्यांचा वाक्यांत उपयोग करा.

**पुरवणीवाचन**:—'निबंधमाला' या पुस्तकांतील 'मराठी भाषेची स्थिति', 'मोरोपंतांची कविता', 'डॉ. जॉन्सन्' वगैरे निबंध वाचा आणि त्यांवरून शास्त्रीबोवांच्या भाषाशैलीवर एक निबंध लिहा.

---